गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक १८
संपूर्ण गोष्टी.

# संसाररंजन.

[ प्रथमावृत्ति ] 

मुंबई,

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी.

सपटंबर १९०५.

# अनुक्रमणिका.

## १ संपूर्ण गोष्टी.

## २ कविता.



---

## प्रकाशकांचें दोन शब्द.

**मनोरंजनाच्या** ९ व्या आणि १० व्या पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या गोष्टींपैकीं कित्येक गोष्टी या पुस्तकांत स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध करित आहों. या पुस्तकास उदार आश्रय मिळाल्यास **मनोरंजनाच्या** मागील पुस्तकांतील निवडक गोष्टी स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याचा मानस आहे.

मनोरंजक ग्रंथप्रकारकमंडळीचें
ऑफिस, गिरगांव–मुंबई.
३० सपटेंबर १९०५.

काशीनाथ रघुनाथ मित्र,
व्यवस्थापक म. ग्रं. प्र. मंडळी.

पद्माकराचें मन काव्यमय झालें. त्याला सर्वत्र आपल्या गुलछबूची महती भासूं लागली. चंद्र, शुक्र, तारे, पवन, कोकिल हे सर्व त्या कलिकेची मनधरणी करित आहेतसें त्याला वाटलें. त्या मोहून जाणाऱ्या सर्वजणांत पवन मनधरणी करण्यांत विशेष प्रवीण आहेसें त्याला दिसलें. त्या मंदमंद वाहणाऱ्या पवनानें आपल्या झुळुकेनें ती कलिका खुलविली. तें गुलछबूचें फुल उमललें !

[ ३ ]

जेवणाची वेळ होतांच घरांतून बोलावणें आल्यामुळें पद्माकरास तेथून उठून जावें लागलें. तेथून उठतांनां हें अनुपम सुख सोडून जावेंसें त्याला वाटेना; परंतु नाइलाज झाला. आहार, निद्रा, अभ्यास आणि पाठशाला या चार गोष्टींमुळें एक संपूर्ण रात्र आणि दिवस त्याला आपल्या या छोटेखानी बागशाईकडे येण्यास अवकाश मिळाला नाहीं. तो आज घरीं—व्यायामशाळेंत आला, तों अगदीं संध्याकाळ झाला होता.

सर्व दिवस सारखे नसतात. सृष्टींत हरघडीला बदल होत असतो. काल होतें तें आज नाहीं, आज आहे तें उद्यां दिसेल कीं नाहीं याची वानवा ! पहा, काल आकाश निरभ्र होतें, पण आज त्यांत ढग उत्पन्न झाले आहेत. काल चंद्र हंसतमुख होता, आज तो ढगाच्या आड लपला आहे. काल शुक्र आपलें अप्रतिम तेज दाखवित होता, आज तो एखाद्या लहानशा चांदणीप्रमाणें लुकलुक करित आहे. बहुतेक तारे लोपून गेले आहेत. वारा बंद आहे. कोकिलरवहि ऐकूं येत नाहीं.

पद्माकराला कालच्यांत व आजच्यांत इतकें महदंतर पाहून आश्चर्य वाटलें. सृष्टींत एकदम इतका फरक झाला कसा, याचें नवल करित तो राहिला. जराशा वेळानें त्याच्या मनांत एक शंका आली. तिनें त्याच्या चित्तांत भय उत्पन्न झालें. दिवा लावून आपली बागशाई पहावी, हा विचार त्याच्या मनांत आला.

दिवा लावण्यास त्यानें एक काडी ओढिली, पण ती विझली; दुसरी ओढली, तीहि विझली; तिसऱ्यानदाहि तोच प्रकार झाला. मनांत उतावीळपणा व भय हीं अनिवार झालीं. तो स्वताशींच ह्मणाला "रोज दिवा लावण्यास मला एक काडी पुरते आणि आज तीन वायां गेल्या, हें काय ! घाईचे कामाला हटकून उशीर. चवथ्यांदा ओढलेली काडी टिकून तिनें दिवा लागला.

दिवा पेटतांच पद्माकरानें तो पडवीवरच्या बांकावर नेऊन ठेविला. दिव्याच्या त्या प्रकाशानें चोहोंकडे चक्क दिसूं लागलें. नंतर तो घाईघाईनें आपल्या गुलछबूकडे गेला. तों त्याला काय दिसलें—

काल जें फुल उमलून त्यानें त्याच्या आनंदोदधीला भरतें आणिलें होतें, व ज्याच्या सौरभानें दिग्मंडल मोहून गेलें होतें, आणि ज्याचा सौरभ आजहि आपण पूर्ण अनुभवूं अशी त्याला आशा होती, तें गुलछबूचें फूल आतां कोठें आहे? हरहर! कोणींतरी दुष्टानें तें तोडून टाकिलें होतें. पद्माकर त्या गुलछबूकडे, कांहीं वेळ आकाशाकडे व कांहीं वेळ शेजारच्या शिवालयांतील दिसणाऱ्या आम्रतरूकडे पहात उभा राहिला. इतक्यांत त्याच्या पायाला कायसें चावलें.

पद्माकर दिव्याशीं आला व पाय बांकावर ठेवून त्यानें पाहिलें तों त्याला पायावर एक मुंगी दिसली. त्यानें गुलछबूपाशीं दिवा नेला. तेव्हां त्याला बऱ्याच तांबड्या मुंग्या दिसल्या. त्या गुलछबूचें फूल कोणीं चुरडून टाकिलें होतें, तें त्या नेत होत्या.

हें पाहून पद्माकराला काय वाटलें असेल बरें! त्याच्या मनाचा नुसता विरसच झाला नाहीं; त्याला पराकाष्ठेचें वाईट वाटलें. तो ह्मणाला "हायरे दुष्टा! तूं काय केलेंस हें? सहज लीलेनें हें सुकुमार व सुगंधपूर्ण पुष्प चुरडून टाकतांना तुला कांहींच कसें वाटलें नाहीं? तुला हृदय आहे काय? छे! अंत:करण असतें, तर असें कधींच तूं करतासना!" जरा थांबून तो ह्मणाला "हे आकाशा, हे चंद्रा, हे शुक्रा, हे समस्त तारागण हो! हे पवनराजा, हे कोकिल! तुह्मी सर्वजण ह्या पुष्पाची अशी स्थिति पाहून खिन्न झालां आहांत काय?"

सर्वांच्या वाटचें वाऱ्यानें एक दीर्घ निश्वास सोडून उत्तर दिलें. झाडाचीं पानें हललीं. आपला तर्क खरा ठरला असें वाटून पद्माकर त्या पुष्पाबद्दल जास्त विचार करूं लागला.

तो त्या पुष्पाची अशी स्थिति कशी झाली, याचा तन्मय होऊन विचार करित असतां त्याचे डोळ्यांपुढें तें कालचें फुललेलें फूल उभें राहिलें. जराशा वेळानें त्याची बाहुली झाली—बाहुलीचा बाळकृष्ण झाला—बाळकृष्णाचें सुंदर मूल झालें—तें मूल एक मोठा मुलगा झालें—त्या मुलाचा पुरुष झाला व जराशा वेळानें तोहि अदृश्य झाला! पद्माकर त्या पुरुषाची आकृति आठवूं लागला. परंतु त्या चुरमडलेल्या फुलाशिवाय त्याचे डोळ्यांपुढें कांहीं येईना.

पद्माकर आपल्याशीं ह्मणाला "खरोखर फूल आणि मनुष्य ह्यांची स्थिति एकच आहे! फूल उमलण्याच्या अगोदर ह्मणजे कलिकावस्थेंत असतांना मनाला जसा आनंद होतो, तसा मनुष्य जन्मास आला ह्मणजे आनंद होतो. फूल उमललें कीं आनंद शिखरास गेला. त्याला पाहून सर्व मोहून जातात. मनुष्य

वयांत आला ह्मणजे त्याच्या सत्कृत्यांनीं आनंद दुणावून जातो. सद्गुण, सिद्धि, कीर्ति, शांति, क्षमा आदिकरून सर्व त्या मनुष्यास भुलून त्याचा आश्रय धरितात व त्याला विशेष शोभा आणितात. आणि तेंच फूल जर कोणीं चुरमडून टाकिलें तर त्याचा चटका लागून जातो, तसेंच मनुष्यप्राणी अवचित् कालाचे दाढेंत सांपडल्यास त्याच्या जवळच्या प्रेमाच्या माणसांस चटका लागून त्यांस जगत् शून्य होतें. फूल आणि मनुष्य दोघेंहि क्षणभंगुर होत!"

[ ४ ]

दुर्दैवाची विचित्र करणी काय पहा! फुलाबोलाला गांठ ह्मणतात त्याप्रमाणें घडून आलें. पद्माकराच्या मनांत हे विचार कालच आले होते. जास्त काल लोटला नाहीं. इतक्यांत पद्माकराचा प्रिय मामा एकाएकीं महामारीच्या उपद्रवानें मरण पावला. व्यायामशाळेंतील विद्यार्थ्यांस असें वाटलें कीं, आपणास देवानें चिंतामणि लाधला होता तो काळानें हिसकावून नेला. गांवांतील सर्व लोक गोपाळरावजींच्या निधनानें फार हळहळले. पद्माकरावरतर आकाशच कोसळलें होतें!

* * * * * * * *

प्रिय मातुलाच्या निधनानंतर कांहीं दिवसांनीं पद्माकर संध्याकाळीं व्यायामशाळेंत गेला होता. त्या दिवशीं शुभ्र चांदणें पडलें होतें. गुलाब व शेवंती ह्यांस फुलें आलीं होतीं. सूर्यकांतास खालपासून वरपर्यंत सूर्यकमलें लागलीं होतीं. गुलछबूच्या पांचसहा कळ्या विकसून आपला परिमल चोहोंकडे पसरित होत्या. पद्माकर जरी उदास झाला होता, तरी हा प्रकार पाहून थोडीशी प्रसन्नता त्याचे मुखावर दिसूं लागली. जराशा वेळानें तो एक दीर्घ श्वास सोडून ह्मणाला "हे सुगंधित पुष्पांनो! तुमचें मनोहरत्व विनाशी आहे. हा तुमचा सुगंध किती वेळ टिकणार! फार झालें तर एकदोन दिवस. नंतर तुह्मी सुकावयास लागाल. आपल्या स्थानापासून च्युततरी व्हाल, किंवा कोणा दुष्टाचा हात तुह्मांस चुरगळून तरी पाडील! तुह्मी ईशसेवेस लागाल, तरच तुमच्या उमलण्याचें सार्थक आहे!"

पुढें तो ह्मणतो "आणि मनुष्यांनो! तुमचीहि पण फुलांप्रमाणेंच अवस्था आहे. तुमचें जीवित नश्वर आहे. ऐश्वर्य क्षणभंगुर आहे. सत्ता, लौकिक वगैरे ज्या ज्या कांहीं ऐहिक गोष्टी आहेत त्या त्या सर्व विनाशी, अल्पायु आहेत. एक ईशसेवाच तुमच्या जन्माचें सार्थक करील—"

हांहां ह्मणतां पद्माकराचे डोळे अश्रूंनीं भरून आले. इतक्यांत वाऱ्यानें दिवाहि विझाला. नंतर पद्माकर तेथून उठून आंत गेला.

## गोष्ट २ री.

# कोण फजिती!

संशयी वृत्ति फार वाईट. आणि पतिपत्नींमध्येंतर ती मुळींच असतां कामा नये. परंतु आह्मां स्त्रियांनां या संशयानें इतकें कांहीं घेरलेलें असतें कीं, पुरुषांच्या प्रेमाविषयीं आह्मांला काडीइतकाहि विश्वास नसतो. पुरुषांचें प्रेम चंचल, अस्थिर असतें; त्यांच्यावर तुह्मी प्राणापलीकडे प्रेम करा, त्यांच्या सुखासाठीं जीव तोडून झटा, परंतु ते स्त्रियांवर अचल प्रेम ठेवितील, ही आशा करणेंच व्यर्थ आहे! त्यांची चित्तवृत्ति कधीं चंचल होईल व त्यांच्या प्रेमाचें स्थान कधीं बदलेल, याचा मुळींच भरंवसा नाहीं. निदान आह्मां स्त्रियांचीतरी अशी ठाम समजूत आहे. आणि यामुळेंच आह्मी स्त्रिया, पुरुषांची प्रत्येक कृति, प्रत्येक आचरण, नेहमीं शंकित दृष्टीनेंच पहात असतों. परंतु या संशयामुळें माझी एक वेळ अशी कांहीं फजिती उडून गेली होती कीं, ती गोष्ट मी मरेपर्यंत कधींहि विसरणार नाहीं! त्या गोष्टीची आठवण झाली, ह्मणजे मला मेल्यापेक्षांहि मेल्यासारखें होऊन जातें. आणि तिकडूनतर जी कांहीं थट्टा होत असते, विचारूं नका!

दोघें बोलत असतां त्यांचें भाषण आपण गुप्तपणें कां ऐकावें? ही गोष्ट वाईट आहे, हें न समजण्याजोगी त्या वेळीं मी अगदींच अज्ञान भाबडी पोर नव्हतें, हें मी कबूल करितें. माझें तेव्हां चांगलें पंधरासोळा वर्षांचें वय असेल. परंतु गोष्ट माझ्याच संबंधाची—माझ्या आयुष्यांतील अत्यंत महत्वाच्या प्रसंगाची—माझ्या विवाहाची—चालली होती, आणि—आणि ज्यानें माझें मन बळजबरीनें हिरावून नेलें होतें, तेंच माणूस बाबांजवळ त्यासंबंधीं बोलत होतें. बाबा माझ्या 'अलौकिक सुंदर' रूपाचें, 'लोकोत्तर' सद्गुणांचें रसभरित वर्णन करित होते. तें माणूस हंसतहंसत परंतु निर्भीडपणें (पुरुष बाई कितीतरी धीट आणि साहसी! आमची मेली वर मान करून पहाण्याची हिंमत व्हायची नाहीं, नी पुरुष आपले निश्शंकपणें भलभलत्या गोष्टीहि बिनदिक्कत विचारतात!) माझ्या-संबंधींची बारिकसारिक माहिती बाबांकडून काढून घेत होतें. बाबा त्यांच्या प्रश्नांचीं समर्पक आणि खात्री पटण्याजोगीं उत्तरें देत होते. तें भाषण माझ्या कानीं पडतांच माझे पाय तेथून कसे बरें उचलावे? दाराआड जिन्याजवळ गुप्तपणें उभी राहून मी तें ऐकत राहिलें. हा माझा अपराधतर खराच; परंतु त्या वेळची माझ्या मनाची स्थिति लक्ष्यांत घेतली असतां, त्या अपराधाबद्दल

कोणीहि मला क्षमा करील, अशी मला आशा आहे. पण पहिल्यानें मला माझी हकीकत मुळापासून सांगूंद्या.

[ २ ]

१८९—च्या नोवेंबर महिन्याची ३ री तारीख, मी कधींतरी विसरेन? यंग लेडीज हायस्कुलांतील पास झालेल्या विद्यार्थिनींना बक्षिसें वांटण्याचा या दिवशीं समारंभ होता. गव्हरनर साहेबांच्या पत्नींच्या हातून हा समारंभ साजरा व्हावयाचा होता. या प्रसंगीं शहरांतील सर्व जातींचे मोठमोठे वकील, डाक्टर, व्यापारी, त्याचप्रमाणें बऱ्याचशा हिंदु, पारशी, युरोपियन स्त्रियाहि आल्या होत्या. स्त्रीपुरुषांनीं समारंभाचा हाल गच्च भरून गेला होता. आणि माझा आजचा थाट काय विचारावा! सधन आणि लोकांत मानमान्यता असलेल्या आईबापांची मी एकुलती एक मुलगी. आईबापांना मुलीच्याहि जागीं मीच होतें, मुलाच्याहि जागीं मीच होतें. माझा प्रत्येक लाड, माझी प्रत्येक हौस त्यांनीं पुरी केली होती. मला त्यांनीं कोणत्याच गोष्टींत कमी ह्मणून पडूं दिलें नाहीं. त्यांतहि मला नेहमींनेहमीं सुंदर पोषाख करून आणि सोन्यामोत्यांच्या दागिन्यांनीं देह शृंगारून आपल्या रूपांत भर घालण्याची अगदीं लहानपणापासून हौस असे. आणि आजतर आमच्या शाळेचा बक्षिससमारंभ व शिवाय मी पहिल्या वर्गांत पहिल्या नंबरास पास झालेली! मग आजचा माझा आनंद, आजचा माझा पोषाखाचा—दागदागिन्यांचा थाट काय विचारावा!

बरोबर पांच वाजतां समारंभास सुरुवात झाली. पहिल्यानें शाळेच्या हकीकतीचा रिपोर्ट वाचण्यांत आला. नंतर कित्येकांचीं उत्तेजनपर भाषणें झालीं. पुढें कांहीं मुलींनीं इंग्रजींत आणि देशीभाषेंत गाणीं ह्मटलीं. वगैरेवगैरे रीतीप्रमाणें व्हावयाचे सर्व प्रकार झाले. ते सर्व मी येथें सांगत बसत नाहीं. मी बाबांच्या जवळ बसलें होतें. माझ्या शेजारींच एका खुर्चीवर बाबांच्या ओळखीचें एक माणूस बसलें होतें. समारंभ चालला असतां मधूनमधून बाबांच्या आणि त्या माणसाच्या तत्संबंधींच्या गोष्टी होत होत्या. माझी हकीकत, माझा अभ्यास, मी वर्गांत पहिल्या नंबरास पास झालें ती हकीकत, वगैरेवगैरे गोष्टी, बाबा त्या माणसाला मोठ्या अभिमानानें सांगत होते. तें माणूसहि प्रसन्नमुद्रेनें आणि उत्तेजनपर शब्दांनीं माझें एकसारखें अभिनंदन करितच होतें. पुढें मी अध्यक्षांजवळ जाऊन गोड आवाजांत एक गाणें ह्मटलें. सर्व मंडळीस तें फार रुचल्यामुळें त्यांनीं टाळ्यांच्या घोषानें आपला आनंद प्रगट केला. खुद्द गव्हरनरीणबाईंहि

फार खुष झाल्या व त्यांनीं माझें बरेंच गौरव करून मला शाबासकी दिली. त्या आनंदभरांत प्रसन्नमुद्रेनें मी पुनः बाबांजवळ येऊन आपल्या जागीं बसलें. परंतु माझ्या शेजारीं बसलेल्या आणि मघांपासून माझी सारखी प्रशंसा चालविलेल्या माणसानें या वेळीं माझी जी स्तुति केली व आपला जो अंतःकरण-पूर्वक आनंद प्रगट केला, त्या स्तुतीबद्दल आणि त्या आनंदाबद्दल मीं विनयपूर्वक त्याचे आभार प्रदर्शित करण्यासाठीं ह्मणून हास्ययुक्त मुद्रेनें किंचित् वर मान करून सलज्ज आणि प्रेमपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें.

तोच तो क्षण! याच क्षणीं आह्मां उभयतांची पहिली दृष्टादृष्ट झाली. कादंबरींत जसें वाचण्यांत येतें, तशीच थेट या वेळीं आह्मां उभयतांची अवस्था होऊन गेली. पहिल्याच नयनभेटीनें परस्परांचें चित्त आह्मीं परस्परांनीं आकर्षून घेतलें. त्या माणसाच्या अंतःकरणाची झालेली विलक्षण चलविचल मला स्पष्ट कळून आली. आणि माझी! माझ्या मनाचीतर जी कांहीं दयाजनक स्थिति झाली होती, ती माझ्या मनालाच ठाऊक! तो प्रसंग अझूनहि मूर्तिमंत माझ्या डोळ्यांपुढें आहे. प्राणांतींहि मी विसरावयाची नाहीं.

[ ३ ]

पण पहिल्यानें मला त्या माणसाची थोडीशी हकीकत सांगितली पाहिजे. तें माणूस कोण, तें आतां वाचकांनीं ओळखलेंच असेल. त्याचें नांव मी कसें बरें सांगूं? आपल्या सर्वांत आवडत्या—प्रिय माणसाचें नांव घेण्याची चोरी असावी, लाज वाटावी, हें आश्चर्यतर खरेंच! परंतु आह्मां हिंदु स्त्रियांच्या तोंडून कांहीं त्या माणसाच्या नांवाचा उच्चार प्राणांतींहि व्हावयाचा नाहीं! मीहि एक हिंदु स्त्रीच आहें. माझीं आईबापें कितीहि सुधारलेल्या विचारांचीं, सुधारक मताचीं असलीं, युरोपियन, पारशी वगैरे सुधारलेल्या लोकांत आमचें वारंवार जाणेंयेणें असलें, त्यांच्या आचारांविचारांचें आह्मीं अनुकरण करण्याविषयीं केवढेहि प्रयत्न केले असले, तथापि आमच्या हाडींमासीं खिळलेले जे कांहीं विशिष्ट दोष ह्मणा, गुण म्हणा आहेत, ते सहसा सुटावयाचे नाहींत. आह्मी हिंदुस्त्रिया चारचौघांत निश्शंकपणें आपल्या पतीच्या नांवाचा उच्चार करण्यास केव्हांहि धजणार नाहीं. तेव्हां मला जर तें नांव येथें सांगण्यास लाज वाटत असली, तर त्याबद्दल मला कोणी मोठासा दोष देईलसें वाटत नाहीं.

तें माणूस नुक्तेंच विलायतेंतून एम्. डी. ची परीक्षा पास होऊन आलें होतें. बाबांचा आणि तिकडच्या वडिलांचा बराच स्नेहसंबंध आणि थोडेंसें दूरचें नातेंहि होतें. वय चोवीसपंचविशीच्या सुमारें असेल. वास्तविक केव्हांच लग्न व्हावयाचें. परंतु स्वारींचे विचार जरा बरेचसे एकमार्गी, स्वतंत्र आणि सुधारणेच्या दिशेकडे झुकलेले असल्यामुळें आणि त्यांत आणखी इंग्लंडांत दोनचार वर्षें घालविलीं असल्यामुळें 'एव्हां लग्न करावयाचें नाहीं,' असें ज्यालात्याला उत्तर मिळे. कितीतरी मुलींच्या बापांनीं तिकडची नाना प्रकारें मनधरणी केली, मोठमोठ्यांकडून सांगवून पाहिलें, होतेनव्हते तेवढे सर्व उपाय केले; परंतु शेवटीं बिचाऱ्यांनां निराशच व्हावें लागलें. तिकडचा निश्चय फिरवण्यास कोणीहि समर्थ झाले नाहींत.

आह्मी त्या वेळीं गिरगांवांत रहात होतों. तिकडच्या स्वारींनीं कोटांत आपलें आफिस ठेवून रहाण्यासाठीं वाळकेश्वरावर बंगला घेतला होता. मुंबईंत आल्याला थोडेच दिवस झाले होते. अद्यापि स्वताची गाडी कांहीं ठेविली नव्हती. भाड्याच्या गाडीनेंच व्यवहार चालला होता. परंतु एक चांगलासा घोडा अगर घोडी विकत घेऊन स्वताची गाडी ठेवावी, असा विचार चालला होता व त्याप्रमाणें त्या घोड्याच्या तपासांत होते. ज्याच्यात्याच्यापाशीं घोड्याची चवकशी करीत. आमच्या शाळेच्या त्या बक्षिससमारंभानंतर स्वारींचें वारंवार आमच्या घरीं येणेंजाणें होऊं लागलें. बाबांच्या आणि स्वारींच्या ज्या गोष्टी होत, त्यांत घोड्यासंबंधींच्या गोष्टी निघाल्या नाहींत, असें कधींहि घडलें नाहीं. आमच्या घरींहि एक घोडा आणि एक घोडी अशीं दोन जनावरें होतीं. त्यांत घोडीतर फारच सुंदर आणि चपळ असे. मी शाळेंत जातेवेळीं गाडीला हीच घोडी जोडवित असें. माझें तिजवर फारच प्रेम जडलें होतें. कारण तें जनावरच तसें देखणें असे. तिकडची स्वारी आमचे घरीं आली, कीं, त्या घोडीसंबंधीं हटकून बोलणें निघे. तबेल्यापर्यंत जाऊन तिच्या पाठीवरून एकदोनदां हात फिरायचा व तिला आंजरागोंजरायचें, आणि असें केलें ह्मणजेच स्वारींस मोठी धन्यता वाटे. रोजरोज त्या मेल्या घोडीचीच काळजी करण्यांत आणि तिला आंजरण्यागोंजरण्यांत येत असलेलें पाहून माझ्या अंगाचा तिळपापड होई! पण काय करावयाचें ! निमूटपणें स्वस्थ बसावें लागे. दुसऱ्या बोलण्याजोग्या कसल्याच का गोष्टी नाहींत ?

परंतु हा माझा संताप हळूहळू कमीकमी होत जाऊन मला संतोष होईल असें वर्तन घडूं लागलें. आतांआतांतर पूर्वींपेक्षांहि तिकडचें येणेंजाणें आमच्या

घरीं अधिक होऊं लागलें. आमच्या घरीं औषधपाणी करण्याचें फॅमिली डाक्टरचें काम बाबांनीं तिकडेच सोंपविलें होतें. हळूहळू माझ्याशींहि तिकडचें बोलणें चालणें होऊं लागलें. पुढेंपुढेंतर आह्मां उभयतांतील संकोच बराच दूर होऊन आह्मी घरच्या माणसांप्रमाणेंच परस्परांशीं मोकळेपणानें बोलूंचालूं लागलों. माझी भेट घेऊन चारदोन सुखदुःखाच्या आणि हास्यविनोदाच्या गोष्टी बोलल्याविना डाक्टरसाहेबांस करमेनासें होई व एखादे दिवशीं तिकडचें येणें झालें नाहीं तर मला सारा दिवस उदासवाणें वाटूं लागे, अशी आमची चमत्कारिक स्थिति होऊन गेली.

[ ४ ]

एक दिवस संध्याकाळचे वेळीं मी आमच्या बंगल्यांतील बागेमध्यें एका गुलाबाच्या ताटव्यापाशीं एकटीच उभी होतें. इतक्यांत तिकडची स्वारी अचानक येऊन माझ्यापुढें उभी राहिली. या वेळीं कां कुणाला ठाऊक, माझी अगदीं घाबरगुंडी वळून मी कावऱ्याबावऱ्यासारखी करूं लागलें. माझी त्या वेळची ती अवस्था पाहून तिकडची स्वारी हंसतहंसत ह्मणाली "सुशीले! मी तुला परकी वाटत असल्यामुळेंच आज तूं अशी घाबरून गेली आहेस. हा परकेपणाचा दोष दूर करून तूं मला आपलासा करूं इच्छित नाहींस काय? बोल तुझी काय मर्जी आहे?"

आणखीहि ते त्या वेळीं जें कांहीं बोलले, तें सारें सांगण्यास मी इच्छित नाहीं. आणि माझ्यानें तें सांगवणार पण नाहीं. माझें बरेंचसें रूपवर्णन, गुणवर्णन, इतकें कीं, तें ऐकून माझी मलाच लाज वाटूं लागली, असेंच त्या भाषणांत होतें, हें चाणाक्ष वाचकांनीं ताडिलेंच असेल. शेवटीं त्यांनीं, आपला उभयतांचा विवाह होणें ही गोष्ट मला पसंत आहे ना? ह्मणून माझी स्पष्ट अनुमति विचारिली. पण मी काय बोलणार? "असा भलताच प्रश्न काय विचारायचा बाई? माझ्या मनांतीलच गोष्ट अचूक कशी विचारायची? या जगांत आपल्या पायांविना मला दुसरी गतितरी का आहे? मी आपलीच आहें—केव्हांच आपली झालें आहें—" असें माझ्यानें उत्तरतरी देववलें असतें? सलज्जमुद्रेनें मी खालीं पहात उभी राहिलें. माझ्या मनांतील आशय जाणून "ठीक आहे. उद्यां मी तुझ्या बाबांजवळ एका गोष्टीसंबंधीं कायतो खुलासा करून घेतों व नंतर मग लग्नासंबंधींची पुढील व्यवस्था ठरवितां येईल." असें बोलून माझा निरोप घेऊन स्वारी आपल्या बंगल्यावर निघून गेली.

परंतु तें भाषण ऐकतांच माझ्या छातींत धस्स झालें. अद्यापिहि एक गोष्ट राहिलीच आहे! आणि अर्थातच ती कांहींतरी अशुभच असणार! मन चिंती तें वैरी न चिंती! मी अगदीं भूमीला खिळल्यासारखी झालें. माझ्या सर्वांगांतून दरदर घाम सुटला. मग माझीं एवढीं मनोराज्यें, एवढ्या आशा, शेवटीं धुळीलाच का मिळणार? अरेरे! त्याहून धरणी दुभंग होऊन मला पोटांत घेईल तरी बरें, असें मला होऊन गेलें. माझा उत्साह लोपला, सुखस्वप्नें भंगलीं व मी अगदीं हताश आणि दीन बनून गेलें. ही सारी रात्र मीं कशी घालविली असेल त्याची वाचकांनींच कल्पना करावी.

[ ५ ]

एकदाची ती काळरात्र संपली व दुसरा दिवस उजाडला. सकाळींच तिकडची स्वारी आमच्या घरीं येऊन पोंचली. आणि काय आश्चर्य सांगावें, काल तसें कठोर भाषण करणाऱ्या जिभेला आज पुनः साखर पेरण्यास आणि नित्याप्रमाणेंच माझ्याशीं हास्यविनोद करण्यास यत्किंचितहि दिक्कत वाटली नाहीं! येतांच पहिल्यानें मला भेटून पुष्कळच हंसण्याखिदळण्यास सुरुवात झाली. परंतु तो हास्यविनोद मला मुळींच रुचला नाहीं. माझ्या अंतःकरणांत या वेळीं कोण गडबड उडाली होती. मी बाह्यात्कारी हास्यवृत्ति दाखवून कांहीं बहाणा करून माझ्या अभ्यासाच्या खोलींत जाऊन बसलें. वर मान करून तिकडच्या तोंडाकडे पहाण्यासहि आतां मला धीर होईना.

मी आंत गेल्याला आतां चांगला अर्धा पाऊण तास होत आला होता; तरी बाबांच्या आणि तिकडच्या गोष्टी कांहीं आटपेनात. जसजसा अधिकाधिक वेळ होत चालला, तसतशा माझ्या मनांत वाईटवाईट शंका येऊं लागल्या. अरेरे! मग माझ्या आशा, माझीं सुखस्वप्नें शेवटीं निष्फळच का व्हावयाचीं? माझे डोळे भरून आले. गालांवरून सारखा अश्रुवर्षाव सुरू झाला. या वेळीं माझ्या मनाची जी कांहीं चमत्कारिक स्थिति होऊन गेली होती, ती त्या नारायणालाच ठाऊक! शेवटीं माझ्यानें अगदींच धीर निघेना. तेव्हां मी तेथून उठून, काय प्रकार आहे तो समजून घेण्यासाठीं म्हणून दिवाणखान्याच्या दारापाशीं आलें. अद्यापि दोघेहि बोलतच होते. गोष्टी माझ्याचसंबंधीं चालल्या होत्या. मी कान देऊन ऐकूं लागलें. तिकडची स्वारी बाबांला म्हणते "पण तिची प्रकृती कांहीं चांगलीशी दिसत नाहीं!"

हें ऐकतांच माझी कंबरच मोडली. मी चांगली धडधाकट असतां माझी प्रकृति चांगलीशी दिसत नाहीं ह्मणतात! स्वतां डाक्टर. ते ह्मणतील तेंच खरें ठरायचें. त्यांच्या पुढें माझें काय चालणार आहे! परंतु बाबांनीं त्यावर दिलेलें उत्तर ऐकून माझ्या जिवांत जीव आला. बाबा ह्मणाले "तुह्मी वेडेतर नाहीं! ती अगदीं निरोगी आहे. साऱ्या जन्मांत तिला कधीं कांहीं झाल्याची मला आठवण नाहीं."

पण बाबा केवढें खोटें बोलले हे! मेलें माणूस आहे, कधीं सर्दी, पडसें खोकला, डोकें दुखणें, आंग तापणें वगैरे विकार व्हावयाचेच. मी कांहीं माणसाहून निराळी नव्हतें. मीहि वरच्यासारख्या विकारांनीं कधीं आजारी झालें असेन, नाहीं असें नाहीं. आणि बाबातर असें सांगतात! पण खरेंच सांगतें, बाबांच्या त्या खोटें बोलण्याचें मला क्षणभर आश्चर्य वाटलें खरें, तथापि आंतून फार बरें वाटलें. मी मनांतल्या मनांत ह्मणालें "बाबा! माझ्यासाठींच तुह्मांला आज असें खोटें बोलण्याचा प्रसंग आला ना? मजवर तुमचें हें केवढें प्रेम!"

पुढें तिकडून विचारणें झालें "आणि भूक कशी काय आहे?"

हा प्रश्न ऐकूनतर मी विस्मितच झालें! प्रश्न विचारणाराचें धैर्यतरी केवढें! लग्नांत असले का प्रश्न विचारायचे? असो. बाबा ह्मणाले "तिची भुकेसंबंधीं कधींच कुरकुर नाहीं. एवढेंच नव्हे, तर भूक थोडीशी जास्तच ह्मटलीतरी चालेल! संभाळाहो! तिच्यासाठीं तुह्मांला बराच खर्च करावा लागेल."

बाबा पण काय थट्टा करतात! एवढी का मी खादाड आहें. मी खाऊन खाऊन तें काय खाणार आणि त्याच्यासाठीं एवढा विनोद करण्यासारखा खर्च तो काय लागणार! परंतु बाबांच्या याहि विनोदाचा मला राग आला नाहीं, आनंदच वाटला व मी अधिकच लक्ष्य लावून पुढील प्रश्न ऐकत राहिलें. पुढें विचारतात "स्वभाव कसा काय आहे? तिच्या चर्येवरूनतर ती बरीच मस्त आणि कडवी दिसते."

हें ऐकतांच मला इतका कांहीं संताप आला ह्मणून सांगूं! मला मस्त आणि कडवी ह्मणायचें! माझा असा अपमान करायचा! त्या वेळीं माझें डोकें असें कांहीं भणाणून गेलें, कीं, काय झालें तें मला कळलें नाहीं. हातपाय थरथरूं लागले. छाती धडधडूं लागली व डोळ्यांपुढें अंधार दिसूं लागला. मी भिंतीला टेंकून उभी होतें ह्मणून बरें, नाहींतर धाडकन् जमिनीवरच पडलें असतें. थोड्याशा वेळानें मी पुनः देहभानावर आलें तों माझ्या कानीं पुढील शब्द पडले

"मी स्पष्ट बोलतों त्याबद्दल वाईट वाटूं देऊं नका. परंतु मला तिच्यांत एकदोन मोठेच दोष दिसतात."

ह्या भाषणानंतर माझ्या डोळ्यांतून सारखा अश्रुप्रवाह सुरू झाला. पुरुषांचें अंतःकरण इतकें का कठोर असतें? माझ्या तोंडावर नेहमीं साखर पेरायची, माझें नेहमीं गुणवर्णन करायचें, साऱ्या जगांत माझ्यासारखी सुंदर, सद्गुणी, प्रेमळ स्त्री नाहीं ह्मणून माझी स्तुति करायची, तें सारें वरकरणीच ना? पोटांत असें विष भरलें आहे, हें मला कसें कळावें? उगीच मीं अशा कठोर माणसावर प्रेम केलें! देवा आतां माझी कायरे गत! इत्यादि प्रकारें दुःखविचारांत मी गढून गेलें आहें इतक्यांत बाबा शांत स्वरानें ह्मणाले "तिच्या अंगीं एकहि दोष नाहीं, असें मी ह्मणत नाहीं. परंतु असलेच तर ते अगदीं क्षुल्लक असतील. प्रेमामुळें कदाचित् ते माझ्या लक्ष्यांत आले नसतील. परंतु तुह्मीं तिच्यांत असे काय दोष पाहिलेत, तेंतर सांगा—"

बाबांचा हा प्रश्न ऐकून मलाहि किंचित् समाधान वाटलें. माझ्या अंगीं असे कोणते दोष दिसले, तेंतर सांगूंद्या.

यावर स्वारी गंभीर स्वरानें ह्मणते " मान उंटासारखी लांबच लांब, पाय बगळ्यासारखे किरकोळ, आणि तोंडाचा जवडा मात्र वराच पसरट. यामुळें ती अगदींच ओंगळ दिसते."

हें कुत्सित भाषण माझ्या कानीं पडतांच माझ्या अंगाची नुसती काहिली होऊन गेली व काय करूं आणि काय नको, असें झालें. केवढा हा दुष्टपणा! माझी उंटासारखी मान! बगळ्यासारखे पाय! सांगण्याची गोष्ट नव्हे, पण सांगतेंच. काल संध्याकाळीं मला आपल्या बाहुपाशांत घेऊन अधरस्पर्श करून मला लाज वाटेल अशा प्रकारें माझ्या सौंदर्याची स्तुती करणारे, भाटासारखें माझ्या नसत्या गुणांचें वर्णन करणारे, मुक्तकंठानें पुनःपुनः माझी सारखी प्रशंसा करणारे, मला आपल्या सर्व सुखांचें, आशांचें स्थान मानणारे ते हेच का? अरेरे! पुरुष एवढे का पापी, दुष्ट, कठोर, पशु असतात! मी गरीब गाय व्यर्थ फशीं पडलें ना? आतां मी काय करूं? कुठें जाऊं?

माझें डोकें इकडे या प्रकारें संतप्त झालें आहे तों बाबा ह्मणाले "आतां तुह्मीं जे दोष दाखविलेत ते वास्तविक दोष नसून गुणच आहेत. अनुभवानें तुह्मांलाहि तसें वाटूं लागेल."

बाबांची पण काय अक्कल! असल्या दुष्टाची कशाला खुशामत पाहिजे! जळलं तें सुख! आग का लागेना त्याला!! अशा अधमाची पत्नी होण्यापेक्षां मी आजन्म

आनंदानें अविवाहितच राहीन. ज्याच्या हृदयांत विष भरलें आहे, दृष्टींत मत्सर भरला आहे, त्याच्या भाषणांत कितीहि साखर असो, त्या माणसाचें तोंडहि पाहूं नये! असा विचार करून मी तेथून जाऊं लागलें. परंतु पुढचे कर्णकठोर शब्द ऐकण्याचें माझ्या दैवीं होतेंच. तें कसें टळेल?

पुढें काय ह्मणतात "तुह्मी कांहीं ह्मणा, प्रेमामुळें तुह्मांला तसें वाटणें साहजिक आहे. परंतु एकंदरींत मला कांहीं तिच्या अंगाचा बांधा आवडत नाहीं. एखादें डुक्कर जसें फुगलेलें असतें, तसें तिचें बाकीचें अंग आहे. पोट काय, मांड्या काय, अगदींच अवजड, हिडीस दिसतात. मला कांहीं ती आवडत नाहीं—"

यावर बाबा ह्मणाले "तुह्मां अलीकडील तरुण मंडळींचें हेंच तें! एकदा डोक्यांत जें कांहीं वेड भरेल तेंच खरें! त्याच्या पुढें प्रत्यक्ष ब्रह्मदेव आला तरी त्याचें शहाणपण चालणार नाहीं. तिला तुमच्या हवालीं करतांना मला किती दुःख होईल ह्मणून सांगूं! प्रत्यक्ष मुलापेक्षांहि मीं तिला प्रेमानें वागविलें आहे. परंतु तुमचेवर माझें अति प्रेम, ह्मणूनच मी तिला तुह्मांला देतों. तुमच्या डोक्यांत कांहींतरी वेड भरलें आहे झालें. तुह्मी असें करा. तिला महिना दोन महिने तुह्मी आपल्या जवळ बाळगा. तेवढ्या अवकाशांत तिचा स्वभाव, गुणदोष सर्व तुह्मांला कळून येईल. तुह्मांला आवडली तर ठीकच आहे, परंतु पसंत नसली, तर आमची आमच्याकडे परत करा. ह्मणजे झालें कीं नाहीं! उगीच भलत्या फंदांत पडूं नका व दुसरातिसरा विचार करूं नका."

बाबांचें हें असभ्य, अभद्र भाषण ऐकूनतर मी अधिकच चवताळून गेलें. बाबांनांहि पण का माणूसपण सोडून गेलें होतें? असें शिष्टाचारास कलंक लावणारें का बोलणें बोलायचें? माझ्या अंगाची नुसती काहिली होऊन गेली व मी अगदींच क्षुब्ध झालें. मला त्या वेळीं इतका कांहीं संताप, दुःख आणि जगाचा वीट आला कीं, मी तशीच रडतरडत खोलींत गेलें. तदनंतर पुढें काय झालें, तें मला आठवत नाहीं.

[ ६ ]

बऱ्याच वेळानें—वेळानें कां?—बऱ्याच दिवसांनीं मी शुद्धीवर आल्यावर पहातें, तों मी माझ्या खोलीमध्यें पलंगावर निजलें आहें, तिकडची स्वारी जवळच खुर्चीवर सचिंत मुद्रेनें बसली आहे. मीं डोळे उघडतांच मला उद्देशून ह्मणणें झालें "सुशीले! ईश्वराची आपल्यावर मोठीच कृपा समजली पाहिजे, कीं,

आनंदानें अविवाहितच राहीन. ज्याच्या हृदयांत विष भरलें आहे, दृष्टींत मत्सर भरला आहे, त्याच्या भाषणांत कितीहि साखर असो, त्या माणसाचें तोंडहि पाहूं नये! असा विचार करून मी तेथून जाऊं लागलें. परंतु पुढचे कर्णकठोर शब्द ऐकण्याचें माझ्या दैवीं होतेंच. तें कसें टळेल?

पुढें काय ह्मणतात "तुह्मी कांहीं ह्मणा, प्रेमामुळें तुह्मांला तसें वाटणें साहजिक आहे. परंतु एकंदरींत मला कांहीं तिच्या अंगाचा बांधा आवडत नाहीं. एखादें डुक्कर जसें फुगलेलें असतें, तसें तिचें बाकीचें अंग आहे. पोट काय, मांड्या काय, अगदींच अवजड, हिडीस दिसतात. मला कांहीं ती आवडत नाहीं—"

यावर बाबा ह्मणाले "तुह्मां अलीकडील तरुण मंडळींचें हेंच तें! एकदा डोक्यांत जें कांहीं वेड भरेल तेंच खरें! त्याच्या पुढें प्रत्यक्ष ब्रह्मदेव आला तरी त्याचें शहाणपण चालणार नाहीं. तिला तुमच्या हवालीं करतांना मला किती दुःख होईल ह्मणून सांगूं! प्रत्यक्ष मुलापेक्षांहि मीं तिला प्रेमानें वागविलें आहे. परंतु तुमचेवर माझें अति प्रेम, ह्मणूनच मी तिला तुह्मांला देतों. तुमच्या डोक्यांत कांहींतरी वेड भरलें आहे झालें. तुह्मी असें करा. तिला महिना दोन महिने तुह्मी आपल्या जवळ बाळगा. तेवढ्या अवकाशांत तिचा स्वभाव, गुणदोष सर्व तुह्मांला कळून येईल. तुह्मांला आवडली तर ठीकच आहे, परंतु पसंत नसली, तर आमची आमच्याकडे परत करा. ह्मणजे झालें कीं नाहीं! उगीच भलत्या फंदांत पडूं नका व दुसरातिसरा विचार करूं नका."

बाबांचें हें असभ्य, अभद्र भाषण ऐकूनतर मी अधिकच चवताळून गेलें. बाबांनांहि पण का माणूसपण सोडून गेलें होतें? असें शिष्टाचारास कलंक लावणारें का बोलणें बोलायचें? माझ्या अंगाची नुसती काहिली होऊन गेली व मी अगदींच क्षुब्ध झालें. मला त्या वेळीं इतका कांहीं संताप, दुःख आणि जगाचा वीट आला कीं, मी तशीच रडतरडत खोलींत गेलें. तदनंतर पुढें काय झालें, तें मला आठवत नाहीं.

[ ६ ]

बऱ्याच वेळानें—वेळानें कां?—बऱ्याच दिवसांनीं मी शुद्धीवर आल्यावर पहातें, तों मी माझ्या खोलीमध्यें पलंगावर निजलें आहें, तिकडची स्वारी जवळच खुर्चीवर सचिंत मुद्रेनें बसली आहे. मीं डोळे उघडतांच मला उद्देशून ह्मणणें झालें "सुशीले! ईश्वराची आपल्यावर मोठीच कृपा समजली पाहिजे, कीं,

आज त्यानें हा आनंदाचा दिवस दाखविला. आतां तुला कांहीं भीति नाहीं. तुझी प्रकृति लवकरच सुधरेल—”

यावर मी रागानें ह्मणालें “मला मरण येतें तरच चांगलें झालें असतें !”

“छे, असें अभद्र बोलूं नकोस! मरण इच्छिण्याजोगें तुजवर कोणतें दुःख येऊन पडलें आहे? ईश्वरानें तुला सुखी करण्यासाठींच जन्म दिला आहे.”

मी एक दीर्घ निश्वास टाकून ह्मणालें “माझ्या दैवीं सुख! ती आशाच करायला नको! माझ्या दैवीं दुःखच लिहिलें आहे. मी कशासाठीं, कुणासाठीं वांचावें?”

माझे हे चमत्कारिक उद्गार ऐकतांच ते ह्मणाले “तुझें कोणी नाहीं? तुला कसलीहि आशा नाहीं?”

“नाहीं! माझें कुणीहि नाहीं!! मला कसलीहि आशा नाहीं!!!”

“सुशीले! अद्यापि तुझें मस्तक भ्रमांत आहे, ह्मणूनच तूं हें असें बोलत आहेस. तूं शुद्धीवर असतीस तर खचीत असें बोलली नसतीस. तुला या स्थितींत २ जास्त बोलूं देणें योग्य नव्हे. तूं आतां स्वस्थ पडून रहा—”

परंतु माझ्यानें स्वस्थ थोडेंच रहावतें. शुद्धींत येतांच पूर्वींचा तो सारा प्रकार माझ्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभा राहिला होता. आतां मी पलंगावर एकदम उठून बसलें व रागारागानें त्यांच्याकडे पहात ह्मणालें “मी चांगली शुद्धीवर आहें. भ्रमांत नाहीं. माझें आतां या जगांत कोण आहे? मी कुणाच्या आशेवर प्राण धारण करावे? आपणतर मला दगा दिला. मला केवढी आशा होती, आणि आपणहि मला केवढीं वचनें दिलीं होतीं! आपल्या मनांत जर असें कपट होतें, तर मला भोळ्या गाईला कां आशा दाखविलीत? माझी मान उंटासारखी, पाय बगळ्यासारखे, देह स्थूल, मी आपल्याला मुळींच आवडत नाहीं—”

“अं! तूं हें काय ह्मणत आहेस? माझ्या लक्ष्यांत येत नाहीं? थट्टा सोड, मला खरें सांग, तुला तुझ्या जीविताचा असा वीट कां आला?”

“आणखी वर खुळ्याचें सोंग घ्यायचें वाटतें? करूनसवरून नामानिराळे झाल्यानें आतां मी थोडीच फसणार आहें? परंतु आपलें अंतःकरण इतकें कठोर असेल, अशी मीं कधीं कल्पनाहि केली नव्हती.”

“तूं मला असें संशयांत पाडूं नकोस, स्पष्ट काय तें सांग. खचीत तुझे कुणीं तरी कान भरले आहेत. माझे विचार असे आहेत हें तुला कुणीं सांगितलें?”

"तुह्मां पुरुषांचा कपटी, कठोर स्वभाव माझ्या पुरा प्रत्ययास आला आहे. आपण प्रत्यक्ष बोललां आहां आणि मीं माझ्या कानांनीं ऐकिलें आहे. मला दुसऱ्या कुणींहि सांगितलें नाहीं—"

"भलतेंच! मी असें कधींहि बोललों नाहीं!"

"आणखी मलाच खोटी करतां? त्या दिवशीं बाबांजवळ तुह्मी नाहीं बोललां?"

"छट्! मुळींच नाहीं!!"

"मी तुमच्याशीं भाषण करूं इच्छित नाहीं! धडधडीत बोलून पुनः निश्शंकपणें नाकबूल जाणारे आपण थोर गृहस्थ आहां. अशा माणसाला दुरूनच नमस्कार असो—"

"वेडीरे वेडी! तूं काय भलतेंच वेड मनामध्यें भरून घेतलेंस हें! आतां मला आठवतें. मी तसें बोललों होतों खरा, पण तें तुझ्यासंबंधीं नव्हे—"

मीं मोठ्या आतुरतेनें परंतु बाहेरून सरोष मुद्रा करून विचारिलें "आतां माझ्या तोंडाला पानें पुसायला पहातां होय? पण मी अशानें फसली जाणार नाहीं! माझ्यासंबंधीं नव्हे तर कुणासंबंधीं तें बोललां होतां, सांगातर खरे!"

"तूं एवढी वेडी कशीग झालीस! मी तें सर्व बाबांच्या घोडीसंबंधानें बोलत होतों. लग्न झाल्यावर स्वताची गाडी ठेवण्याचा माझा विचार होता व त्यासाठीं त्या घोडीबद्दल आमचें भाषण चाललें होतें."

या वेळीं माझी अवस्था काय झाली ह्मणून सांगूं! मेल्यापेक्षांहि मेल्यासारखी होऊन मी फार लाजलें. माझ्या दोन्ही डोळ्यांतून आनंदाश्रूंचा सारखा पूर वाहूं लागला. थोड्या वेळानें शांत होऊन मीं सारी हकीकत तिकडे सांगितली व ह्मणालें "त्या मेल्या घोडीसंबंधीं आपण जें जें बोललां तें तें सर्व मी मलाच उद्देशून असल्याचें समजलें व त्यामुळें क्रोधानें संतप्त होऊन अशी स्थिति प्राप्त करून घेतली."

हें ऐकतांच तिकडे खो खो हंसूं लागले. सर्व मंडळीहि खोलींत जमली. ती हकीकत कळतांच मंडळीमध्यें जो हंशा पिकला, कांहीं विचारूं नका!

* * * * *

लवकरच मार्गशीर्ष शुद्ध अष्टमीच्या शुभ मुहूर्तावर मोठ्या थाटानें आमचा लग्नसमारंभ झाला. तीच घोडी हल्लीं आमची गाडी ओढित असते, हें सांगायला कोच!



# मृत पतीस.

आळवूं किति हो किति सखया ! ध्रु०

निमिलिता नता नयन–कमलिनी
निरखुनी, हृदय वितळे
तरि नये— कशी बरें
मनीं जरा– दया, सया !
किति हो किति सखया ! १

मज दिलें भलें परिणयक्षणीं
वचन, तें विसरलां का ?
करुं नका— करुं नका—
दूर मला, सवेंचि— न्या !
किति हो किति सखया ! २

विरह हा अहा ! सहन करुं कसा ?
वदुं कुणा दुःख सगळें ?
कां वदा न— कां वदा न—
मौन्य— व्यर्थ— कासया ?
किति हो किति सखया ! ३

बांधिलें करें तुह्मिच अलक तें
परकरिं— वाहुं कैसें—
मज गडे !— न्या सवें—
जोडितें प्रिया !— करद्वया !
किति हो किति सखया ! ४

गतधवा गडे ! अशुभ मानुनी
छळतील लोक सगळे !
करुं कसें— सहन तें—
नको जिणें— वियोगिं या—
किति हो किति सखया ! ५

## गोष्ट ३ री.

# माझी पहिली वकिली.

सन १९०— च्या उन्हाळ्यांतील गोष्ट. दिवाणी कोर्टास सुटी होती. फक्त फौजदारी कामेंच कायतीं चालत होतीं. मला नुकतीच वकिलीची सनद मिळून मी कोर्टांत जाऊंयेऊं लागलों होतों. अद्यापपावेतों एकहि केस मिळाली नव्हती. आमच्या येथील दुसरी बहुतेक वकील मंडळी हवा खाण्यासाठीं बाहेरगांवीं गेल्यामुळें दोनतीन मॅजिस्ट्रेट कोर्टांत कांहीं जुजबी कामें मिळून कांहीं प्राप्ति झाल्यास पहावें, असा विचार करून मी बाहेरगांवीं हवा खावयास न जातां दररोज कोर्टांतच येरझारी करित होतों, हें कळविण्याची आवश्यकता नाहीं.

तारीख २३ बुधवारीं मॅजिस्ट्रेट कोर्टांत डाकेचा तांगा लुटल्याबद्दल खटला चालावयाचा होता. त्यांत एका आरोपीतर्फे मला वकीलपत्र मिळालें होतें. अर्थात् ही माझी पहिलीच केस होती! आमचा पक्षकार कच्च्या कैदेंत होता, त्यास मीं मंगळवारीं सकाळीं भेटण्यास गेलों. माझ्या पक्षकाराचें व माझें बराच वेळ बोलणें झालें त्यावरून मला असें आढळून आलें कीं, ज्या रात्रीं डाकेचा तांगा लुटला, त्याच रात्रीं आमचा पक्षकार आपल्या कांहीं सोबत्यांबरोबर — गांवीं गेला होता. तेथें एका पिठ्यांत सर्वजण जास्तकमी दारू पिऊन ते—गांवीं परत येत असतां —हून जाणारा डाकेचा तांगा त्या मंडळीस रस्त्यांत भेटला. त्या मंडळीपैकीं बरेचजण दारूनें तर्र झाले होते. गाडीचा आवाज दुरून त्यांचे कानीं येतांच तो डाकेचाच तांगा आहे असें त्यांनीं ओळखून त्याजवर छापा घालण्याचा त्यांचा बेत ठरला; मग काय! तांगा त्यांचे जवळ येतांच एकादोघांनीं त्याचे घोडे धरले. एकानें तांगेवाल्यास खालीं ओढिलें व एकानें डाकवाल्यास धरून त्या दोघांच्या धोतरानें मुसक्या आंवळून डाकेच्या पिशव्या घेऊन शेजारच्या शेतांत गेले व तेथें पिशव्या उघडून कांहीं बंग्यांत दागदागिने, कांहीं पत्रांत नोटा वगैरे पांच-सहाशें रुपयांचा माल हातीं लागला तो घेऊन बाकी सर्व तेथेंच टाकून, ते सर्व पळून गेले. माझ्या पक्षकारानें मला एवढें मात्र अगदीं शपथ घेऊन सांगितलें कीं "मीं आपल्या सोबत्यांस तसें न करण्याबद्दल त्यांचें मन वळविण्याचा बराच प्रयत्न केला, परंतु ते कांहीं ऐकतचना. मी शेवटपर्यंत त्यांचे बरोबर होतों खरा, परंतु तें कृत्य करण्यास मीं मदत केली असेल, किंवा त्यांतील एका वस्तूसतरी हात लाविला असेल, तर शपथ! नंतर माझे ते सर्व सोबती तेथून फरारी झाले.

मीमात्र तांगेवाल्याच्या त्या वेळीं दृष्टीस पडलों असेन, त्यावरून त्यानें आतां मला ओळखल्यावरून पकडला गेलों आहें."

तांगा लुटल्यावर दुसरे दिवशीं पोलिसाला त्या शेतांत पोस्टाच्या पिशव्या, फुटक्या बंग्या, बरीचशीं फाडलेलीं व इतर पत्रें वगैरे सर्व वस्तू सांपडल्या. त्यांतील जीं पत्रें फाडलेलीं होतीं, त्यांच्या नकला करून, त्या, ज्या त्या पत्त्यावर घडलेल्या गोष्टींच्या खुलाशासह पोलिसानें पाठवून दिल्या, व बाकी सर्व वस्तू पोस्टखात्याच्या स्वाधीन करण्यांत आल्या. जीं अस्सल पत्रें पोलिसानें ठेविलीं होतीं, तीं खटल्यांतील पुराव्याच्या कागदांत सामील झालीं असल्याकारणानें तीं त्याच दिवशीं मला पहाण्यास मिळालीं.

याप्रमाणें मंगळवारीं सकाळीं बारा वाजेपर्यंत खटल्याची सर्व कच्ची हकीकत मीं पाहून ठेविली व नंतर वेळ जाईना म्हणून सहज मॅजिस्ट्रेट कोर्टांत दुसरा एक खटला चालला होता, तो पहात बसलों. त्या खटल्याची हकीकत पुढीलप्रमाणें होती:—

गांवीं ताराबाई नांवाची एक वृद्ध जहागीरदारीण रहात असे. तिचे निजावयाचे खोलींतील पेटींतून शंभर रुपयांच्या नोटा चोरीस गेल्या होत्या. त्या बाईकडे कमळा नांवाची एक पंधरासोळा वर्षांची मुलगी चाकरी करित होती. त्या मुलीच्या खासगी पेटींत तपासाचे वेळीं पंचवीस रुपयांच्या नोटा मिळाल्या व त्या नोटा आपल्या चोरीस गेलेल्या नोटांपैकींच असल्याबद्दल त्या वृद्ध बाईचें म्हणणें होतें. त्यावरून त्या मुलीवर चोरीचा आरोप आला होता. त्या पोरीनें गयावया करून पुष्कळ सांगितलें, कीं "आपण नोटा पाहिल्याहि नाहींत! कुणींतरी दुष्टाव्यानें त्या आपल्या पेटींत ठेविल्या आहेत." परंतु वरील मजबूत पुरावा असल्यावर तिच्या म्हणण्यावर विश्वास कसा बसावा! मीमात्र तिच्या मुद्रेकडे बराच वेळ एकसारखा निरखून पहात होतों. त्यावरून तिनें अपराध केला असावा, अशी तिच्या चेहऱ्यावरूनतरी माझी खात्री पटेना. खटला सुरू होण्याच्या बेतांत आला होता. इतक्यांत एक चोवीसपंचवीस वर्षांचा जवान इसम मी बसलों होतों त्या खुर्चीचे मागें येऊन माझे कानांशीं लागून म्हणाला "रावसाहेब, आपण वकिलीचें काम चांगलें करतां अशी आपली कीर्ति आहे—"

मीं लगेच मागें वळून त्याच्याकडे पाहिलें व म्हणालों "चांगली कसली, पण वकिली करितों खरी—"

ह्या माझ्या उत्तराची वाट न पहातां तो इसम केंविलवाणें तोंड करून अगदीं काकुळतीस येऊन म्हणाला "रावसाहेब, गरिबावर दया करून त्या पोरीसाठीं कांहीं

खटपट कराल काय! ती पोर अगदीं निरपराधी आहे. जर तिला सोडवाल, तर—"

बोलतांबोलतां बिचाऱ्याचा कंठ भरून आला. मीं त्यास विचारिलें "त्या मुलीच्यातर्फे कोणी वकील नाहीं काय?"

तो ह्मणाला "छे हो! त्या गरीब बिचारीला कोण वकील मिळतो. परंतु जर आपण प्रयत्न करून तिला सोडवाल, तर मीं आपल्या चामड्याचे जोडे करून ते तुह्मांला घालीन. देव तुह्मांला यांत खास यश देईल."

मीं क्षणभर विचार केला व त्या मुलीकडे जरा जास्त निरखून पाहिलें. तीहि मजकडेसच टक लावून पहात होती. जणूं काय आपल्या म्लान चेहेऱ्यानें व अश्रुपूर्ण नेत्रांनीं "मला तुह्मीतरी वांचवाहो!" असें ह्मणत आहे, असें मला वाटलें. मला तिची दया येऊन तिच्यातर्फे काम करण्याचा माझा ताबडतोब निश्चय झाला. लागलाच मी उठून त्या मुलीजवळ गेलों व "तुझें काम मी चालवूं काय?" ह्मणून तिला विचारिलें. तिनें मानेनेंच संमतिदर्शक खूण केली. मी परत खुर्चीशीं गेलों व "आरोपीतर्फे मी हजर आहें व आरोपीची व माझी थोडा वेळ एकीकडे भेट होण्याबद्दल परवानगी मिळावी." अशी मॅजिस्ट्रेटसाहेबांस विनंती करून त्या मुलीस घेऊन जरा बाजूस गेलों, व तिची हकीकत मोकळ्या मनानें सर्व सांगण्यास तिला सांगितलें. तेव्हां कमळेनें मला पुढील हकीकत सांगितली.

कमळा ह्मणाली "बाईसाहेबांजवळ चाकरीस राहिल्यास मला सुमारं दोन वर्षं झालीं. या दोन वर्षांत मला बाईसाहेबांनीं फार चांगल्या रीतीनं वागविलं आहे. त्या मजवर फार ममता करितात. सुमारं आठ दिवसांपूर्वी बाईसाहेबांच्या शंभर रुपयांच्या नोटा चोरीस गेल्या, त्या त्यांच्या निजण्याच्या खोलींतील पेटींत ठेविलेल्या होत्या. बाईसाहेबांनीं मला त्याबद्दल विचारिलं; परंतु मला त्यासंबंधीं कांहींच माहीत नव्हतं, तेव्हां मीं त्यांस काय सांगूं? आमचे वाड्यांत साळूबाई जगतापीण नांवाची एक स्वयंपाकीण आहे. तिनं बाईसाहेबांस असं सांगितलें कीं, मीं बाईसाहेबांचे पेटींतून नोटा काढतांना तिनं दाराचे फटींतून मला पाहिलं; आणि माझी पेटी उघडून पहातां तींत पंचवीस रुपयांच्या नोटा मिळाल्या; परंतु वकीलसाहेब! तुमच्या पायांची शपथ सांगतें कीं, मी त्या नोटांनां शिवलेंसुद्धां नाहीं! तुह्मी माझे मायबाप आहां, कसंहि करून मला यांतून सोडवा."

यानंतर कमळेचा कंठ भरून आल्याकारणानें तिला बोलवेना. मीं तिचा हुंदका जाईपर्यंत जरा विचार केल्यासारखें करून नंतर तिला विचारिलें "तुला कुणाचा वहीम आहे काय?"

कमळा ह्मणाली "साहेब! हें मला कसं सांगतां येईल? परंतु बाईसाहेबांचा मजवर लोभ असल्याकारणानं साळूबाई माझा फार द्वेष करिते. तेव्हां तिच्या शिवाय दुसरं कोण असं करणार आहे."

साळूबाई कोर्टांत साक्ष देण्याकरितां हजर होतीच. तिच्याकडे बोट करून "ती पहा साहेब साळूबाई!" असें ह्मणून कमळेनें मला सुमारें पंचवीस एक वर्षांचे वयाची एक काळी व लठ्ठ बाई दाखविली.

साळूबाई जगतापीण हें नांव ऐकतांच माझे मनांत एक निराळाच विचार येऊन मीं त्या मुलीला विचारिलें "कायग, याच बाईचें नांव साळूबाई जगतापीण?"

कमळा ह्मणाली "होय साहेब."

"बरें, याच नांवाची कुणी दुसरी एखादी बाई या गांवीं आहे काय?"

"नाहीं साहेब."

"हें बघ, तूं कांहीं काळजी करूं नको; मी आपलेकडून प्रयत्न करितों, देवावर हवाला ठेव, तो तुला यांतून खास सोडवील."

त्या पोरीचे डोळे पाण्यानें भरून आले. मलाहि जास्त बोलवेना. ह्मणून मी तिला तशीच सोडून तेथून निघालों.

मी तेथून निघालों तो थेट आमचे दुसऱ्या दिवसाच्या दरवड्याच्या खटल्याचे कागद ज्या सरकारी वकिलाजवळ होते त्याच्या आफिसांत गेलों व ते पुन्हा पहाण्यास मागितले. त्यांतून एक कागद निवडून तो मीं आपलेजवळ घेऊन पुनः कोर्टांत आलों.

या वेळीं ताराबाई जहागीरदारीण यांची जबानी सुरू झाली होती. त्यांनीं आपल्या सर तपासणींत असें सांगितलें कीं "माझा आरोपीवर विश्वास होता व मी आपल्या खोलीच्या किल्ल्या आरोपीवर सोंपवून जात असें. माझ्या खोलींत आरोपीशिवाय दुसऱ्या कुणासहि येण्याची परवानगी नाहीं."

नंतर नोटा पेटींत कशा ठेविलेल्या होत्या, व कशा हरवल्या वगैरेबद्दल त्यांनीं सविस्तर वर्णन करून शेवटीं त्यांपैकीं पंचवीस रुपयांच्या नोटा आरोपीचे पेटींत कशा सांपडल्या, याबद्दल सर्व हकीकत सांगितली. नंतर मीं त्यांची तपासणी सुरू केली. मीं विचारिलें "ताराबाई, मला असें सांगा कीं, पहिल्यानें नोटा गेल्याबद्दल ज्या वेळीं तुह्मांस समजलें, त्या वेळीं त्या आरोपीनेंच नेल्या असाव्या, असा तुह्मांला संशय आला होता काय?"

ताराबाई ह्मणाल्या "छे मुळींच नाहीं."

"जर साळूबाईनें तुह्मांला आरोपीची पेटी शोधा, ह्मणजे त्यांत पंचवीस रुपयांच्या नोटा सांपडतील, असें सांगितलें नसतें, तर आरोपीची पेटी शोधण्याची कल्पनातरी तुमचे मनांत आली असती?"

"नाहीं."

यापुढें तूर्त या बाईस तपासण्याची नाहीं, असें कोर्टास कळवून मीं साळूबाईची साक्ष होण्यासाठीं तिचे नांवाची पुकारणी करविली. साळूबाई मोठ्या दिमाखानें हळूहळू पावलें टाकित साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत येऊन उभी राहिली. 'आपल्या वकिलीच्या शाब्दिक जाळ्यांत मला कसा पकडतोस तें पहातें!' असेंच जणूं काय ती ह्मणत आहे, अशा अर्थपूर्ण दृष्टीनें तिनें मजकडे तिरस्कार मुद्रेनें नजर फेंकिली.

तिनें आपल्या सर तपासणींत असें सांगितलें कीं "ज्या रात्रीं चोरी झाली, त्या रात्रीं मीं आरोपीस जिना चढून बाईसाहेबांच्या खोलीकडे जातांना पाहिलें व तिच्या त्या हळूहळू पावलं टाकण्याच्या, चोरून चोहोंकडे पहाण्याच्या व इतर वर्तनावरून या पोरीच्या मनांत कांहींतरी काळंबेरं आहे, असं मीं ताबडतोब ताडलं व मीहि हळूच पाऊल न वाजवितां तिचे मागून गेलें. पुढं कमळी बाईसाहेबांच्या खोलींत गेली व तिनं हळूच दरवाजा लावून घेतला. मी दाराच्या फटींतून पहात होतें. ती पेटीजवळ गेली व पेटी उघडून तींतून पैसे काढून ते तिनं आपल्या ओच्यांत घातले, हें मीं पाहिलं. नंतर तिनं खालीं ओणवून दिवा उचलला व ती परत बाहेर पडण्याच्या बेतांत आहे असं पाहून मीहि ताबडतोब तेथून निसटलें."

नंतर साळूबाईनें ही गोष्ट बाईसाहेबांस कधीं सांगितली व आरोपीची पेटी शोधण्याबद्दल आपण बाईसाहेबांस कसें सुचविलें वगैरेबद्दल फार तिखटमीठ लावून पाल्हाळिक मजकूर सांगितला.

साळूबाईस जरा कोर्टाच्या बाहेर पाठवून ताराबाईस मला एकदोन प्रश्न विचारावयाचे होते, ह्मणून मीं कोर्टास तशी विनंती केली. कोर्टानें साळूबाईस बाहेर जाण्यास सांगून ताराबाईस पुन्हा बोलाविलें. ताराबाई येतांच मीं त्यांनां विचारिलें "बाईसाहेब! आपण आतांच असें सांगितलें कीं, आरोपीशिवाय दुसरे कुणास तुमचे खोलींत येण्याची परवानगी नाहीं, याचा अर्थ काय? साळूबाईच्या मनांत असेल तर तिला तुमच्या खोलींत जातां येणार नाहीं काय?"

ताराबाई ह्मणाल्या "हो, जातां येईल तर काय झालं. माझ्या मघांशीं बोलण्याचा अर्थ इतकाच होता कीं, आरोपीशिवाय दुसरे कुणासहि त्या खोलींत जाण्याची मजकडून मोकळीक नव्हती."

"तुम्ही पैसे कुठें ठेवितां, हें साळूबाईस माहित असण्याचा संभव आहे काय?"

"हो, तिला माहीत आहेतर! पुष्कळ वेळां बाजारांतून सामान आणण्यासाठीं पैसे मागण्याकरितां ती माझ्या खोलींत आलेली आहे."

"तुमचेकडे चोरी झाल्यानंतर आरोपीनें कधीं पैसे खर्च केले आहेत काय?"

"मीं पाहिलेलं नाहीं."

"तुम्ही नोकरांस पगार देतां, त्याबद्दलच्या पावत्या तुम्ही घेतां काय?"

"हो, नेहमीं."

"बरें, कोर्टानें परवानगी दिल्यास साळूबाईकडून घेतलेल्या पावत्या तुम्ही जाऊन आतांचेआतां आणाल?"

"हो, मला काय हरकत आहे आणायला!"

"साळूबाईच्या पावत्या मला आतां पाहण्यासाठीं पाहिजे आहेत, सबब त्या आणविण्याकरितां कोर्टानें परवानगी द्यावी." अशी मीं कोर्टास विनंती केल्यावरून ताराबाईनें घरीं जाऊन चारपांच पावत्या आणून त्या माझे स्वाधीन केल्या.

यानंतर "ताराबाईची तपासणी पुरी झाली आहे व साळूबाईस मला थोडे सवाल करावयाचे आहेत, सबब तिला आंत बोलवावी." अशी मीं कोर्टास विनंति केल्यावरून साळूबाई पुनः आंत आली. या वेळींसुद्धां ती पहिल्याप्रमाणेंच मोठ्या धिटाईनें उभी राहिली होती. परंतु ती आतां जरा घावरलेली आहे, असें मीं तिच्या चेहेऱ्यावरून ताडिलें. मीं विचारिलें "साळूबाई, आरोपीनें पेटींतून पैसे काढल्याची गोष्ट तुम्हीं ताबडतोब बाईसाहेबांस कां नाहीं कळविली?"

साळूबाई म्हणाली "मी कशाला उगाच लोकांच्या चहाड्या सांगूं? मीं म्हटलें, जें करील तें भरील, आपण कशाला आजच्च पोरीच्या पोटावर पाय आणा!"

"पण काहो बाई! आरोपीला पैसे काढतांना तुम्हीं दाराच्या फटींतून पाहिलें, असें तुम्हीं मघां सांगितलें नव्हे का?"

"हो हो! असं पुनःपुनः विचारून मला कां उगाच त्रास देतां?"

"मग काय हो! त्या पोरीनें आंत शिरल्यापासून पुनः परत फिरेपर्यंत कायकाय केलं, हें सर्व तुम्हीं स्पष्टपणीं पाहिलें असेलच?"

"हो, अगदीं सगळं कांहीं पाहिलं."

"तर मग आतां मला असें सांगा, त्या पोरीनें तें काम करित असतां हातांतील दिवा कुठें ठेविला होता?"

"पेटी शेजारींच एक कपाट आहे त्या कपाटावर—"

"मग तुह्मीं मघांशीं 'आरोपीनं खालीं ओणवून दिवा उचलला' असें सांगितलें तें खरें नव्हे तर?"

या वेळीं साळूबाई जरा घाबरली व "तसं मीं कांहीं सांगितलं नाहीं. दिवा उचलला, इतकंच ह्मटलं असेल—" असें उडवाउडवीचें उत्तर दिलें.

"बरें, तुह्मी ताराबाईकडे चाकरीस राहिल्याला किती दिवस झाले?"

"झाले असतील सुमार आठदहा महिने."

"बाईसाहेब तुह्मांला पगार काय देतात?"

"दर महिन्यास सात रुपये."

"आजपर्यंतचा सर्व पगार तुह्मांला मिळाला असेलच?"

"नाहीं, कांहीं मिळाला आहे—"

"किती?—पन्नास रुपये?"

"तें कसं मला नेमकंच सांगतां येईल?"

"कां बरें सांगतां येणार नाहीं?"

"मीं जसजसे लागतील तसतसे पैसे घेतले आहेत. मीं काय त्याचा हिशोब ठेविला आहे तर तुह्मांला नेमकंच सांगूं?"

"बाई, अशा रागावूं नका. पण जर तुमच्या मनांतून आरोपीवर कांहीं कज्याळ उपस्थित करण्याचें आलें असतें, तर आरोपीच्या पेटींत ठेवण्याकरितां पंचवीस रुपये तुह्मांला मिळाले असते कीं नाहीं?"

"हें हो काय तुमचं भलतंच विचारणं? माझ्या कशाला मनांत येईल तिच्या पेटींत पैसे ठेवण्याचं? व माझेजवळ इतके पैसेतरी कुठं आहेत?"

"तरमग तुह्मीं चाकरीस राहिल्यापासून अजून कांहीं पैसे सांठविले नाहींत?"

"छे. बाईसाहेबांकडे काय हिशबानं फिरत असतील तितकीच माझी शिल्लक—"

"तरमग कदाचित् तुह्मीं बाईसाहेबांकडे चाकरीस रहाण्याकरितां आलांत त्या वेळीं तुह्मीं आपल्याबरोबर पंचवीस रुपये आणले असाल?"

"छे हो! माझे जवळहो कुठली इतकी रकम! आणि कां हो वकिलसाहेब! त्या पोरीच्या पेटींत ज्या नोटा सांपडल्या, त्याच बाईसाहेबांच्या हरवलेल्या नोटांपैकीं होत्या, हें नाहींका तुमच्या लक्ष्यांत?"

साळूबाईच्या समजुतीप्रमाणें उलट मला पकडल्यासारखा हा जबाब होता.

मीं त्या जबाबाकडे दुर्लक्ष्य केल्यासारखें करून पुनः तिला विचारिलें "बाई, तुह्मी कुठच्या राहणाऱ्या हो?

"कां? मी —गांवची."

"तेथें आपलीं कोणकोण आहेत?"

"तुह्मांला कायहो जरूर या प्रश्नाची?"

" आपलें उगीच ! सांगण्यास कांहीं हरकत असेल तर नाहीं विचारीत !"

"आहे एक बहीण—"

"त्या आपल्या बहिणीचें नांव काय?"

आतांतर साळूबाई फारच चवताळली. "माझ्या बहिणीच्या नांवाशीं तुह्मांला काय करायचं आहे?"

" पण नांव सांगायला कोणती हरकत आहे?"

"भीमाबाई."

मीं जरा विचार केल्यासारखें करून पुनः विचारिलें "साळूबाई, आतां एकाच प्रश्नाचा जबाब द्या. तुह्मीं सुमारें पांच दिवसांपूर्वीं —गांवीं तुमच्या बहिणीला पंचाहत्तर रुपये पाठविले, ते कुठून आणलेत?"

झालें. हा माझा प्रश्न ऐकण्याबरोबर त्या बाईला विजेचा धक्का बसल्यासारखें होऊन तिच्या सर्वांगास दरदरून घाम सुटला व चेहेरा अगदीं काळवंडला. ती मटकन् तेथेंच खालीं बसली. मीं जरा वेळ जाऊं दिला व पुनः तिला तोच प्रश्न विचारिला.

"मी—मी—साहेब—नाहीं—" असें ती घाबरून मटकन् खालीं बसून तोंडातल्यातोंडांत कायसें बोलली.

"बाई, खरें बोला! तुह्मीं पाठविले आहेत!" मीं ठांसून रागाचा आवेश आणून पुन्हा विचारिलें.

साळूबाई ह्मणाली "मी नाहीं हो साहेब! कशावरून हो तुह्मी माझेवर हें बालंट आणितां?"

मीं त्या बाईस पुनः प्रश्न विचारण्याचें सोडून देऊन उभा राहून कोर्टास उद्देशून ह्मणालों "कोर्टाच्या परवानगीनें मला दोन शब्द सांगावयाचे आहेत. उद्यां याच कोर्टांत एका आरोपीवर डाक लुटल्याचा आरोप आल्यावरून त्याची चौकशी व्हावयाची असून त्या खटल्यांत मी आरोपीतर्फे वकील असल्याकारणानें, मी आज कोर्टांत खटल्याचे कागद पहाण्याकरितां आलों होतों. त्या कागदांत लखोटे फोडून त्यांतील नोटा काढून घेऊन आंतील अस्सल पत्रें सांपडलेलीं त्या खटल्यांत मुद्देमाल वस्तूंत आलीं आहेत व तीं पत्रें मीं आतांच सर्व तपासलीं आहेत. आजरोजीं खटला आपल्यासमोर सुरू होतांच या खटल्यांत साळूबाई जगतापीण

नांवाच्या बाईचें नांव बरेंच वेळां ऐकिलें व त्या दरवड्याचे खटल्यांतील कागदांत याच सईचें एक पत्र पाहिल्याची मला आठवण झाल्यामुळें, तें पत्र मीं कोर्टांत आणिलें आहे. हें तें पत्र! हें पत्र डाकेच्या लुटींत जीं पत्रें फाटलीं गेलीं, त्यांपैकीं आहे व या पत्रासोबत पाऊणशें रुपयांच्या नोटा असाव्या, असें आंतील मजकुरावरून दिसत आहे. या पत्राच्या लखोट्यावर जो पोष्टाचा छाप आहे, त्याकडे पाहिलें असतां हें पत्र ज्या रात्रीं ताराबाईकडे चोरी झाली असें फिर्यादीतर्फेचें कथन आहे, त्याच्या दुसरे दिवशीं पोष्टांत टाकलें आहे, असें कोर्टाच्या सहज नजरेस येणार आहे. कोर्टाची परवानगी असल्यास तें पत्र मी आतां वाचून दाखवितों." असें बोलून तें पत्र मीं उघडिलें. त्यावर तारीख महिना वगैरे कांहीं नव्हतें. फक्त पुढीलप्रमाणें मजकूर होता:—

" भीमाताई ईस साळूचे फार फार दंडवत.

या लखोट्यांत पंचाहतर रुपयांच्या नोटा पाठविल्या आहेत. त्या मी घरीं येईपर्यंत चांगल्या संभाळून ठेव. मीं आपलेजवळच ठेविल्या असत्या, पण चोरीच्या भीतीनें ठेविल्या नाहींत. याबद्दल कुणाजवळहि एक अक्षरसुद्धां बोलूं नको. कारण माझेजवळ इतके पैसे आहेत, हें मला बाहेर फोडावयाचें नाहीं. इथें माझें चांगलें चाललें आहे. मागें मीं तुला सांगितलेली कमळी नांवाची पोर अजून इथेंच आहे. पण इथून तिला घालवून लावीन, तरच मी साळूबाई नांवाची होईन. माझें सगळ्यांस विचारणें सांग. कळावें,

साळूबाई जगतापीण."

याप्रमाणें तें पत्र वाचून झाल्यानंतर तें व ताराबाईनीं मजजवळ दिलेल्या साळूबाईच्या पावत्या मी माजिस्ट्रेटसाहेबांच्या स्वाधीन करून ह्मणालों "या पत्राचे लखोट्यावरील पत्त्यावरून हें —गांवीं भीमाबाई नांवाच्या बाईस पाठविलें आहे, हें कोर्टाच्या सहज ध्यानांत येईल. या पत्राचें व पावत्यांचें अक्षर एकच आहे, हेंहि कोर्टाच्या लक्ष्यांत आल्यावांचून रहाणार नाहीं. ताराबाईच्या चोरीस गेलेल्या शंभर रुपयांची कशी वासलात लागली असावी, हेंहि समजणें आतां फारसें कठीण नाहीं. त्या शंभर रुपयांपैकीं पाऊणशें रुपये या पत्रासोबत —गांवीं जावयाचे होते व बाकीचे पंचवीस रुपये खरा गुन्हेगार लपला जावा ह्मणून या निरपराधी पोरीच्या पेटींत गेले."

पत्र व पावत्या पाहिल्यावरोबर कोर्टाची खात्री झाली व खटल्याची जास्त चौकशी न करितां कमळेला दोषमुक्त ठरवून तिला सोडून देण्यांत आलें.

ज्या तरुण मनुष्याच्या रदबदलीवरून मी या खटल्यांत पडलों होतों, तो, मी खुर्चीवरून उठतांक्षणींच धावत आला व माझ्या पायांवर त्यानें एकदम लोटांगण घातलें. त्याला एक शब्दहि बोलवेना, इतका या वेळीं त्याचा कंठ भरून आला होता. आपण कुठें आहों, हेंदेखील तो विसरला व कमळेला पिंजऱ्यांतून बाहेर काढतांना पाहून त्यानें एकदम धावत जाऊन तिला मिठी मारिली. ती पोरहि त्याचे छातीवर मान टाकून मोठ्यानें पुष्कळ रडली.

साळूबाईची नंतर काय अवस्था झाली, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. थोडकेच दिवसांनीं तो तरुण मनुष्य मजकडे पुनः आला व मीं त्याजवर केलेल्या उपकाराची खूण ह्मणून त्यानें मला एक सुमारें शंभर रुपये किंमतीची आंगठी घेण्यासाठीं फारच आग्रह केला. नाइलाजास्तव मीं ती आंगठी घेतली. पुढें बोलतां बोलतां कमळेचें व त्याचें लवकरच लग्न होणार आहे असें त्याजपासून समजतांच ती आंगठी आपल्या बायकोस माझेकडून आहेर घेऊन जा, असें सांगून मीं ती परत त्याचे स्वाधीन केली.

# आम्रतरु.

परमेश्वराची कृति अगाध आहे. कितीहि विद्वान् मनुष्य असो, त्याला परमेश्वराच्या कृतीची पूर्ण माहिती नाहीं. परमेश्वराची कृति मानवास अज्ञेय आहे. असें जरी आहे, तरी ईश्वरनिर्मित सृष्टीचें सकौतुक दृष्टीनें अवलोकन करूं लागलें असतां मनास आनंद होऊन बोधहि मिळतो. मुलाकडे पाहूं लागलें असतां जशी बापाच्या स्वरूपाची मन कल्पना करितें, तशी सृष्टीकडे पाहूं लागलें ह्मणजे तिचा जनक जो सर्वसाक्षी परमेश्वर त्याच्या स्वरूपाची कल्पना मनांत येऊं लागते. आणि जसजसें सृष्टिसुंदरीचें जास्तजास्त अवलोकन करावें, तसतसा सृष्टिकर्त्याच्या स्वरूपाशीं जास्त परिचय होतो. त्या वेळीं चित्तवृत्ति तन्मय होऊन तोंडांतून साहजिकपणें उद्गार निघून जातात कीं "हे अघटितघटनापटो! काय तुझी ही लीला! सृष्टि निर्माण करण्यांत तूं पूर्ण कौशल्य खर्चिलें आहेस. प्राणी, कीटक, वनस्पत्यादिकांस निर्माण करून त्यांच्या विशेष गुणांपासून बोध घेण्यास आह्मां मनुष्यांस तूं कुशाग्रबुद्धि दिली आहेस. त्या बुद्धीचा आह्मी सदुपयोग करूं, तर तुझी महती आह्मांस पूर्णपणें कळून येईल; परंतु त्या कुशाग्रबुद्धीचा आह्मी दुरुपयोग करून शाश्वत सुखास मात्र अंतरतों."

सृष्टिकर्त्यानें निर्मिलेल्या ह्या सृष्टींत वरवर पाहूं लागलें तर असें वाटेल कीं, सर्व प्रकारच्या वस्तु निर्माण करण्यांत देवाधिदेवानें पक्षपात केला आहे. एका वस्तूस सर्व लोक चहातात, तर दुसऱ्या वस्तूस नाक मुरडतात. एक उच्च स्थितींत आहे, तर दुसरी नीच स्थितींत असते. पण जरा विचार केला तर कळून येईल कीं, सृष्टींतील जीवकोटीस कोणत्याहि गोष्टीची वाण पडूं नये, ह्मणून प्रत्येक वस्तूस भिन्न स्थिति देणें भाग पडलें. शिवाय प्रसंगानुसार प्रत्येक वस्तूस महत्व चढतें. वस्तूंमध्यें जशी उच्चनीच स्थिति आहे, तशीच प्राणिकोटीमध्येंहि आहे. मनुष्य नीच स्थितीबद्दल खेद पावून हताश होतो, त्याला पुढील गोष्टीपासून समाधान व बोध करून घेतां येईल.

पद्मनाभ ह्मणून एक सतराअठरा वर्षांचा मुलगा होता. तो लहान असतांनाच त्याचे आईबाप निवर्तले होते. आजपर्यंत त्याचें संगोपन त्याच्या मातेकडील एका दूरच्या नातेवाइकाकडून झालें. त्या नातेवाइकाचा स्वभाव उदार होता. पद्मनाभ निराश्रित ह्मणून त्याला त्यानें आश्रयच दिला होता असें नाहीं, तर त्याच्या विद्याभ्यासाविषयींहि त्यानें उत्तम व्यवस्था ठेविली होती. त्या परोपकारी

गृहस्थाच्या सहवासांत पद्मनाभाचे आणखी कांहीं दिवस जाते, तर पद्मनाभास चांगली स्थिति प्राप्त झाली असती; परंतु दैवानें कोणास सोडिलें आहे ? सद्गुणी मनुष्यांचा स्वर्गी पुरवठा करण्याची यमराजांस स्वर्गपतीची आज्ञा असल्यामुळें, जगतीतलावरील चांगलें माणूस दिसतांच यमराज त्या माणसास स्वलोकीं घेऊन जातात. तो उदारधी, यमराजांचें बोलावणें येतांच भूलोकचा सर्व पसारा टाकून चालता झाला. पद्मनाभास सर्व आधार काय तो त्या सद्गृहस्थाचा, अर्थात् बिचारा पद्मनाभ फिरून उघडा पडला.

आईबाप वारले, तेव्हां तो उघडाच होता आणि आतांहि तो उघडाच झाला! आईबाप वारले तेव्हां तो बाळ होता, त्याला विशेषसें कळत नव्हतें; परंतु आतां त्याला बरेंवाईट समजत होतें. पुढें कसें, हा प्रश्न आतां त्याच्यापुढें उभा राहिला. त्याचें शिक्षण पुरें झालें नव्हतें व तें पुरें होण्याचा आतां मार्गहि नव्हता. नाइलाजास्तव त्यानें असा विचार केला कीं, कोठेंतरी लहानशी नोकरी पतकरावी. महत्प्रयासांनीं गांवांतीलच एका कारखानदारापाशीं त्याला एक नोकरी मिळाली.

पद्मनाभास दरमहा दहा रुपये मिळूं लागले. त्यांत तो आपलें पोट भागवून दोन पैसे मागें टाकूं लागला. अशा रीतीनें दोनचार महिने गेले, इतक्यांत गांवामध्यें भयंकर सांथीचा उपद्रव सुरू झाला. स्थानत्यागाशिवाय त्याला दुसरा उपाय नव्हता. उपद्रवाचा प्रादुर्भाव होतांच गांवांतील बहुतेक लोक आसपासच्या खेड्यांतून रहावयास गेले. कोणी मोकळ्या झोंपड्या घालून राहिले, कोणीं नदीच्या तीरीं वसति केली. पद्मनाभानेंहि भयंकर रोगाशीं सामना देण्याच्या भरीस न पडतां महाजनांनीं घालून दिलेला स्थानत्यागाचाच मार्ग सुधारला. गांवापासून दोनअडीच कोसांवर पाण्याची सोय पाहून बरेच लोकांनीं तळ दिला होता तेथें त्यानें आपलीहि एक लहानशी झोंपडी उभारली.

सुखवस्तु लोक जातील तेथें आपल्या सुखाच्या सोई करून घेतील. परंतु आमच्या पद्मनाभासारख्या दुर्दैवी लोकांची रानांत रहाण्याची मोठीच फजिती. त्यांना बाहेर रहाण्याचें संकट पडतें, परंतु आलेल्या प्रसंगाला सादर होण्याशिवाय दुसरा उपाय नसतो. पद्मनाभ हालअपेष्टेंत दिवस काढित होता. आठपंधरा दिवस झाले तसे ऊन, वारा, थंडी चालण्याचे श्रम हीं त्याच्या अंगवळणीं पडत चाललीं.

चांगल्या स्थितींत मित्र पुष्कळ असतात. पण निराश्रित, संकटग्रस्त लोकांस एकांतवास, दुःख, शोक, मनोराज्य यांशिवाय अन्य मित्रांचें दर्शन क्वचितच

लाभतें. अरेरे! ज्या वेळीं मित्रांची गरज त्या वेळीं ते दूर असावयाचे! पण जगांत बहुधा हेंच आढळतें. वरील प्रकारच्या दुर्दैवी लोकांस देव मात्र विसंबत नाहीं असें वाटतें. देव त्यांच्या अगदीं जवळ असतो; आणि ह्मणूनच कीं काय तीं प्रत्येक काम भीतभीत करतात.

विश्रांति सर्व विकारास अवश्य आहे; दुःखनिमग्न लोकांस दुःख भोगण्यास शक्ति यावी ह्मणून सुखाची झुळुक मधूनमधून सोडण्यांत येते. दुःखविषाचे फवारे सारखे उडत असतांना मधून सुटलेली सुखरूपी अमृताची चळक जरी विषरूपच बनते, तरी थोडा वेळ आनंद दिल्यावांचून रहात नाहीं. पद्मनाभास दुःखांत सुख एवढेंच होतें कीं, तो सृष्टिसौंदर्याचा पूर्ण भोक्ता असल्यामुळें त्याचा कंटाळवाणा आयुष्यक्रम थोडा वेळतरी आनंदांत जाई. झोंपडींत रहाण्यास आल्यापासून वनश्री त्याला नित्य पहाण्यास सांपडे.

झोंपडींत रहाण्यास आल्यापासूनचा पद्मनाभाचा दिनक्रम ह्मटला ह्मणजे सकाळीं उठल्यावर प्रातर्विधीला एक तास; स्नानसंध्या देवतार्चन यांस एक तास; नंतर पाकनिष्पत्ति करण्यास व भोजन आटोपून घेण्यास एक तास. अशा रीतीनें सकाळचे तीन तास जात. लागलीच गांवांत नोकरीवर जाण्याची तयारी करावी लागे. झोंपडीपासून कारखान्यांत येऊन पोहोंचण्यास एक तास लागे. दहांपासून पांचपर्यंत कारखान्यांत काम करावयाचें. पांचांनंतर सुट्टी.

सुट्टी झाल्यावर परत झोंपडीकडे येण्याच्या वेळीं पद्मनाभाची उदासीनवृत्ति जरा मावळून किंचित् खुललीशी भासे. याचें कारण तो रस्ता रमणीय होता. त्याच्या दोन्ही बाजूंस आम्रतरूंची ओळच्या ओळ लागली होती. आम्रतरूंवर संध्याकाळच्या वेळीं पक्षी जमत. त्यांच्या किलबिलाटानें तो पथ नादित होऊन हा पक्षिगण सृष्टिदेवतेचें स्तवन करित आहे कीं काय, असा भास होई. संध्याकाळच्या सुमंद शीतल वायूनें दिवसभर झालेल्या श्रमांचा पथिकास विसर पडे.

पद्मनाभ बराच मार्ग आक्रमण केल्यावर विश्रांतीकरितां एका ठिकाणीं बसे. तें ठिकाण उंचावर असल्यामुळें आसपासचा सर्व प्रदेश त्याला दिसे. चोहीं बाजूंचें अवलोकन केल्यावर क्षणभर त्याची आनंदवृत्ति पालटे. एक दीर्घश्वास सोडून तो ह्मणे "भगवन्! हे विश्वचालक! सर्व जगाची पहावी तर प्रगति होत आहे, पण माझीच मति कां कुंठितगति झाली आहे? सभोंवतालचीं हीं शेतें पहावीं, तर चांगलीं पिकून आपल्या धन्याच्या कल्याणार्थ झटत आहेत. येथून दिसणारी ही पुष्पावति नदी, सर्वकाल वहात असून ती परोपकारांत दक्ष आहे.

मनुष्यें, जनावरें आणि वनस्पति ह्यांच्या उपयोगाकरितां ती आपला देह खर्चित आहे. पद्दा तिनें आपल्या सान्निध्यानें जवळचीं शेतें सुपीक केलीं आहेत. ही आम्रतरूंची रांगच्या रांग आलेल्या मोहोरानें किती सुशोभित दिसत आहे! थोड्याच दिवसांनीं हे वृक्ष आम्रफलभारानें लवून जातील. हे आम्रतरु पथिक-जनांनां आपल्या गर्द छायेनें आनंद देतात. आपल्या अंगावर पक्षिगणास विहार करूं देतात. एकंदरींत यांचा काळ मोठ्या आनंदांत आणि परोपकारांत जात आहे. सभोंवतालचा सर्व प्रदेश आनंदी व उत्साही दिसतो. मीच दुःखी व निरुत्साही कसा? परमेश्वरा! मी धडधाकट आहें; मनुष्याला असणारे माझे सर्व अवयव शाबूत आहेत; मला बुद्धीची देणगीहि त्वां दिली आहेस; परंतु विद्युत्पात झाल्याप्रमाणें माझी प्रगति कां बंद?"

पद्मनाभाची वृत्ति अशा वेळीं जास्तच क्षुब्ध होऊन तिचें पर्यवसान अश्रुपाता-पर्यंत येई. कांहीं वेळ असा गेल्यावर त्याची चित्तवृत्ति स्वस्थानीं आली ह्मणजे तो आपला मार्ग सुधारी.

काल हा अतित्वरेनें चालू आहे. सकाळ गेली, संध्याकाळ झाली, दुसरा दिवस उगवला; अशा रीतीनें आठवडा, पंधरवडा, महिना संपून वर्षेंच्यावर्षें जात आहेत. पद्मनाभाचे वरीलप्रमाणें दिवस जात असतां महिना दीड महिना होऊन गेला. या काळांत सृष्टींत बराच फरक पडला आहे. हिंवाळा संपून उष्ण-काळास सुरुवात झाली आहे. लोकांस शीतोपचार इष्ट वाटत आहेत. गांवांतील सांथीचा उपद्रव बराच कमी होत आला आहे. सर्व वृक्षांस नवीन पालवी फुटली आहे. उंसाची वाढ पुरी झाल्यामुळें त्यांचें गुळांत रूपांतर करण्याकरितां उंसाचे मळेवाल्यांनीं गुऱ्हाळें सुरू केलीं आहेत. तेथील चरकांचा घरघर आवाज ऐकूं येत आहे. आम्रवृक्षाचा मोहोर जाऊन त्या ठिकाणीं अजून बाठ न धरलेले लहान मोठे आंबे दिसत आहेत. परंतु पद्मनाभाच्या चित्तवृत्तींत फेर नाहीं.

असेंच कांहीं दिवस लोटले. एक दिवस पद्मनाभ झोंपडीकडे येत होता. संध्याकाळची वेळ. ह्या वेळीं सृष्टीस एक प्रकारचें रमणीय स्वरूप येतें, पण तें या वेळीं दिसून येत नव्हतें. सर्व प्रदेश गंभीर दिसत होता. आकाश साभ्र होतें. एखाद्या वेळेस अवचित मोठे अमलदार आले ह्मणजे त्या ठिकाणास जसें गंभीर स्वरूप येऊन चोहोंकडे स्तब्धता दिसते, त्याप्रमाणें त्या वेळीं स्थिति झाली होती. इतक्यांत मोठा वारा सुटून त्यानें प्रलय मांडला. रस्त्यावरील माती उडून सर्व प्रदेश धूलीमय झाला. वाऱ्याच्या वेगानें कांहीं वृक्षांच्या फांद्या मोडल्या. जुनाट

वृक्ष उन्मळून पडले. वाऱ्यानें पडलेल्या आंब्यांनींतर तो रस्ता आम्रफलमय झाला होता. जराशा वेळानें वारा बंद झाला व पावसानें मनावर घेतलें.

पाऊस पडून गेल्यावर आकाश निरभ्र झालें. ग्रह, तारे, चंद्रमा हीं प्रकाशित झालीं. फिरून जिकडेतिकडे शांततेचें साम्राज्य दिसूं लागलें. पद्मनाभ एवढा वेळ येथेंच होता. पावसानें तो चिंब झाला होता. आपलें दुःख विसरून तो झालेल्या प्रकाराबद्दल आश्चर्य करूं लागला. वाऱ्यानें आम्रवृक्षाची केलेली दशा पाहून त्यांच्याबद्दल त्याच्या मनांत सहानुभूति उत्पन्न झाली. तो ह्मणाला "हे परोपकाररत आम्रतरूंनों! निष्ठुर वाऱ्यानें केलेली तुमची ही दशा पाहून मला वाईट वाटतें. तुमची अशी दशा कां व्हावी, हें कळत नाहीं!"

हें त्याचें भाषण ऐकून एक आम्रवृक्ष आपलें शरीर हलवून व डोकें उन्नत करून ह्मणाला "हे कुमार! या मार्गावरून जातांना तुला आह्मीं पुष्कळ वेळां पाहिलें आहे. तुझी संभावित वृत्ति पाहून आमच्या मनांत तुजबद्दल फार दिवसांपासून अनुकंपा उत्पन्न झाली आहे. आपल्या स्थितीबद्दल विचार करित ह्या निर्जन प्रदेशांत तुला पुष्कळ वेळां बसलेला पाहून तुला बोध करण्याची इच्छा होई, परंतु उचित समय न मिळाल्यामुळें आजवर तसें घडलें नाहीं. ती वेळ आज आली आहे. तुझ्या मनाची इच्छा काय, कीं, आपण विद्वान् व्हावें, आपणास बहुमान मिळावा; परंतु ईश्वरेच्छा तशी नाहीं, तर त्याचा खेद करून काय उपयोग. पहा, दरवर्षी आह्मांस मोहोर येऊन पुष्कळ फळें आह्मी धारण करितों; परंतु सर्वांची एक अवस्था आहे काय! बरींचशीं फळें पूर्णावस्था येणाचे पूर्वींच वाऱ्यानें, पक्षांच्या चंचुघातांनीं, अगर द्वाड पोरांच्या दगडांनीं खालीं पडतात. बरें राहिलेलीं फळेंतरी एकच अवस्था भोगतात काय? नाहीं. कोणी तिखट, मीठ, मोहऱ्या, हळद यांचा संयोग पावून लोणचें होतात; कोणी गुळाशीं संयोग पावून गुळांबा बनतात; कोणी साखरेशीं संयोग पावून मुरंबा होतात; कोणी पिकून ईश्वराचे नैवेद्यास जातात किंवा ब्राह्मणमुखीं पडतात; कोणी फार पिकून कुजून जातात! हीच स्थिति मनुष्यांमध्येंहि आहे! शिवाय सर्वच दिवस सारखे नसतात. कांहीं काल ऐश्वर्याचा असतो, नंतर विपत्तीचा येतो. कधीं सुखाची रेलचेल असते, तर कधीं दुःखाची परंपरा पाठीमागें लागते. कधीं लाभकाल असतो, तर कधीं असतेंनसतें तें सर्व जातें. तूं विचारी आहेस; प्रापंचिक दुःखांचा व ज्या गोष्टी आपल्या हातांत नाहींत त्यांचा तूं खेद करूं नकोस. आनंदी होण्यास शीक, उत्साह धर, हेहि दिवस जातील!"

पद्मनाभ त्या दिवसापासून आनंदी रहाण्याचा प्रयत्न करूं लागला.

गोष्ट ४ थी.

## वसंत लीला.

नाटकगृहांत नाटक आणि बाहेरहि नाटक !

### [ अंक १ ला. ]

"एवढा पोटांत माईनासा कसला बाई आनंद झाला आहे आज? ओंठ कितीतरी दावून धरायचा प्रयत्न होत आहे, पण कांहींकेल्या हंसं ह्मणून मुळींच दवलं जात नाहीं! असं झालंयतरी काय? काय असेल तें सांगायचं गडे लवकर मला—" पतीचा पाय खोलींत पडतांच लीला बसल्या जागेवरून उठून हंसत हंसत ह्मणाली.

"इतकी अगदीं अनावर उत्कंठा लागण्याचें कारण ?"

"अगोदर काय झालं तें सांगायचं, मग माझ्या उत्कंठेचं कारण मी सांगेन."

"अरे वा!"

"वा ह्मणजे! खरं ह्मटलं तर मी दृष्टीस पडतांच इकडचं हंसतमुख व्हायचं! अन् आजतर बाहेरूनच हंसतहंसत यायचं झालं—"

"मग तूं फक्त घरांतच आहेस कीं काय? बाहेर नाहींस वाटतें?"

लीला सलज्ज प्रेमकटाक्ष फेंकित मधुर स्मित करून ह्मणाली "आपली क्षमा मागतें मी. चूक कबूल करितें. 'हे राजन्! वसतसें मी तव अंतरीं बाहेरीं !' बरं तें राहूं द्या गडे, पण आज काय झालं, तें मला सांगायचं लवकर!"

"ऐकणार कीं पहाणार?"

"तरी मला वाटलंच तें! पाहूं–पाहूं, काय लिहिलं आहे तें!" असें ह्मणून लीलेनें पतीच्या हातांतून नुक्ताच आलेला एका मासिक पुस्तकाचा अंक घेतला आणि वसंतरावांनीं रचून पाठविलेली कविता त्यांत प्रसिद्ध झाली होती ती प्रफुल्लित अंतःकरणानें वाचिली. वाचून होतांच तो अंक दूर फेंकून देऊन क्रुद्ध मुद्रेचा आविर्भाव करून लीला ह्मणाली "मी नाहीं जा आजपासून बोलायची आपल्याशीं—"

" पण अपराध काय घडला मजकडून?"

"अपराध लहानसहान का हा? आपण रचिलेली कविता प्रारंभीं मीं वाचिली होती व ती फारच सुंदर झाली आहे असं माझं मत मीं इकडे त्यावेळींच दिलं होतं. आज ह्या मासिककर्त्यांनीं ती प्रसिद्ध केल्याबद्दल आनंदानं डुलतां आहां आणि मीं अगदीं मनःपासून प्रशंसा केली असतां त्याबद्दल कांहींच नाहीं!

माझ्याहून त्यांची योग्यता मोठी ठरविलीत हा काय लहानसहान अपराध! असा अपमान करणाराशीं मी बोलायची नाहीं जा आजपासून—"

वसंतराव हंसतहंसत ह्मणाले "पण माझ्या आनंदाचें कारण तें नव्हे—"

"तें नव्हे? तरमग कोणतं?"

"तूं सांग पाहूं!"

लीला स्मित मुखानें ह्मणाली "हां, आतां आलं माझ्या ध्यानांत!"

"काय? सांग पाहूं!"

"मी नाहीं जा सांगायची!"

"तुला सांगितलेंच पाहिजे!"

"इश्श! असा हुकूम का फर्मवायचा! आपण कोण, मी कोण—"

"अरे वा!"

"वा ह्मणजे! मी राणी, आपण प्रजा—"

"मग महाराणी सरकारांच्या चरणारविंदीं मिलिंदायमान होऊन विनम्रपणें प्रार्थना करण्यांत येत आहे कीं, राणीसाहेबांनीं कृपाळु होऊन सेवकाच्या मनांत काय आहे तें विदित करावें."

लीला हंसतहंसत ह्मणाली "जा गडे! भलत्याच वेळीं अशी भलतीच थट्टा मला नाहीं आवडत! काय आहे तें मला लवकर सांगायचं!"

"पण तूं काय तर्क केलास तो पहिल्यानें कळूंद्यातर खरा!"

"मी नाहीं जा सांगायची!"

"छट्, तें बिलकुल चालणार नाहीं. सांगितलेंच पाहिजे!"

"खोटं ठरलं तर आपण हंसाल—"

"हंसलों तर तुला दांत दिसतील—"

"मग मला मेल्याहूनहि मेल्यासारखं होईल—"

"कुच फिकीर नहीं!"

"मग मला रडतां भुई थोडी होईल—"

"मग मी डोळ्यांत औषध घालून तो अश्रुप्रवाह ताबडतोब बंद करीन—" असें ह्मणून वसंतरावांनीं लीलेच्या हरिणासारख्या चंचल नेत्रांचें स्नेहभरानें एक चुंबन घेतलें.

लीला वसंतरावांचा हात झिडकारून दूर होऊन सलज्ज मुद्रेनें ह्मणाली "हें काय! हें काय? रोग होण्यापूर्वींच औषध!"

वसंतराव गंभीरमुद्रेनें ह्मणाले "Prevention is better than Cure."

लीलेलाहि थोडेंसें इंग्रजी कळत होतें. ती ह्मणाली "डाक्टरसाहेब ! आपल्या या दक्षतेबद्दल मी आपल्याला 'Thanks' देतें."

"रोग्याकडून नुसते 'Thanks' घेऊन डाक्टरांचा चरितार्थ चालणार नाहीं. 'Visit' मिळालीच पाहिजे." असें बोलतबोलत वसंतरावांनीं चट्दिशीं व्हिजीटहि वसूल करून घेतली व लीलेला आपल्याजवळ ओढून घेऊन ते ह्मणाले "आतां मला खरेंच सांग, तूं काय समजलीस? मला तें जाणण्याची उत्कंटा लागली आहे."

"भारीच नवल ह्मणायचं बाई! आपण जी गोष्ट सांगायची ती न सांगतां उलट मीं काय तर्क केला तें जाणण्याची आपल्याला उत्कंठा लागली आहे! मोठे भोळे माणूस आहां आपण! नको मेलं, नाहीं कळलं तर नाहीं कळलं मला, पण मी नाहीं जा सांगायची!"

तरुण—आणि अल्लड स्वभावाच्याहि ह्मणा पाहिजेतर—पतिपत्नींचा हा प्रणय-विनोद आणखीहि बराच चालला. तो सर्व येथें देण्यास आह्मी इच्छित नाहीं, आणि देतां येण्याजोगाहि नाहीं. वसंतलीला यांची ही प्रणयलीला इतक्यावरच आटोपती घेऊन वाचकांस कळवितों कीं, अखेरीस लीला विजयी झाली, वसंतराव हरले. वसंतरावांनीं आपल्या मनांतील गोष्ट लीलेला सांगण्याचें कबूल केलें; परंतु त्यांनीं एक अट मात्र घातली. ते ह्मणाले "ठीक आहे, मी सांगतों काय आहे तें. परंतु मागाहून 'हेंच माझ्या मनांत होतें' असें ह्मणायला तूं मुळींच चुकायची नाहींस, ही माझी खात्री आहे! यासाठीं तूं काय तर्क केला आहेस तो पहिल्यानें एका कागदावर लिहून ठेव, ह्मणजे मी तुला माझ्या मनांतील गोष्ट सांगतों."

लीलेनें ही गोष्ट मान्य केली व त्याप्रमाणें तिनें एका कागदाच्या तुकड्यावर कांहीं मजकूर लिहून तो कागद एका पाकिटांत घालून पाकीट बंद करून आपल्या हातांत ठेविलें व ह्मणाली "हं आतां बोला काय तें—"

वसंतराव हंसून ह्मणाले "दुसरें काय असणार! आज गेइटी थिएटरमध्यें '**वसंत लीला**' नांवाचें नाटक व्हायचें आहे, तें पहाण्यासाठीं आज आपण उभयतां मिळून जाऊं, असा विचार केला आहे."

पतीच्या तोंडून हें भाषण श्रवण करितांच लीलेला जो आनंद झाला, त्याचें वर्णन करण्याचे आह्मी येथें निष्कारण श्रम करित नाहीं. आमच्या मुंबापुरवासी नाटकप्रिय भगिनींनां त्याची सहज कल्पना होईल! 'हं मदंगा लावुं नका कर—

असलीं व याच्याहूनहि बीभत्स, चावट, अश्लील आणि घाणेरडीं पद्यें ऐकण्यास आणि त्यांतील अश्लील हावभाव अवलोकन करण्यास मुंबईतील कुलस्त्रियांस यत्किंचित्‌हि दिक्कत वाटत नाहीं व सभ्य ह्मणविणाऱ्या गृहस्थांसहि असल्या अभद्र नाटकांस आपल्या तरुण मुलांमुलींसहि आपल्याबरोबर घेऊन जाण्यास शरम वाटत नाहीं! तेव्हां असलीं बीभत्स नाटकेंसुद्धां पहाण्याविषयीं अल्लड आणि अप्रबुद्ध स्त्रिया उत्सुक असल्यास त्यांत नवल काय? आमची लीलाताईहि याच वर्गातील असल्यामुळें तिला आज नाटकास जावयास मिळणार हें पतीच्या तोंडून ऐकतांच जो आनंद झाला तो अवर्णनीय होता. वसंतरावांच्या तोंडून ही महान् आनंददायी बातमी ऐकतांच लीला आपल्या हातांतील पाकीट घट्ट धरून हंसतहंसत ह्मणाली "बरं, आतां मीं या कागदांत काय लिहिलं आहे तें सांगा पाहूं?"

"वा! हें कांहीं पूर्वीं ठरलें नव्हतें. तूं पूर्वीं असें मुळींच बोलली नव्हतीस."

"पूर्वीं नसलें बोललें तर आतां बोलतें. सांगा पाहूं काय आहे या कागदांत?"

"तें कांहींएक चालायचें नाहीं. मला कागद दाखविलाच पाहिजे."

या वेळींहि त्या पतिपत्नींचा बराच विनोद झाला. शेवटीं लीलेच्या हातांतून तो कागद बलपूर्वक हिसकावून घेऊन वसंतराव उत्सुकतेनें वाचूं लागले. त्यांत पुढील मजकूर लिहिला होताः—

"माझा कांहींच तर्क चालत नाहीं. आपली उत्सुकता वाढविण्यासाठीं मला समजलं असं आपल्याला मीं उगाच सांगितलं होतं. दुसऱ्याच्या मनांतली गोष्ट का कधीं कुणाला कळत असते?"

हा मजकूर वाचून वसंतराव खोखो हंसत सुटले. लीलाहि कृतकृत्य मुद्रा करून हंसूं लागली. उभयतांच्या विनोदास पुनः सुरुवात झाली. शेवटीं वसंतराव ह्मणाले "वा वा, तूं अशी लबाडी केलीस काय? ठीक आहे; याबद्दल मी तुला चांगली कडक सजा देणार आहें—"

लीलेनें लडिवाळपणें विचारिलें "पण कोणती सजा, तीतर सांगायची!"

"तुला मडम सजविणार—"

"हें काय बाई नवीनच आश्चर्य!"

"आश्चर्य नाहीं, खरोखरच तुला आज मडम सजविणार! आजच्या तुझ्या अपराधाला हीच सजा योग्य आहे."

"इश्श! भलतंच कांहींतरी बरळायचं! माझा कुणीं प्राण काढला तरी मी मडमेचा पोषाख करणार नाहीं."

"पण तुला त्यांत एवढी भीति ती कसली वाटते ! आपल्याला तिथें कोण ओळखणार आहे? हीं कुणीतरी युरोपियन अगर 'हाफकास्ट' असतील, असाच सगळ्यांचा समज होईल. तूं मडमेच्या पोषाखांत कशी दिसतेस हें पहाण्याची पुष्कळ दिवसांपासून मला फार इच्छा झाली आहे. तुझ्यासाठीं मीं एक सूटहि मुद्दाम विकत घेतला आहे. थिएटरामध्यें जाऊन नवऱ्यानें एकीकडे बसावें, बायकोनें एकीकडे बसावें, यांत नाटक पहाण्याची खरी मौज नाहीं. नाटक पहाण्याची जी कांहीं बहार आहे ती पतीपत्नीनें एकत्र बसून पहाण्यांतच आहे. बरें आपल्या नेहमींच्या पोषाखानें आपण एकमेकांजवळ बसावें, तर तुला तेवढें धैर्य होत नाहीं. कुचाळ लोकांच्या टीकेला तूं घाबरतेस. यासाठीं आह्मी साहेब आणि तुह्मी मडम बनून आपण नाटकाला जाऊं आणि 'बॉक्स'मध्यें जवळजवळ बसून नाटकाची मौज पाहूं. असें करणें हें थोडेंसें धाडसाचेंतर खरेंच, पण असें धाडस केल्याशिवाय मनुष्याला सुख, आनंद, मौज प्राप्त होत नाहीं. तूं मडमेचा पोषाख करण्याचें धैर्य केलेंस ह्मणजे आपल्याला किती सुख उपभोगितां येईल, त्याची तुला कल्पनातरी आहे? हातांत हात घालून राजरस्त्यावरून आपणास फिरतां येईल. तूं मडम बनलीस ह्मणजे तुला बायसिकलवरून फिरण्यासमुद्धां हरकत पडणार नाहीं. आपण साहेब मडम बनलों ह्मणजे वर मान करून पहाण्यास कुणीहि धजणार नाहीं. सर्व मंडळी आपल्याशीं अदबीनेंच वागतील. पोलिसचे शिपाई सलामी देतील—"

वसंतरावांचें हें यूरोपियनपोषाखपुराण असेंच आणखी कितीतरी लांबलें असतें; परंतु लीलेला तें मुळींच न रुचल्यामुळें ती तें थांबवून मध्येंच ह्मणाली "आपल्याला कांहीं वेडबीडतर नाहींना लागलं आज ! चला चला, मेली भलतीच थट्टा किती करायची? मला नाहीं असली थट्टा आवडत!"

लीलेची समजूत करण्यासाठीं वसंतरावांनीं नाना युक्त्या केल्या, नाना उपाय योजिले, विनवण्या केल्या, आर्जवें केलीं, अनेक आशा दाखविल्या, शेवटीं धाकदपटशहादेखील देऊन पाहिला, सारांश होतेनव्हते तेवढे सर्व प्रयत्न केले, परंतु कांहींकेल्या लीला ह्मणून त्यांच्या ह्मणण्यास मान्य होईना. पहिल्यापहिल्यानें ही थट्टाच असेल, असें ती समजली होती; परंतु जेव्हां वसंतरावांनीं ट्रंकमधून तो मडमेचा पोषाख बाहेर काढिला, तेव्हांतर तिची भीतीनें गाळण उडून ती कावरीबावरी झाली.

इकडे वसंतराव मोठ्या संकटांत पडले. आपण साहेब आणि आपली पत्नी मडम बनून आज मोठ्या भपक्यानें नाटकास जावयाचें, असें त्यांच्या डोक्यांत विलक्षण वेड भरलें होतें आणि तेवढ्यासाठींच त्यांनीं कितीतरी पैसे खर्च करून 'लेडला व्हाईट वे' कंपनींतून मुद्दाम सूटहि आणविले होते! लीलेनें त्यांचें एवढें ह्मणणें मान्य करूं नये व त्यांची एवढी हौस पुरवूं नये! त्या हौशीसाठीं वेड्या झालेल्या वसंतरावांनीं अन्य उपाय नाहीं असें पाहून शेवटीं लीलेचे पाय धरिले आणि बाहेर नाहींतर नाहीं, पण निदान घरांतल्याघरांततरी तिनें एकवेळ मडमेचा पोषाख करून दाखवावा व आपली तेवढी इच्छा पुरवावी, असा तिला पराकाष्ठेचा आग्रह केला. बरेच आढेवेढे घेत, लाजूनलाजून आणि हंसूनहंसून मुरकुंडी वळत, हो ना करितकरित शेवटीं लीलेनें नाइलाजानें तेवढ्या ह्मणण्याला एकदाची आपली मान्यता दिली. तिनें दिवाणखान्याचीं दारें, खिडक्या, वरचे 'शटर्स' वगैरे सर्व गच्च बंद करून घेतलीं व पहिल्यानें वसंतरावांस साहेब बनावयास लावून ते 'हाफकास्ट' बनल्यावर लीला आपल्या निजावयाच्या खोलींत गेली व दाराला आंतून घट्ट कडी लावून घेऊन मडमेचा पोषाख करूं लागली. लीलेनें कित्येक मडमांस पाहिलें होतें खरें, परंतु त्या पोषाख कसा करित असतात, हें कांहीं आजवर तिला मुळींच ठाऊक नव्हतें. अजमासाअजमासानें चुकतमाकत तिनें कसाबसा एकदा पोषाखतर चढविला. परंतु आतां तिच्यानें खोलीच्या बाहेर ह्मणून पडवेना! ती हळूच आपल्या पोषाखाकडे पाही, हळूच आजूबाजूला पाही आणि तिची तिलाच विलक्षण लाज वाटून आपलें तोंड दोन्ही हातांनीं गच्च झांकून घेई! कितीतरी वेळपावेतों असा प्रकार चालला होता. इकडे साहेबतर दिवाणखान्यांत मडमसाहेबांच्या दर्शनाविषयीं उतावीळ होऊन बसले होते. बराच वेळ झाला, तरी आपल्या मडमसाहेब पडद्याच्या बाहेर येत नाहींत असें पाहून शेवटीं साहेब खोलीचें दार ठोठावून घाई करूं लागले; परंतु कांहींकेल्या मडमसाहेब दार ह्मणून उघडीनात. शेवटीं आतां सुटकाच नाहीं असें पाहून एका हातानें तोंड झांकून घेऊन मडमसाहेबांनीं लाजतमुरकत दरवाजाची कडी काढली व झपदिशीं एका कोपऱ्यांत जाऊन लिकून बसल्या. मडमसाहेबांचा तो विचित्र पोषाख पहातांच आमच्या उल्लू बनलेल्या साहेबांस जो आनंद झाला, त्याचें वर्णन कोणीं करावें! पण तेवढीच उलट स्थिति बिचाऱ्या मडमसाहेबांची झाली होती!! त्या ज्या कोपऱ्यांत जाऊन भिंतींत तोंड खुपसून राहिल्या होत्या, त्या इकडेतिकडे वळण्याचेंहि धैर्य त्यांनां झालें नाहीं. शेवटीं साहेबांनींच त्यांचा हात पकडून त्यांची अत्यंत

अनिच्छा असतांहि बलपूर्वक त्यांनां बाहेर दिवाणखान्यांत ओढून आणिलें व आरशापाशीं उभें राहून आपला साहेबी जोडा कसा दिसतो तें सकौतुक दृष्टीनें अवलोकन करूं लागले. मडमसाहेबांच्या नाकांतील ती नथ, कपाळावरील कुंकुम-तिलक, त्या नेसलेल्या 'गाऊन,' डोक्यावर पिसांची टोपी, उघडे पाय, इत्यादिकांमुळें त्यांची मुद्रा त्या आरशांतून जी कांहीं विलक्षण दिसूं लागली, त्याचें यथार्थ चित्र आमच्यानें काढवणार नाहीं, एखाद्या कुशल चित्रकाराच्यानेंहि पण काढवणार नाहीं, आमच्या वाचक बंधुभगिनींनां आपल्या अंतःकरणफलकावर आपल्या कल्पना-शक्तीनें तें बरेंच चांगलें रेखाटतां येईल, अशी आमची खात्री आहे. असो.

वसंतराव लीलेचा हात जोरानें हालवून ( शेक हँड करून ) ह्मणाले "गुडमॉर्निंग मेमसाहेब !"

लीलाहि हंसतहंसत ह्मणाली "गुडमॉर्निंग साहेबसाहेब !"

आरशामधून आपल्या विचित्र वेशाचें प्रतिबिंब उभयतांच्या दृष्टीस पडतांच खुद्द त्यांचें त्यांनांच इतकें अनावर हंसूं लोटलें कीं, सांगतां सोय नाहीं. बसंत-रावांचेंतर हो हो करतांकरतां पोट फुटून गेलें. लीलेच्याहि पोटांत असह्य कळ उभी राहिली. तीं माणसें नसून कोणी भुतेंच तेथें आलीं आहेत कीं काय, असें खुद्द त्यांचें त्यांनांच क्षणभर वाटलें आणि हंसतांहंसतां उभयतांची मुरकुंडी वळून गेली. शेवटीं तें हंसें थांबल्यावर लीला अगदीं खजील होऊन ह्मणाली "माझ्या गळ्याची शपथ आहे गडे आपल्याला, मला तुह्मी या पोषाखानं नाटकास नेऊं नका! माझा जीव निघून जाईल. या भुतासारख्या पोषाखानं मेलं घराबाहेरतरी कसं पडवेल! सगळीं हंसूनहंसून पुरेवाट करतील! मी नाहीं यायची अशी—मला तुमचं तें नाटक नको!"

वसंतराव ह्मणाले "याला एक युक्ति आहे. आपण असें करूं कीं, आपल्या नेहमींच्या पोषाखानेंच घराबाहेर पडूं. येथून ग्रांटरोडच्या स्टेशनावर जाऊन वांद्याचें तिकीट काढूं. तेथें सेकंड क्लासचा एक कम्पार्टमेंट रिझर्व्ह करून चर्चगेटवर उतरूं. ह्मणजे डब्यांत निर्धास्तपणें आपल्याला पोषाख बदलतां येईल."

लीलेनें यालाहि बरेच आढेवेढे घेतले; परंतु वसंतरावांनीं हरप्रयत्न करून एकदाचें तिचें मन वळविलें व रात्रीं उभयतांनीं साहेबी पोषाखानें नाटक पहाण्यास जाण्याचा बेत कायम ठरला!

इकडे वसंतराव मोठ्या संकटांत पडले. आपण साहेब आणि आपली पत्नी मडम बनून आज मोठ्या भपक्यानें नाटकास जावयाचें, असें त्यांच्या डोक्यांत विलक्षण वेड भरलें होतें आणि तेवढ्यासाठींच त्यांनीं कितीतरी पैसे खर्च करून 'लेडला व्हाईट वे' कंपनींतून मुद्दाम सूटहि आणविले होते! लीलेनें त्यांचें एवढें ह्मणणें मान्य करूं नये व त्यांची एवढी हौस पुरवूं नये! त्या हौशीसाठीं वेड्या झालेल्या वसंतरावांनीं अन्य उपाय नाहीं असें पाहून शेवटीं लीलेचे पाय धरिले आणि बाहेर नाहींतर नाहीं, पण निदान घरांतल्याघरांततरी तिनें एकवेळ मडमेचा पोषाख करून दाखवावा व आपली तेवढी इच्छा पुरवावी, असा तिला पराकाष्ठेचा आग्रह केला. बरेच आढेवेढे घेत, लाजूनलाजून आणि हंसूनहंसून मुरकुंडी वळत, हो ना करितकरित शेवटीं लीलेनें नाइलाजानें तेवढ्या ह्मणण्याला एकदाची आपली मान्यता दिली. तिनें दिवाणखान्याचीं दारें, खिडक्या, वरचे 'शटर्स' वगैरे सर्व गच्च बंद करून घेतलीं व पहिल्यानें वसंतरावांस साहेब बनावयास लावून ते 'हाफकास्ट' बनल्यावर लीला आपल्या निजावयाच्या खोलींत गेली व दाराला आंतून घट्ट कडी लावून घेऊन मडमेचा पोषाख करूं लागली. लीलेनें किल्येक मडमांस पाहिलें होतें खरें, परंतु त्या पोषाख कसा करित असतात, हें कांहीं आजवर तिला मुळींच ठाऊक नव्हतें. अजमासाअजमासानें चुकतमाकत तिनें कसाबसा एकदा पोषाखतर चढविला. परंतु आतां तिच्यानें खोलीच्या बाहेर ह्मणून पडवेना! ती हळूच आपल्या पोषाखाकडे पाही, हळूच आजूबाजूला पाही आणि तिची तिलाच विलक्षण लाज वाटून आपलें तोंड दोन्ही हातांनीं गच्च झांकून घेई! कितीतरी वेळपावेतों असा प्रकार चालला होता. इकडे साहेबतर दिवाणखान्यांत मडमसाहेबांच्या दर्शनाविषयीं उतावीळ होऊन बसले होते. बराच वेळ झाला, तरी आपल्या मडमसाहेब पडद्याच्या बाहेर येत नाहींत असें पाहून शेवटीं साहेब खोलीचें दार ठोठावून घाई करूं लागले; परंतु कांहींकेल्या मडमसाहेब दार ह्मणून उघडीनात. शेवटीं आतां सुटकाच नाहीं असें पाहून एका हातानें तोंड झांकून घेऊन मडमसाहेबांनीं लाजतमुरकत दरवाजाची कडी काढली व झपदिशीं एका कोपऱ्यांत जाऊन लिकून बसल्या. मडमसाहेबांचा तो विचित्र पोषाख पहातांच आमच्या उल्लू बनलेल्या साहेबांस जो आनंद झाला, त्याचें वर्णन कोणीं करावें! पण तेवढीच उलट स्थिति बिचाऱ्या मडमसाहेबांची झाली होती!! त्या ज्या कोपऱ्यांत जाऊन भिंतींत तोंड खुपसून राहिल्या होत्या, त्या इकडेतिकडे वळण्याचेंहि धैर्य त्यांनां झालें नाहीं. शेवटीं साहेबांनींच त्यांचा हात पकडून त्यांची अत्यंत

## [ अंक २ रा. ]

ठरल्याप्रमाणें रात्रीं सात वाजण्याच्या आंत जेवणखाण आटोपून वसंतराव घरांतूनच साहेब बनून लीलेला घेऊन ग्रांटरोड स्टेशनावर दाखल झाले. गाडी स्टेशनांत यांची वाट पहातच उभी होती. यांनां घेऊन ती वायुवेगानें चालूं लागली. पंधरावीस मिनिटांचे आंत वांद्र्याचें स्टेशन आलें. वसंतरावांनीं दोनप्रहरीं मुद्दाम वांद्र्याला जाऊन स्टेशनमास्तरला भेटून वांद्र्यापासून चर्चगेटपर्यंत सेकंड-क्लासचा एक कम्पार्टमेंट रिझर्व्ह करविला होता. त्यांत जाऊन हें दाम्पत्य विराजमान झालें. नियमित वेळीं ती गाडीहि चालू झाली. स्टेशन सुटतांच डब्याच्या खिडक्या वगैरे बंद करून घेऊन लीलेच्या अंगावर वसंतराव आपल्या हातांनीं मडमेचा पोषाख चढवूं लागले. वांद्र्यापासून चर्चगेटला गाडी जाई-पर्यंतच्या अवकाशांत उभयतांनीं मिळून घाईघाईनें लीलेला मडमतर बनविलीच. या पोषाखांत हिंदुचालीचे बरेचसे दागिने लीलेला अंगावरून उतरून ठेवावे लागले, कुंकवालासुद्धां थोडा वेळ रजा देणें भाग पडलें आणि असें करतांना लीलेला जें मरणप्राय दुःख झालें, ती जी पुष्कळ रडली, तिनें जे आढेवेढे घेतले, तें सगळें सांगत बसण्याला आह्मांला अवकाश नाहीं. कारण तें पहा चर्चगेटचें स्टेशनहि दिसूं लागलें. विलक्षण घाई, मनाची चमत्कारिक स्थिति, यूरोपियन पोषाखाविषयीं वरवरचीच माहिती, इत्यादि गोष्टींमुळें लीलेच्या हातून हा यूरोपियन पोषाख करण्यांत बऱ्याच ढोबळ आणि हास्यास्पद चुका झाल्या होत्या, हें सांगावयाला नकोच. त्यांतहि दुर्दैवानें उजव्या पायांतील बूट डाव्या पायांत आणि डाव्या पायांतील बूट उजव्या पायांत चढविला गेल्यामुळेंतर तिच्या एकंदर पोषाखाला जी शोभा आली होती, ती मोठी विलक्षणच होती. उतरलेले सर्व कपडे आणि दागिने वगैरे एका ट्रंकमध्यें घालून ती ट्रंक बंद करित आहेत, तोंच चर्चगेटचें स्टेशन आलें. साहेबांनीं मडमसाहेबांनां हात देऊन गाडींतून खालीं उतरलें. प्लॅटफार्मवर पोर्टर उभा होताच, त्यानें धावत येऊन डब्यांतील ट्रंक उचलली व मंडळी स्टेशनाच्या बाहेर पडूं लागली.

लीलेला आधीं बूट घालून चालण्याची कधींहि सवय नव्हती. त्यांत ते उलटेसुलटे झालेले. शिवाय ती आजच्या मडमेच्या पोषाखामुळें पराकाष्ठेची लज्जित आणि ओशाळी झाली होती. यामुळें चालतांना ती एकेक पाय असा मजेनें टाकूं लागली कीं, सर्वांनीं तिकडे पहातच रहावें ! साहेबांनीं तिला आपल्या हाताचा बळकट टेंकू दिला होता ह्मणून ठीक होतें; नाहींतर बिचाऱ्या मडमेनें

प्लॅटफार्मवर सर्वांदेखत लोटांगणच घातलें असतें ! तरीहि दोनतीनदा तोल जाऊन ती साहेबांच्या अंगावर पडलीच. अर्थात् केव्हां एकदा जाऊन व्हिक्टो-रियांत पडूं व आपली अब्रू बचावूं, असें बापडीला झालें होतें. इकडे साहेबमडमेचें जोडपें पहातांच स्टेशनाबाहेर उभ्या असलेल्या दहापांच व्हिक्टोरियावाल्यांनीं त्यांच्यापुढें एकच गर्दी केली. लीलाहि मग दुसरातिसरा विचार न करतां जवळ आलेल्या एका व्हिक्टोरियांत जाऊन बसली, तेव्हांच कोठें तिच्या जिवांत जीव आला !

"किधर जानेका साहेब ?" व्हिक्टोरियावाल्यानें अदबीनें विचारतांच मोठ्या ऐटीनें फक्त "बोरी ब्यंडर !" एवढाच जबाब देऊन आमचे साहेब मडम-साहेबाशीं इंग्रजींत कांहीं बोलूं लागले. साहेबांचें तें इंग्रजी मडमसाहेबांस समजत होतें कीं नाहीं, अथवा इंग्रजी थोडेंबहुत समजत असलें तरी यावेळीं तें कळण्याजोगी त्यांच्या मनाची स्थिति होती कीं नाहीं, तें आह्मांला बरोबर सांगतां यावयाचें नाहीं; परंतु घरांतून बाहेर पडण्यापूर्वी मडमसाहेबांनीं मराठी शब्द मुखावाटे उच्चारूं नये अशी साहेबांनीं त्यांस सक्त ताकीद उर्फ विनंति केली होती व त्यांनींहि तें कबूल केलें होतें, हें मात्र आह्मांला पक्कें माहीत आहे. 'आल राईट' 'येस, येस' इत्यादि शब्द त्या मधूनमधून उच्चारित होत्या व साहेब त्यांनां कांहीं सांगत होते.

साहेब बनण्यासाठीं हपापलेल्या आमच्या वसंतरावांनीं लीलेचे हिंदू चालीचे दागिने, मूल्यवान कपडे वगैरे एका ट्रंकमध्यें भरून ठेवण्याची कल्पना काढिली होती खरी, परंतु ही ट्रंक ठेवावी कुठें, हा विचार हा वेळपर्यंत त्यांच्या डोक्यांतच आला नव्हता ! स्टेशनांतून बाहेर पडतांच आतां कोठें त्यांच्या डोक्यांत प्रकाश पडला. ट्रंक आपल्याबरोबर थिएटरांत कांहीं नेतां यावयाची नाहीं. बरें व्हिक्टोरियांत ठेवून नाटक संपेपर्यंत गाडी थांबविण्यास सांगावें, तर गाडीवाल्याच्या खोटीबद्दल त्याला द्याव्या लागणाऱ्या जबर भाड्याचा जरी मोठासा प्रश्न नसला, तरी त्याच्यावर एवढा विश्वास कसा टाकतां यावा ! अर्थात् दुसरा कांहीं मार्ग नसल्यामुळें ती ट्रंक स्टेशनमास्तरच्या ताब्यांत ठेवावी असा विचार करून आपण तेवढी ट्रंक ठेवून ताबडतोब परत येतों असें मडमसाहेबांस सांगून ते "चलो" एवढेंच ह्मणाले व लीलेशीं शेकहँड करून इकडेतिकडे न पहातां साहेबी ऐटीनें जलदीनें निघून गेले. पोर्टरहि ट्रंक घेऊन साहेबांबरोबर पळतच गेला.

ते स्टेशनमास्तरजवळ येतात इतक्यांत अहमदाबाद मेल स्टेशनांत येऊन दाखल झाली. स्टेशनमास्तर त्या गाडीची व्यवस्था लावण्यांत गढून गेले. त्या गाडीची रवानगी करीपर्यंत अर्थातच स्टेशनमास्तरांस आमच्या या साहेबांशीं

बोलण्यासहि फुरसत मिळाली नाहीं. अर्थात् तेवढा वेळ साहेबांस मुकाट्यानें बसावें लागलें. मेलगाडी गेली. स्टेशनमास्तर मोकळे झाले. साहेबांनीं आतां आपली विनंति त्यांचे कानांवर घातली. ती ऐकून स्टेशनमास्तर ह्मणाले "तें माझें काम नव्हे, हेड पार्सल क्लार्कला सांगा."

परंतु हेंच त्यांनां पूर्वीं सांगितलें असतें तर! हेड पार्सल क्लार्कला एकदाचें शोधून काढिलें. हे पार्सल क्लार्क गुजराथीभाई होते. आपल्या दुर्गंधयुक्त तोंडांत विड्याचीं दहावीस पानें कोंबून बोकडासारखीं तीं चावित व वारंवार पिंका टाकित असतांना आपल्या सडून गेलेल्या आणि कोळसामिश्रित गेरू रंगाचीं पुटेंच्या पुटें चढल्यामुळें हिडिस दिसणाऱ्या दांतांचें मधूनमधून प्रदर्शन करित कसलासा हिशोब करण्यांत स्वारी गढून गेली होती. साहेबतर अगदीं घाईंत आलेले व इकडे पार्सल क्लार्क वर मानहि न उचलतां फक्त हातानेंच 'सबुर करो' असें वारंवार सांगत होते. तात्पर्य गुजराथीभाईनीं साहेबांस बराच वेळ तिष्ठत ठेविलें. कांहीं वेळानें त्यांची तब्यत लागून "चार आना लाव" असा जबाब मिळाला व ते रिसीट लिहूं लागले. त्यांनीं टेबलाचा हा खण उघडला तो खण उघडला, इकडे पाहिलें तिकडे पाहिलें, परंतु बराच वेळपावेतों त्यांनां पेन्सिलच सांपडेना! शेवटीं साहेबांनीं आपल्याजवळची पेन्सिल त्यांनां दिली. परंतु कार्बन पेपर कुठें आहे! तो धुंडाळण्याला आणखी कांहीं वेळ लागला. शेवटीं साहेबांच्या हातांत एकदाची रिसीट मिळाली व ते घाईघाईनें स्टेशनाच्या बाहेर येऊन मडमसाहेबांची गाडी पाहूं लागले. परंतु तेथें काय आहे! तो गाडीवाला नाहीं, त्याची गाडीहि नाहीं आणि मडमसाहेबहि पण नाहींत! वाचकहो! यावेळीं आमच्या साहेबांच्या मनाची स्थिति काय झाली असेल, याची आपणच कल्पना करा!

बराच वेळपावेतों साहेबांनां कांहींच सुचेना. इतक्यांत त्यांनां एक व्हिक्टोरिया दिसली. तींत बसून "बोरी बंडर! जलदी जलदी!! वन रूपी!" एवढेंच बोलून त्यांनीं गाडींतील बैठकीवर आपलें अंग टाकिलें. व्हिक्टोरियावाल्यानेंहि रुपयाच्या आशेनें घोड्याच्या जीवाकडे किंवा गाडीकडे न पहातां मोठ्या वेगानें गाडी पिटाळली व साहेब बोरीबंदरावर येऊन दाखल झाले.

यावेळीं साडे नऊ वाजले होते. नाटकास केव्हांच सुरुवात होऊन तें ऐन रंगांत आलें होतें. आज गव्हर्नरसाहेबांची स्वारी नाटक पहाण्यास आली असल्यामुळें नाटकगृहांत एवढी गर्दी झाली होती कीं, दोनदोन रुपये देऊनहि पिटमध्येंसुद्धां जागा मिळत नव्हती. हजारों लोक विन्मुख होऊन परत जात होते.

साहेबांनीं गाडींतून एकदम उडी मारून 'स्टँड'वर उभ्या असलेल्या प्रत्येक गाडींत डोकावून पाहिलें, परंतु दुःखाची गोष्ट, त्यांची मडम त्यांनां कोणत्याहि गाडींत आढळली नाहीं. आणि त्याहूनहि दुर्दैवाची गोष्ट ही कीं, मडमसाहेब बसलेल्या गाडीचा नंबरहि त्यांनीं लक्ष्यांत ठेविला नव्हता! आणि त्या नंबराचीतरी त्यांनां काय आवश्यकता होती? एका मिनिटाच्या आंत स्टेशनावर ट्रंक ठेवून रिसीट घेऊन येऊं, अशा विचारानें ते ऐटीनें स्टेशनमास्तरकडे गेले होते. दुर्दैवानें तिकडे त्यांचा बराच वेळ मोडला. इकडे गाडींत 'मडमसाब' बसल्या आहेत, 'बोरी ब्यंडर'पत्ता सांगितला आहे, 'चलो' असा हुकूम फर्मावला, गांवांतील कितीतरी मडमसाहेबांनां एकट्याच हिंडतांना गाडीवाल्यानें पाहिलें होतें—नव्हे त्यानें स्वतः नेलेंलेंहि होतें, तेव्हां साहेब परत येणार आहेत, अशी कल्पनाहि त्याच्या डोक्यांत न शिरल्यास त्यांत त्या बापड्याचा काय अपराध! बरें, साहेब यावयाचे आहेत, गाडी चालवूं नको, असें मडमसाहेबांनींतरी सांगावयाचें कीं नाहीं? परंतु आमच्या गांवठी मडमसाहेब गाडी चालू होतांच इतक्या भेदरून गेल्या, भीतीनें दुःखानें त्यांची इतकी गाळण उडाली, कीं, त्या गाडींतल्यागाडींत जवळजवळ बेशुद्धच होऊन पडल्या होत्या! त्यांची पुढें व्यवस्था काय झाली तें पहाण्यापूर्वी आपण सध्या आमच्या साहेबांबरोबरच जाऊं.

साहेबांनीं गाडीनूगाडी धुंडाळून पाहिली, एकदा पाहिलें, पुनः पाहिलें, परंतु मडमसाहेब कांहीं दिसेनात! बिचारे अगदीं हताश होऊन गेले. आतां पुढें काय करावें, हेंच त्यांनां सुचेना. शेवटीं प्रत्येक गाडीवाल्याजवळ जाऊन "तुम कोई मेमसाबको लाया?" असें ते विचारूं लागले. पुष्कळांनीं नाहीं असाच जबाब दिला; परंतु एकजण ह्मणाला "हां साब, लाया."

आतां कोठें साहेबांच्या जिवांत जीव आला. त्यांनीं त्या गाडीकडे, घोड्याकडे नीट न्याहाळून पाहिलें, तों गाडी वगैरे अगदीं तीच! ह्मणून त्यांनीं मोठ्या आतुरतेनें पुढें विचारलें "काहांसे लाया? चर्चगेट स्टेशनसे?"

"हां साब, चर्ची घाट इस्तेसणसे—"

"हामको उधर देखा था?"

गाडीवान साहेबांच्या तोंडाकडे पहात ह्मणाला "हां साब, आपकेमाफिक एक साबलोकको तो देखा था."

साहेबांची आतां पक्की खात्री झाली कीं, हीच ती गाडी! ह्मणून त्यांनीं अधीरतेनें विचारिलें "मेमसाब कीधर गया?"

गाडीवानानें उत्तर दिलें "मेमसाब भीतरमें तामासा देख रही हैं."

परंतु हें ऐकतांच साहेबांची खात्री होऊन चुकली कीं, ती कांहीं आपली मडम खास नव्हे! लीला एकटीच जाऊन नाटकाला बसेल, एवढें धैर्य तिच्या अंगीं नव्हतें. शिवाय तिकीट काढण्याला तिच्याजवळ पैसेहि नव्हते. अर्थात् ती थिएटरांत गेली नसावी, अशी त्यांची खात्री होती. परंतु चुकल्याचें मन चोहींकडे, त्याप्रमाणें कदाचित् आंत तपासतर करून पहावा, असा विचार करून तिकीट विकणाराला शोधून काढून त्याला ते इंग्रजींत विचारूं लागले " सुमारें सतराअठरा वर्षांची, अंगानें सडपातळ, अस्मानी रंगाचा पोषाख केलेली, पिसांची टोपी घातलेली, अशी एक मडम तिकीट घ्यायला आली होती काय?"

तिकीट विकणारा ह्मणाला "साहेब, मी कुणाकडे ह्मणून लक्ष्य देईन! कितीतरी साहेबलोक आणि मडमा येत होत्या जात होत्या. माझ्या कांहीं बरोबरसें लक्ष्यांत नाहीं. परंतु आपण ह्मणतां तशी एक तरुण मडम आली होतीसें वाटतें."

साहेबांनीं दहा रुपयांची नोट त्याच्या हातावर ठेविली आणि अगदीं नम्रतेनें त्याची प्रार्थना करून ह्मटलें " माझ्यावर एवढी मेहरबानी कराच. माझी चिठी तिला पोंचेल अशी व्यवस्था करा."

तिकीट विकणारानें या गोष्टीला बरेच आढेवेढे घेतले. परंतु साहेबांनीं त्या मडमेला भेटण्याची आपल्याला फारच आवश्यकता असल्याचें कळवून आणखी एक दहा रुपयांची नोट त्याच्या हातांत दिली आणि एवढें काम करण्याविषयीं त्याला फारच गळ घातला. त्याचीहि खात्री झाली कीं, साहेबांचा कांहीं वाईट हेतु नसून मडमसाहेबांशीं त्यांचें कांहीं अगत्याचें काम असेल. शिवाय पैशाच्या मोहानेंहि त्याला तसें करण्यास धीर दिला. त्या मनुष्यानें धाडस करून साहेबांनीं दिलेली चिठी बॉक्समध्यें बसलेल्या अस्मानी रंगाचा पोषाख केलेल्या आंग्ल तरुणीला नेऊन दिली. ही गौरांगना कोणी निराळीच होती, आमच्या गांवठी साहेबांची मडम नव्हती, हें येथें सांगण्याची आवश्यकता नाहीं! सर्व मंडळी-देखत आपल्याला एक दीडदमडीचा नेटिव पत्र आणून देतो, हें पाहून त्या तरुणीचा कोपानल प्रज्वलित झाल्यास नवल तें काय! हां हां ह्मणतां तेथें बसलेल्या यूरोपियन मंडळींत एकच कोलाहल होऊन गेला. त्यांतील एक तामसी स्वभावाचा साहेब एकदम उठला आणि आमच्या साहेबांच्या हेराच्या कमरेंत थाडकन् एक लाथ देऊन त्याचा कान पकडून त्याला फरफर ओढित ती चिठी पाठविणाऱ्या मनुष्याचा समाचार घेण्यासाठीं निघाला. अर्थात् स्टेजवरचें नाटक थोडा वेळ बंद पडून प्रेक्षकांस हें एक तिसरेंच नवीन नाटक पहावयास मिळालें!

## [ अंक ३ रा. ]

इकडे साहेब, नाटकगृहांत आपल्या मडमसाहेबांस पाचारण करण्यासाठीं गेलेल्या मनुष्याची आतुरतेनें वाट पहात बाहेर व्हिक्टोरियामध्यें बसले होते. त्या मनुष्याला परत येतांना साहेबांनीं दुरून पाहिला; परंतु त्याच्याबरोबर मडम-साहेब नसून कोणी एक इंगळासारखा डोळे लाल केलेला साहेबरूपी राक्षस त्या मनुष्याचा कान पकडून त्याला फरफर ओढित त्वरेनें येत आहे, हा भयंकर प्रकार पाहून साहेब आपलें मरण तत्काळ समजून चुकले व त्यांनीं गाडीवाल्यास 'एकदम चलाव' अशी इशारत करून गाडी भरधांव पिटाळली. थोडक्यांत बचावलें, नाहींतर प्राणाशींच प्रसंग बेतला होता!

साहेबांची गाडी घोडे नेत होते तिकडे चालली होती. कोठें जावयाचें तें खुद्द साहेबांनांच जर ठाऊक नव्हतें, तर बापड्या व्हिक्टोरियावाल्यालातरी काय माहीत असणार! त्यानें दोनचारदा विचारिलें, परंतु "बस चलाव !" याशिवाय दुसरें ठिकाण साहेबांनीं सांगितलें नाहीं. शेवटीं अपोलो बंदर आलें. पुढें जाण्यास मार्गच नाहीं. अर्थात् याठिकाणीं घोडे थांबले. बराच वेळपावेतों साहेब गाडींतल्या गाडींतच स्वस्थ पडले होते. रात्रीच्या थंडगार वेळीं समुद्रावरून वहात येणाऱ्या शीतल वायूनें साहेब किंचित्कालानें देहभानावर आल्यावर 'मडम गेली, पैसे गेले, परंतु प्राण जाणार होता तो वांचला !' हें पाहून त्यांनां त्या दुःखांतहि किंचित् समाधान वाटलें. त्या कृतांत काळाची भीती आतां उरली नाहीं, अशी मनाची खात्री होतांच साहेबांस पूर्व प्रसंगाची स्मृति होऊन मडमसाहेबांची काय अवस्था झाली असेल आणि आतां त्यांचा शोध कुठें आणि कसा करावा हा विचार त्यांच्या डोळ्यांपुढें उभा राहिला व त्यांचें अंतःकरण शोकाकुल झालें. ते बराच वेळपावेतों मूकरुदन करूं लागले. शेवटीं त्यांच्या डोक्यांत कांहीं विचार आला व त्यांनीं चर्चगेट स्टेशनवर पुनः घेऊन जाण्याविषयीं व्हिक्टोरियावाल्याला सांगितलें. कांहीं वेळानें व्हिक्टोरिया चर्चगेट स्टेशनावर येऊन उभी राहिली.

यावेळीं रात्रीचे साडे बारा वाजले होते. जिकडेतिकडे सामसूम झालें होतें. स्टेशनावरील मंडळी बांकांवर, खुर्च्यांवर, टेबलांवर डारडुर करित पडली होती. आमचे साहेब असिस्टंट स्टेशन मास्तरच्या खोलींत जाऊन त्यांनां जागें करून गयावयां करूं लागले. बिचारा हा स्टेशनमास्तर सुशील होता. त्याला साहेबांची

दया येऊन त्यानें पोलिसहवालदाराकडून सर्व मंडळीस जागें केलें व आपल्या खोलींत बोलावून आणिलें. साहेबांनीं आपली ट्रंक उचलणाऱ्या पोर्टरास तत्क्षणीं ओळखून काढलें. स्टेशन मास्तरनें त्या पोर्टराजवळ मडमसाहेब बसलेल्या गाडीचा नंबर व गाडीवाल्याचें नांव माहीत आहे कीं काय त्याची चौकशी केली. सुदैवेंकरून इब्राहिमखानाला तो पोर्टर ओळखित होता. पोर्टराला बक्षिस देण्याचें कबूल करून त्याला बरोबर घेऊन साहेब इब्राहिमखानाच्या शोधार्थ निघाले. साहेब आणि पोर्टर व्हिक्टोरियांत बसत आहेत, इतक्यांत स्टेशनावरील मघांचे हवालदार धावतधावत येऊन साहेबांस सलाम करून हंसतहंसत त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागले. साहेबांनीं विचारिलें "क्यंव ! बक्सीस मंगता?"

हवालदारसाहेब विकट हास्य करित ह्मणतात " आमी तो प्रोट्टर या चपरासी नै हाय, जो बक्षीस लेगा. लेकिन् वांयूच पानसुपारीकेवास्ते दिशाल तो—"

साहेबांनीं ठण करून एक रुपया हवालदारांकडे फेंकिला. हवालदारसाहेबांनीं पुनः जमिनीस लवून सलाम केल्यावर व्हिटोरिया पाखरासारखी पळूं लागली.

अर्ध्या तासाच्या आंत पायधुणीजवळ एका काळोख्या गल्लींत अंधारांतून वाट काढितकाढित एका तबेल्यासमोर व्हिक्टोरिया येऊन उभी राहिली. इब्राहिम-खान परत आला असेल कीं नाहीं, ही त्या उभयतांस धागधुगी होती; परंतु गाडी तबेल्यांत असून गाडीवालाहि जवळच एका खाटेवर झोंपेमध्यें कांहीं बरळत पडला आहे, हें पहातांच त्यांनां हातांत स्वर्ग आल्यासारखें झालें ! पोर्टरनें इब्राहिमखानास जागें करण्याविषयीं शर्थ केली, परंतु तो कांहीं जागा होईना. निजला असेल तर कीं नाहीं जागा होईल ! पोर्टरनें त्याला चारदोन रट्टे लगावून आणि दहापांच शेलक्या शिव्या हांसडून शेवटीं विचारिलें "या साहेबांस ओळखतोस ?"

साहेबांचें नांव ऐकतांच इब्राहिमखान दारूच्या निशेंतहि घाबरून गेला व सलाम करून ह्मणाला "साब, आपका मेमसाबने तो मेरेको आज दश रुपय्या बक्सीस दिया—"

साहेबांनीं घाईघाईनें विचारिलें "मेमसाब कीधर गया ?"

गाडीवाल्यानें आज रोजच्यापेक्षां बरीच दारू घशांत ओतली असल्यामुळें तो बिचारा या वेळीं परब्रह्मांत तल्लिन होऊन गेला होता. त्याला या संसाराची स्मृतिहि नव्हती. तोंडास येईल तसें बरळत होता. थोडक्याच वेळानें तो मोठ-मोठ्यानें रडूं लागला. त्याची ही स्थिति पाहून इकडे आमच्या साहेबांच्या

तोंडचें पाणी पळालें. खचीत् कांहींतरी अशुभ प्रकार घडला असावा, आणि ह्मणूनच गाडीवाला रडत आहे, असें त्यांनां वाटलें. पोर्टरहि बुचकळ्यांत पडला. शेवटीं इब्राहिमखानाला हरप्रयत्नांनीं शुद्धीवर आणून पोर्टरनें रडण्याचें कारण विचारिलें. इब्राहिमखान ह्मणाला "खूप दारू प्यालों ह्मणजे मला असेंच रडूं येतें. माझ्या फातमेला कुणीं फसवून नेलें असें भासून मी रडत असतों."

गाडीवाल्याचें हें भाषण ऐकतांच साहेबांनां त्या तशा स्थितींतहि किंचित् हंसू आलें आणि लगेच त्यांचें अंतःकरण भरून येऊन डोळ्यांत अश्रु उभे राहिले. केवळ दारूच्या निशेंत पत्नीविरहाचा खोटा भास होऊन जर इब्राहिमखानाची अशी शोकाकुल स्थिति होत होती, तर, आमच्या साहेबांच्या मडमेचा पत्ता नाहीं, पुनरपि तिचें दर्शन होतें कीं नाहीं याचीहि जबरदस्त शंका, असा वास्तविक प्रकार असल्यामुळें यावेळीं त्यांचा पत्नीविरह असह्य होऊन ते शोकविव्हल झाल्यास त्यांत आश्चर्य कसलें !

उभयतांनीं मिळून इब्राहिमखानाला माणसांत आणल्यावर त्याच्याकडून मडमसाहेब पालवरोडवरील एका बंगल्यांत गेल्याचें कळतांच साहेबांच्या देहांत नवीन प्राणांनीं संचार केला व त्या दोघांनां बरोबर घेऊन साहेबांची व्हिक्टोरिया पालवरोडकडे वळली. इतका प्रकार होईपर्यंत रात्रीचा दीड वाजला. गाडीवाल्यानें दाखविलेल्या घरापाशीं व्हिक्टोरिया थांबतांच पोर्टरला आणि इब्राहिमखानाला भरपूर बक्षीस देऊन त्यांची रवानगी केल्यावर साहेब चोरासारखे येऊन दरवाजाजवळ कितीतरी वेळपावेतों उभे राहिले. आंतील मंडळीस तोंड दाखविण्यास त्यांनां पराकाष्ठेची लज्जा वाटत होती. बराच वेळ स्तब्ध राहिल्यावर शेवटीं ते "नानासाहेब! नानासाहेब!" असें हलक्याच शब्दांनीं ह्मणत दार ठोठावूं लागले. परंतु आंतून कोणीच उत्तर देईना ! आतां साहेबांचें दार ठोठावणें आणि त्यांचा शब्दहि किंचित् मोठा झाल्यामुळें नानासाहेबांनीं खिडकी उघडून "कोण आहे?" ह्मणून दरडावून विचारिलें.

त्याबरोबर साहेबांचें तोंड बंद !

पुनः "कोण आहे?" असें विचारून कोणीच बोलत नाहीं असें पाहून नानासाहेबांनीं खिडकी बंद करून घेतली, तों "मी तो, दार उघडा." असें साहेब हलकेंच ह्मणाले.

"तूं कोण ! आणि एवढ्या रात्रीचें तुझें काय काम? जा सकाळीं येऊन मला भेट." असें आंतूनच उत्तर आलें.

साहेबांच्या मनाची स्थिति विचारूं नका. थोडा वेळ स्तब्ध राहून ते "लीला–लीला–" असें ह्मणत पुनः दार ठोठावूं लागले.

नानासाहेबांनीं झोंपमोड झाल्यासारखा शब्द करित संतापून गड्याला उठवून ह्मटलें "रामा ! खालीं दाराशीं कोण छाकटा धिंगामस्ती करित आहे त्याला पोलिसाच्या हवालीं दे पाहूं."

ही गडबड ऐकून अर्थातच घरांतील सर्व मंडळी जागी झाली ! गडीहि दार उघडून साहेबांशीं बरीच तक्रार करून पोलिसाला आणण्याचा बहाणा करून बाहेर गेला. दार उघडें दिसतांच साहेब घाईघाईनें घरांत शिरले व एका खुर्चीवर खालीं मान घालून बसले.

नानासाहेब चकित मुद्रा दाखवून साहेबांस इंग्रजींतच दरडावून विचारूं लागले "अशा रात्रीच्यावेळीं आपण कशाला आलां व आपण कोण ? "

"लीला–लीला–" याशिवाय साहेबांच्या तोंडून शब्द निघेना.

आतांतर नानासाहेबांनीं जमदग्नीचा अवतार धारण करून साहेबांची षोडशोपचारें पूजा केली व "हा छाकटाच झालेला आहे, याला चौकींतच नेऊन बसविला पाहिजे!" असें ह्मणून ते रामाला मोठमोठ्यानें हांका मारूं लागले. इतक्यांत रामाहि "पोलिसचा शिपाई खालीं उभा आहे," ह्मणून सांगत घाईघाईनें वर आला.

साहेबांची मोठी गाळण उडून गेली. आपल्या दुःखाकडे कोणाचेंहि लक्ष्य जात नाहीं, जिकडे जावें तिकडे फजिती ! कुठून आज आपल्याला ही दुर्बुद्धि आठवली, असें वाटून त्यांचें अंतःकरण भरून आलें व ते कांपतकांपत आणि जड शब्दानें ह्मणाले " मी–मी–वसंतराव ! लीला इकडे आली का—"

इतक्यांत दहाअकरा वर्षांची वत्सला नांवाची लीलेची धाकटी बहीण साहेबांजवळ येऊन ह्मणाली " भावजी, तुह्मी एकटेचसे साहेब बनलां? आमच्या लीलाताईलाहि मडमसाहेब करावं कीं नाहीं? आज तुह्मी **वसंतलीला** पहायला गेलां होतांना? बरं झालं का नाटक? लवकरसं आटोपलं? नी तुमच्या मडमसाहेब– ( ओंठ चावून ) नव्हे चुकलें—आमची लीलाताई कुठं गेली ?"

" काय पण चहाटळ पोर आहे! एक क्षणभरहि पोटांतह्मणून रहात नाहीं !" लीलेची आई वत्सलेच्या गालांत प्रेमानें एक चापटी मारून ह्मणाली. तोंच सर्व मंडळींत मोठा हास्यध्वनि उत्पन्न झाला. सर्वांची हंसतांहंसतां मुरकुंडी वळून गेली. साहेबांच्या तोंडाचा यावेळीं फोटो घेण्यासारखा होता !

शेवटीं नानासाहेब ह्मणाले "वसंतराव! काय ही तुमची विलक्षण हौस! तुह्मांला ही बुद्धि कुठून सुचली! बरें ह्मणून बरें, नाहींतर आज केवढा अनर्थ गुदरला असता? तुह्मी ती ट्रंक ठेवण्यामध्यें स्टेशनावर गुंतलां असतां इकडे व्हिक्टोरिया-वाल्यानें बोरीबंदरवर गाडी नेली. पोर कधींहि एकटी घराबाहेर गेलेली नाहीं, त्यामुळें भांबावल्यासारखी होऊन भयभीत झाली व गाडींतल्यागाडींत रडत बसली. बोरीबंदरस्टेशनाजवळ गाडी उभी करून गाडीवाला दरवाजा उघडूं लागला तेव्हां लीलेनें धीर करून गाडीवाल्याला सांगितलें कीं 'चल, स्टेशनावर पुन: घेऊन चल. साहेबांनां घेतल्याशिवाय तूं कसा आलास?' त्याप्रमाणें व्हिक्टोरियावाला पुनः चर्चगेट स्टेशनावर गेला. तेथें तुमचा बराच शोध केला, परंतु तुह्मी दिसलां नाहीं. यावेळीं तिची अगदींच गाळण उडाली. मोठें भाग्यच ह्मणायचें, कीं, तिला ताबडतोब इकडे येण्याची बुद्धि सुचली व त्याप्रमाणें तिनें गाडीवाल्यास दहा रुपये बक्षिस देण्याचें कबूल करून इकडे पोंचविण्यास सांगितलें. रात्रीं दहा वाजतां निःशंकपणें मडमसाहेब आमच्या घरांत शिरून तडक स्वयंपाक घरांत घुसतांना पाहून आह्मी सर्व मंडळी चकीतच झालों. मडमसाहेब ज्या आल्या त्या एकसारख्या स्फुंदस्फुंदून रडूं लागल्या. हा काय अकल्पित प्रकार आहे, तें किंचित्काल कोणासच कळेना. वत्सलेनें आणि तिनें मडमसाहेबांस ओळखतांच कांहीं वेळानें आह्मांला खरा प्रकार कळून आला. पोरीची ती अवस्था आणि तो विचित्र वेश पाहून हंसावें कीं रडावें तेंच आह्मांला कळेना!"

पुनः सर्व मंडळींत मोठा हंशा पिकला. साहेबांनीं मान खालीं घातली. मेल्यापेक्षांहि मेल्यासारखी त्यांची अवस्था झाली होती. नंतर थोड्यावेळानें सर्व मंडळी आपआपल्या जागीं जाऊन निजली.

*   *   *   *   *

शयनमंदिरांत वसंतलीलेची एकांतीं भेट होतांच लीला हंसतहंसत ह्मणाली "साहेब! मग उद्यां सकाळीं आपण हातांत हात घालून राजरस्त्यावरून फिरायचें ना? मला बाई नाहीं आवडत हा हिडीस हिंदुचालीचा पोषाख! मी आपली मडमेचा पोषाख करणार—"

# गोष्ट ५ वी.

## भवितव्य!

१८५७ सालच्या बंडाच्या धामधुमींत मोठ्या सायासानें जीव बचावून जे कित्येक लोक आपल्या मातृभूमीचें पुनरपि दर्शन घेण्यास भाग्यशाली झाले, त्यांतच आमचीहि स्वारी होती. कंपनीसरकारची आणि महाराणीसरकारची २५ वर्षे इमानें इतबारें नोकरी करून इंग्रजसरकाराकडून आज सतत ३२ वर्षे मी पेनशन खात आहें. आणखी १६ वर्षे ९ महिने १५ दिवस या जगांत माझा ऋणानुबंध आहे. तदनंतर मी येथील कारभार गुंडाळून परलोकाप्रत गमन करीन. ह्या साऱ्या भवितव्याच्या गोष्टी आहेत; आणि ह्या भवितव्यासंबंधींच मी आज आपल्याला पुढील गोष्ट सांगणार आहें.

या बंडाचे वेळीं मी कानपुर येथें कमीसरीएट खात्यांत नोकर होतों. कमीसरीएट खात्यांत नोकरी मिळणें हें त्या काळीं मोठें भाग्य समजत असत. अद्यापिहि या खात्याविषयीं नोकरलोकांचा आदर अगदींच कमी झाला आहे असें जरी नाहीं, तथापि एवढी गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं,आजच्या स्थितींत आणि पन्नास वर्षांपूर्वीच्या स्थितींत जमीनअस्मानाचें अंतर होतें. कमीसरीएट खातें ह्मणजे त्या वेळीं ज्याप्रमाणें लुटीचें भांडार असे, त्याप्रमाणेंच त्या खात्याचा लढाईशीं प्रत्यक्ष संबंध असल्यामुळें कोणत्या घटकेस आपल्या मस्तकाची लूट होईल, याचाहि मुळींच भरंवसा नसे. आणि त्या वेळीं लढाईचे प्रसंग ह्मणजे हरहमेश ठेवलेलेच! द्रव्यलाभ आणि प्राणहानि हीं दोन्हीहि प्रत्येकापुढें वाढून ठेविलेलीं असत. लढाईचे वेळींतर या लुटीला कांहीं सीमाच नसे. परंतु आमच्या चिरंजीवांच्या मातुश्रीचा चूडा सबळ असल्यामुळें ह्मणा, अगर अपमृत्यूनें देहनाश होण्याचा कुयोग जोशीबुवा आमच्या जन्मपत्रिकेंत लिहिण्यास विसरले असल्यामुळें ह्मणा, आमची स्वारी त्या दुसऱ्या लुटीच्या तडाक्यांत न सांपडतां जीव बचावून सुखरूपपणें परत आपल्या जन्मभूमीच्या दर्शनाला आली आणि ह्मणूनच ही भवितव्याची गोष्ट कथन करण्यास समर्थ झाली. अस्तु.

सगळी कर्मकथा सांगत बसल्यास तें एक भारूडच होईल. यासाठीं फक्त या भवितव्याचीच गोष्ट तेवढी सांगतों. मी पहिल्यानें कमीसरीएट खात्यांत ५० रुपयांवर लागलों होतों. आमच्या पलटणीचे मुख्य अंमलदार जनरल निकल्सन हे फार दयाळु स्वभावाचे गृहस्थ होते. आणि त्यांतहि काय दैवयोग असेल तो असो,

त्यांचें मजवर फार प्रेम जडलें होतें. आपल्या सख्या भावाप्रमाणें ते मजवर लोभ करित असत. त्यांचा मजवर नुसता लोभच होता असें नाहीं, तर माझ्यावर त्यांचा पूर्ण विश्वास असून माझ्या कल्याणाविषयींहि ते कळकळीनें झटत असत. ते एवढे मोठे अधिकारी, सत्ताधीश, वीर, परंतु माझ्याशीं त्यांचें वर्तन अगदीं निष्कपट प्रेमाचें असे. मीं वारंवार त्यांचे घरीं जावेंयावें, त्यांच्या मुलांमाणसांशीं हितगुजाच्या गोष्टी कराव्या, त्यांच्या घरची व्यवस्था पहावी, व कधींकधीं योग्य बाबतींत त्यांच्यावर ताबाहि चालवावा, एवढा जनरलसाहेबांच्या कुटुंबाशीं माझा घरोबा जडला होता. आणि याचा परिणाम अर्थातच मला कल्याणकारक असाच झाला.

मी ज्या वेळची गोष्ट सांगत आहें, त्या वेळीं लखनौ शहरांत बंडाचा बावटा उभारल्याची भीतिप्रद वातमी एके सकाळीं आमच्या छावणींत येऊन पोहोंचली. मी या वेळीं मिसेस निकल्सन यांच्याशीं कांहीं बोलत बसलों होतों. इतक्यांत जनरलसाहेब बाहेरून घाईघाईनें आले आणि मला पाहून ह्मणाले "रामचंदर ! तूं आलास हें बरें झालें. तुला बोलावण्यासाठीं आतांच मी आर्डलीला पाठविणार होतों. हा बघ कमीश्नरसाहेबांचा हुकूम—"असें ह्मणून आपल्या हातांतील कागद त्यांनीं माझ्यापुढें केला.

सर हेन्री लॉरेन्स यांनीं त्या हुकुमांत फर्माविलें होतें कीं 'ताबडतोब सीतापुर येथें कुच करा व बंडखोर पुढें येणार नाहींत असा बंदोबस्त करून दर्यागंज येथें तळ देऊन रहा.' किंचित्कालानें जनरलसाहेब माझेकडे पाहून ह्मणाले "वाचलेंस. उद्यां सकाळीं सात वाजतां आह्मांला इथून निघालें पाहिजे. तेव्हां पहिल्यानें आमच्या बायकामुलांस रेसीडेन्सीमध्यें कमीश्नरसाहेबांच्या बंगल्यांत नेऊन पोंचीव व नंतर तूं सीतापुरला ये."

"ठीक आहे." असें ह्मणून कांहीं वेळानें मी माझ्या बिऱ्हाडीं गेलों. परंतु कां कुणाला ठाऊक, आजच्या या हुकुमानें माझी छाती उडून गेली. मनाला चैन ह्मणून वाटेना. नानाप्रकारचीं अशुभ चित्रें डोळ्यांसमोर उभीं राहूं लागलीं. बंडखोरांची एखादी गोळी अचुक माझ्याच मस्तकांत घुसली तर! एखाद्या क्रूर शिपायाच्या तरवारीला माझ्याच कंठांतील रक्ताची तहान लागली तर ! फुकट, नाहक मी मरणार ना ? कुठें माझी जन्मभूमि कोंकण, कुठें कानपुर, कुठें मी, कुठें वृद्ध मातोश्री, प्रिय पत्नी आणि लाडकीं मुलेंलेंकरें ! आतां त्यांचें दर्शन कसचें घडतें ! इत्यादि वाईटवाईट विचार मनामध्यें उभे राहून साऱ्या रात्रींत माझा डोळ्याशीं डोळा कसा तो लागला नाहीं. परंतु लाचार ! मिलटरीखात्याचा हुकूम !

दुसरे दिवशीं मोठ्या सकाळींच मिसेस निकल्सन वगैरे मंडळीची रवानगी करण्यासाठीं ह्मणून मी जनरलसाहेबांच्या बंगल्यावर गेलों. साहेब या वेळीं प्रफुल्ल चित्तानें सकाळची न्याहारी करित बसले होते. तें पाहून मला आश्चर्य वाटलें. परंतु आश्चर्य कसलें ! तेतर पहिल्यानेंच मस्तक विकून साता समुद्रांपलीकडे नोकरी करण्यासाठीं आले होते. शिवाय ते शूर शिपाई गडी. लढाईमध्येंच त्यांना आनंद. अर्थात् कमीश्नरसाहेबांच्या कालच्या हुकुमाबद्दल ते दिलगीर न होतां, उलट एखादा तरुण नवरा वधूगृहींच जात आहे अशा आनंदानें त्यांनीं सीतापुरला जाण्याची धामधूम मांडली होती. त्यांच्या मुद्रेवर विलक्षण आनंद दिसत होता. परंतु माझें तोंड अगदीं सुकून गेलें होतें. माझें तें निस्तेज, चिंतायुक्त मुख अवलोकन करून जनरलसाहेब माझ्या पाठीवरून हात फिरवित ह्मणाले "रामचंदर, एवढा कां वरें भितोस ? तुला नेहमीं आमच्याजवळ ठेवूं, ह्मणजे झालें ना ? वेड्या, कसली विशाद घेऊन बसला आहेस ? तूं मुळींहि डगमगूं नको !"

परंतु मी मनामध्यें ह्मणालों "ह्मणजेतर माझें उद्यांचें मरण आजच येऊन ठेपलें ह्मणायचें ! तुमच्यापासून दूर राहिलों, तर एखादे वेळीं जगण्याचीतरी आशा. परंतु तुमच्या मागेंमागेंच राहिल्यास गव्हांबरोबर बिचाऱ्या निरपराधी बरडाचेंहि जसें पीठ होतें तद्वतच इतर टोपीवाल्यांबरोबर बंडखोरांची गोळी माझ्याहि मस्तकांत घुसायची !"

[ २ ]

सीतापुर येथें आठदहा दिवस राहून बंडखोरांचा त्रास बराच कमी झाल्यावर नंतर आमचे छावणीनें दर्यागंज येथें तळ दिला होता. छावणीमध्यें बरेचसे गोरे शिपाई, शीख लोकांच्या दोन तुकड्या व दक्षिणी शिपायांची एक तुकडी एवढी मंडळी असे. शीख, दक्षिणी शिपाई हा वेळपावेतों आपल्या निमकाला जागून होते. आणि आमच्या जनरलसाहेबांचाहि त्यांचेवर पूर्ण विश्वास होता. एक दिवस सकाळचे वेळीं शिपाई लोक आपापल्या राहुट्यांजवळ स्वयंपाक करित बसले असतां चारपांच भिकारी स्त्रिया तेथें येऊन उभ्या राहिल्या. या स्त्रियांचा पोषाख अगदींच गलिच्छ असून त्यांची मुद्राहि चमत्कारिक दिसत होती. त्या शत्रूकडील बातमी काढण्यासाठीं आलेले हेर असतील अशा संशयानें शिपायांनीं त्यांस पकडलें व एकदम मारझोड करूं लागले. काय गडबड आहे ती पहाण्यासाठीं ह्मणून मी तंबूतून बाहेर आलों. तों त्या स्त्रियांपैकीं एक दहाअकरा वर्षांची मुलगी

मजकडे दीनवाणीनें पहात आपली मुक्तता करण्याविषयीं माझी प्रार्थना करूं लागली. "तुह्मी कोण लोक आहां? तुमचा मुलूख कोण व इकडे कशासाठीं आलां आहां?" वगैरे माहिती मीं त्यांनां विचारतांच ती मुलगी ह्मणाली "आह्मी भिक्षा मागणाऱ्या भिकारी स्त्रिया. इकडे भिक्षा मिळेल ह्मणून आलों होतों. आह्मी जाऊं तिकडे आमचा मुलुख. आह्मांला घरदार कांहीं नाहीं."

"तूं भिकारी ह्मणतेस परंतु तुझ्या अंगावर हे दागिने कसे आले? कुठें चोरीबिरी नाहींना केली?"

यावर ती मुलगी आवेशानें ह्मणाली "साहेब, आह्मी भिकारी झालों ह्मणून असें नीच काम करूं, असें समजूं नका. आह्मी हात पाहून भविष्य सांगत असतों; त्याबद्दल तुमच्यासारखे थोर लोक पैसा दोनपैसे देतात त्यांवर आह्मी निर्वाह करतों. हे दागिनेहि आमच्या कमाईचे आहेत. चोरी करून मिळविले नाहींत."

मीं विचारिलें "तूं भविष्य सांगतेस? माझा पहाशील का हात? बरें हेंच खरें, तर सांग पाहूं बंडवाल्यांशीं आमची कधीं लढाई होईल?"

दहा वर्षांची अज्ञान पोर आणि भविष्य सांगते, हें पाहून मला हंसूं आलें व ती काय उत्तर देते तें ऐकण्यास मी उत्सुक झालों. ती मुलगी क्षणभर स्तब्ध राहून गंभीर मुद्रा करून ह्मणाली "१४ तारखेला बंडवाले तुमच्यावर हल्ला करतील. तुमचे पुष्कळ शिपाई मरतील. परंतु तुमच्या जिवाला धोका पोंचणार नाहीं. या दिवसापासून तुमचा ऊर्जितकाळ आहे."

मुलीच्या त्या भविष्यापैकीं मला एक अक्षरहि खरें वाटलें नाहीं. तथापि जनरल साहेबांकडे या मुलीला न्यावी, तेथें मंडळीची क्षणभर करमणूक होईल असा विचार करून मी त्या सर्वांनां जनरलसाहेबांच्या तंबूजवळ घेऊन गेलों. जनरलसाहेब या वेळीं कांहीं कागद लिहित होते. मला पाहून त्यांनीं "काय हकीगत आहे?" ह्मणून विचारिलें. मीं एकंदर प्रकार सांगतांच त्यांनीं हातांतील काम खालीं ठेविलें व त्या मुलीला आंत घेऊन येण्यास सांगितलें. मुलगी यत्किंचितहि न डगमगतां साहेबांजवळ आली व धिटाईनें त्यांच्या तोंडाकडे टकटक पाहूं लागली. साहेबांनीं विचारिलें "१४ व्या तारखेला लढाई होईल हें तुला कसें समजलें? खरें सांग, भिऊं नको, तुला खूप इनाम देऊं."

मुलगी ह्मणाली "मीं गणित करून पाहिलें."

यावर जनरलसाहेब ह्मणाले "That's all humbug."

जवळच कप्तान पिटर्सन बसले होते. ते हंसतहंसत मुलीजवळ येऊन ह्मणाले

"छोकरी, माझा हात पहा बरें. माझ्या नशिबांत काय आहे तें सांगशील तर तुला पुष्कळसें इनाम देऊं."

कप्तानसाहेब मुलीची थट्टा करित होते. परंतु मुलीनें हात पाहून गंभीर स्वरानें उत्तर दिलें "परवांच्या युद्धांत तुमचें मरण आहे."

हें ऐकून कप्तानसाहेब मोठमोठ्यानें हंसत सुटले. वेडी पोर, कांहींतरी बरळते आहे झालें, असेंच त्यांनां वाटलें. पुढें ते विचारूं लागले "परंतु मी कशा रीतीनें मरेन, तें सांग पाहूं."

"छातींत बंदुकीची गोळी लागून तुह्मी जखमी व्हाल आणि नंतर दीड घंट्यानें तुमचें प्राणोत्क्रमण होईल. या वेळीं तुमची योग्य शुश्रूषा झाली असती तर तुह्मी वांचलां असतां; परंतु त्या प्रसंगीं तुमची शुश्रूषा होणार नाहीं. १४ वी तारीख हाच तुमचा मृत्युदिन आहे."

कप्तानसाहेबांची मघांची मुद्रा आतां किंचित् पालटल्यासारखी दिसूं लागली. मग त्यांनां मुलीचें भाकीत खरें वाटलें कीं काय नकळे. त्यांनीं मुलीच्या हातावर एक रुपया ठेविला; परंतु तो ती घेईना. इतक्यांत जनरलसाहेब तिला ह्मणाले "आतां माझा हात पहा."

मुलीनें हात पाहिला व थोड्या वेळानें तो सोडून दिला. जनरलसाहेबांनीं विचारिलें "काय पाहिलेंस?"

"मी सांगणार नाहीं."

"तूं भिऊं नकोस, तुला काय वाटेल तें बेलाशक सांग, तुला कुणीहि मारणार नाहीं."

"आपलाहि १४ व्या तारखेलाच मृत्यु आहे."

"कोणची १४ वी तारीख?"

"मे महिन्याचीच."

"पण कोणता मे महिना?"

"तें सांगतां येत नाहीं. गणितामध्यें तें बरोबर कळत नाहीं."

"बरें कशानें मृत्यु होईल तेंतरी सांगशील?"

मुलगी किंचित्काल स्तब्ध राहून नंतर ह्मणाली "अपघात अगर खून—"

जनरलसाहेब हंसतहंसत ह्मणाले "अच्छा! पहातां येईल." नंतर ते मजकडे वळून ह्मणाले "ही कांहीं शत्रुपक्षाकडील हेर मंडळी नव्हे. यांनां जें हवें असेल तें देऊन निरोप दे."

साहेबांच्या आज्ञेप्रमाणें त्या मंडळीस भरपूर शिधासामुग्री देऊन मी पुनः तंबूंत येतों तों कप्तानसाहेब विषण्णवदनानें खुर्चीवर पडले असल्याचें मला दिसून आलें. जनरलसाहेब आपलें पूर्वीचें लिहिण्याचें काम करित होते. त्यांची कप्तान-साहेबांकडे हा वेळपावेतों नजरच फिरली नव्हती. मी येतांच त्यांनीं वर मान केली तों कप्तानसाहेबांकडे त्यांचें लक्ष्य गेलें. त्यांची त्या वेळची ती शोकास्पद स्थिति अवलोकन करून जनरलसाहेब ह्मणाले " पिटर्सन ! त्या छोकरीच्या बोलण्यावर विश्वास ठेवून तुह्मी एवढे भिऊन गेलां ? वेडतर नाहींना लागलें तुह्मांला ! "

कप्तानसाहेब बळेंच हास्यमुद्रा करून ह्मणाले "छट ! त्या पोरीच्या बोलण्याची मी मुळींच पर्वा करित नाहीं; परंतु परवां लढाई होईल हें त्या पोरीला कसें कळलें, याचाच मी विचार करित आहें. तीं खात्रीनें हेर असतील. God bless my Soul !! त्यांनां सोडून दिलें हें चांगलें झालें नाहीं—"

त्यांचें असें भाषण चाललें आहे इतक्यांत बटलर खाना घेऊन आला. तेव्हां मीहि आपल्या तंबूकडे निघून गेलों.

[ ३ ]

तारीख गेली. १४ वी उजाडली. माझ्या मनामध्यें त्या मुलीच्या ोवाय दुसरी कोणतीहि गोष्ट घोळत नव्हती. आज १४ वी तारीख. ा दुर्धर प्रसंग ओढवतो देव जाणे, अशी सकाळपासूनच मला धास्ती ी. जनरलसाहेब, कप्तानसाहेब मोठ्या सावधगिरीनें राहिले होते. सर्व मंडळीस सशस्त्र तयार रहाण्याविषयीं काल रात्रींच सूचना देण्यां ाली होती. शत्रूकडील वर्तमान काढण्यासाठीं कांहीं निवडक हेरहि पाठविण्यांत आले होते. सकाळपासून युद्धाला आतुर झालेल्या सेनेच्या शस्त्रांचे झणत्कार, पादचारी सैनिकांच्या पदविक्षेपांचा भीषण शब्द, युद्धोत्साही अश्वांच्या खिंकाळण्याचा कर्कश रव, इंग्रज शिपायांच्या 'हिप-हिप-हुर्रे!' दिगदिगंताला कंपाय-मान करित होता. सुमारें एक वाजतां एका हेरानें बातमी आणिली कीं "हजरत-गंजाच्या मैदानामध्यें बंडखोरांच्या टोळ्या जमूं लागल्या आहेत. संध्याकाळपर्यंत असेंच चालल्यास ते आमच्या लोकांची धुळदाणी उडवून देतील."

साहेबांनीं ही बातमी ऐकतांच एकदम कुच करण्याचा हुकूम दिला. बंडखोर या वेळीं बेसावध होते. रात्रीं गुपचूप छापा घालण्याची त्यांची मसलत होती, तोंच त्यांच्यावरच आकस्मिक रीतीनें असा हल्ला होतांच त्यांची मोठी दाणादाण

उडाली. संध्याकाळपर्यंत उभयपक्षांची मोठी झपाझपी चालली. शत्रु हटले. पळूं लागले. इंग्रजी सैन्य जयोल्हासानें मत्त होऊन रात्रीं आठ वाजतां छावणीकडे परतलें.

जनरलसाहेब घोड्यावरून उतरून तंबूमध्यें चालले होते. एवढा जयलाभ झाला, तरी त्यांची मुद्रा आज प्रफुल्ल दिसत नव्हती. युद्धांतील श्रमामुळें त्यांचे सर्व कपडे घामानें भिजून चिंब झाले होते. एकदोन ठिकाणीं रक्ताचे डागहि दिसत होते. साहेबांला सुखरूपपणें परत आलेले पहातांच मी अत्यंत आनंदित झालों व त्यांनां अनेक धन्यवाद देऊन परमेश्वराचे आभार मानिले. किंचित्काळ गेल्यावर मीं साहेबांनां विचारलें "कप्तानसाहेब कुठें दिसत नाहींत ते ?"

साहेब चमकून ह्मणाले "काय! पिटर्सन अद्यापि परत आले नाहींत?"

साहेब तसेच्या तसे घोड्यावर पुनरपि स्वार झाले. साहेब, मी, आणि आणखी चार गोरे शिपाई मिळून दिवे घेऊन क्षणार्धांत कप्तानसाहेबांच्या शोधार्थ समरभूमीकडे निघालों. किती भयंकर या रात्रीचा तो देखावा होता! जिकडेतिकडे क्षतविक्षत झालेल्या मृत देहांच्या राशीच्याराशी पडल्या आहेत. कोणाचीं मस्तकें तर कोणाचीं कबंधें, कोणाचे हात तर कोणाचे पाय छिन्नभिन्न होऊन जागजागीं पडलेले पाहून अंतःकरणाची जी शोकास्पद स्थिति झाली, ती वर्णन कर[illegible] येत नाहीं. जिकडेतिकडे हजारों प्रेतें पडलीं होतीं; त्याप्रमाणेंच शिपाई मरणोन्मुख होऊन अद्यापि विव्हळतच होते. किती हृदयद्रावक तो कानीं येत होता. पाणी पाणी ह्मणत कित्येक आक्रोश करित होते तर आपल्या कुटुंबीजनांची आठवण करित विलापाचे हंबरडे फोडित होते बोलतांबोलतां प्राण सोडित होते. अशा त्या यमपुरींत आह्मी कप्तान[illegible]चा शोध करित हिंडत होतों. बराच वेळपावेतों आह्मांला पत्ता लागेना. को[illegible] इंग्रज शिपाई मेलेला आढळला, कीं साहेबांनीं दिव्याच्या प्रकाशांत त्याला नीट निरखून पहावें. याप्रमाणें शेंकडों इंग्रज प्रेतें पाहिलीं, परंतु कप्तानसाहेब कांहीं आढळेनात. शेवटीं निराश होऊन सर्व मंडळी छावणीकडे परतण्याच्या बेतांत होती, इतक्यांत एका घोड्याच्या प्रेताजवळ कोणाचा "पाणी–पाणी" असा अस्पष्ट शब्द माझ्या कानीं आला. ह्मणून मी दिवा घेऊन तेथें गेलों, तों काय अनर्थ सांगावा! कप्तानसाहेब ऊर्ध्वीं लय लावून पडले आहेत. ताबडतोब सर्व मंडळी तेथें धावून आली. कप्तान-साहेबांची ती शोचनीय अवस्था पहातांच जनरल निकल्सन एखाद्या मुलासारखा आक्रोश करूं लागले. त्यांनीं कप्तासाहेबांचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें व त्यांची शुश्रूषा आरंभिली.

इकडे असा प्रकार चालला आहे, तों तेथें समोरच जखमी होऊन पडलेला एक शिपाई पडल्यापडल्या बंदुकीच्या चापाला हात घालून साहेबांवर नेम धरित होता तिकडे माझें लक्ष्य गेलें. थोडक्यांत बचावलें—नाहींतर आमचे दयाळू साहेबहि त्याच १४ व्या तारखेला प्रभु येशूकडे गेले असते. विजेच्या वेगानें ठण्दिशीं उडी मारून मीं त्या हरामखोराचा बंदुकीचा हात तरवारीनें दूर केला. त्या आघातासरशी त्यानें भयंकर चीत्कार करून प्राणविसर्जन केलें. परंतु त्याच्या बंदुकीच्या गोळीबरोबरच आमच्याबरोबर आलेल्या चार गोऱ्या शिपायांपैकीं एकानें परलोकीं प्रयाण केलें. साहेबांनीं हा सर्व प्रकार पाहिला व सद्गदित होऊन ह्मटलें "रामचंदर, आज तूं मला जीवदान दिलेंस. ही गोष्ट प्राणांतींहि मी विसरणार नाहीं."

आतां आह्मी कप्तानसाहेबांच्या शुश्रूषेस लागलों. पाण्यामध्यें थोडीशी ब्रांडी घालून ती त्यांनां पाजल्यावर त्यांच्या अंगीं किंचित् अवसान येऊन ते क्षीणस्वरानें बोलूं लागले "डियर निक्, युद्धाच्या प्रारंभींच मी जखमी झालों. ही पहा माझ्या छातींतून आरपार गोळी गेली आहे. आतां माझ्या जीवनाची मुळींच आशा नाहीं. पाणी–पाणी—"

मीं पुन्हा ब्रांडी व पाणी दिलें. कप्तानसाहेब पुनः बोलूं लागले "आतां माझा हाच शेवटचा निरोप. माझी आपल्याला एवढीच नम्र विनंति आहे कीं, माझे जे कांहीं पैसे आहेत ते इंग्लंडांत मिस रिचर्डसनला पाठवा. अरेरे! आतां ती पोर काय करील ! मी मरण पावलों, तूं आतां माझ्याबद्दल शोक करूं नकोस, दुसऱ्या कुणाबरोबरतरी लग्न करून सुखी हो, असा माझा निरोप तिला पोंचवा. आणखी ती चंडाळ कारटी—पण तिच्याकडेतरी काय दोष ! माझ्या नशिबांत जें होतें तेंच तिनें सांगितलें— ती जर कुठें आढळली तर तिला दोनशें रुपये बक्षीस द्या— आणि–आणि डियर निक्, तुह्मी मात्र सावध रहा—त्या पोरीचें भाकीत कधींहि खोटें व्हावयाचें नाहीं—पाणी--पाणी–पाणी द्या—"

पुनः पाणी आणि ब्रांडी पाजली. कप्तानसाहेब पुढें बोलूं लागले "विसरूं नका, डियर निक्, मेची १४ वी तारीख कधींहि विसरूं नका; त्या पोरीचें भविष्य कधींहि चुकणार नाहीं. मी आतां जातों—माझा प्रेतात्मा तुमच्या अखेरच्या दिवशीं तुह्मांला भेटेल—"

बोलतांबोलतां कप्तानसाहेबांच्या देहांतील दिव्यज्योत अंतर्धान पावली.

[ ४ ]

या गोष्टीला आतां आठ वर्षें होऊन गेलीं होतीं. बंडाची धामधूम शांत होऊन सर्वत्र शांतता झाली होती. साहेबांनां बहादुरीचा पूर्ण मोबदला मिळून त्यांचा पगार आणि हुद्दा बराच वाढला होता. साहेबांची माझ्यावर मुळापासूनच मेहरबानी होती. त्यांत एक वेळ मीं त्यांचा जीव बचाविलेला. अर्थात् त्या मुलगीचें भाकीत खरें ठरून माझीहि कल्पनेबाहेर उन्नति झाली होती, हें येथें सांगण्याची आवश्यकता नाहीं. तथापि त्या मुलीनें साहेबांसंबंधीं केलेलें भाकीत खरें ठरलें नाहीं—परमेश्वर करो आणि तिचें भाकीत मिथ्या ठरो असें रात्रंदिवस मी देवापाशीं प्रार्थित होतों. मेच्या कितीतरी १४ व्या तारखा गेल्या– आणि या तारखा ह्मणजे मला काळरात्री भासत– साहेबहि या दिवशीं सचिंत असत.– आतांतर माझी खात्री होऊन चुकली कीं, मुलीचें भाकीत खोटें होतें. गणित करावयाला मुलगी चुकली असावी. परमेश्वर करो आणि तसेंच होओ—माझे दयाळु साहेब दीर्घायु होओत!

साहेबांनीं एक वर्षाची फर्लो रजा घेतली. ते विलायतेस जाण्याच्या तयारीला लागले. मींहि वर्षाची रजा घेऊन आपल्या विलायतेस जाण्याचा विचार केला. एक दिवस सकाळीं आह्मी उभयतां बोलत बसलों असतां साहेब दचकून ह्मणाले "रामचंदर ! आज कितवी तारीख? १३ वी मे ?"

मीं होय ह्मणून उत्तर करतांच "ऊः, उद्यां १४ वी!" असें ह्मणून त्यांनीं एक श्वास टाकला व त्यांचें तोंड काळेंठिक्कर पडलें. क्षणकाल स्तब्ध राहून नंतर खिन्न मुखानें ते ह्मणाले "आठ वर्षांपूर्वी हजरतगंज येथील छावणीमध्यें ती छोकरी जें बोलली होती तें स्मरतें का ? कप्तान पिटर्सनच्या शोचनीय मृत्यूची हकीगत आठवते का ?"

रात्रंदिवस ही गोष्ट माझ्या डोळ्यांपुढें ताजीच असे आणि त्याबद्दल विचार करूनकरून मीं अगदीं दुःखित होत असें. तरी या वेळीं आपण त्या गांवचेच नव्हों, अशी बतावणी करून मीं आश्वासनपर शब्दांनीं उत्तर दिलें "साहेब, त्या गोष्टीविषयीं आपण व्यर्थ कशाला विचार करित असतां ! दरसाल १४ वीला आपली मुद्रा फार विषण्ण दिसत असते. त्या हकीगतीला आज उणींपुरीं आठ वर्षें होत आलीं, परंतु परमेश्वराच्या कृपेनें आपल्या केंसासहि धक्का लागला नाहीं. परमेश्वर आपल्याला उदंड आयुष्य देओ—त्या पोरीचें ह्मणणें आपण लक्ष्यांतहि आणूं नका ! फुलाबोलाला गांठ पडून तिच्या एकदोन गोष्टी खऱ्या ठरल्या ह्मणून तिला

पुढील भविष्य कळलें असें थोडेंच ह्मणतां येणार आहे? दहा गोष्टी सांगितल्या कीं त्यांतील एखादीदुसरी खरी ठरायाचीच ! एवढीशी दहा वर्षांची पोर, तिला काय कळणार आहे! आपण तो विचारहि कधीं मनांत आणूं नका."

साहेब ह्मणाले "तुह्मा तिच्या भाकीतावर विश्वास असो अगर नसो, परंतु मी तिचें तें भाकीत कधींहि विसरणार नाहीं."

इतक्यांत साहेबांकडे कोणी सरकारी कामगार आल्यामुळें मी उठून दुसरीकडे गेलों.

१४ वी तारीख उजाडली. संपूर्ण दिवस निर्विघ्नपणें पार पडला. संध्याकाळ आली. सुनील आकाशामध्यें रोहिणीपति चंद्रमा आपल्या सुधाधवल किरणांची दिव्य प्रभा पसरूं लागला. आह्मी सर्व मंडळी जनरलसाहेबांच्या बंगल्याच्या व्हरंड्यांत बोलत बसलों होतों. मिसेस निकल्सन आपल्या पतीला उद्देशून ह्मणाल्या "डियर निक्, परमेश्वराचे आभार माना; १४ वी तारीखतर उलटून गेली. आतां कसली भीति उरली आहे ?"

मडमसाहेबांच्या या ह्मणण्यास मींहि हुजोरा दिला. तथापि माझ्या अंतर्यामीं काय गडबड उडाली होती, ती माझी मलाच ठाऊक. इतक्यांत साहेब ह्मणाले "डियर हेलेन्, अद्यापि भरंवसा नाहीं. मध्यरात्र जर निर्विघ्नपणें उलटली, तर मग यांतून पार पडलों असें समजूं. आजपर्यंत कितीतरी १४ व्या तारखा गेल्या, परंतु आजच्यासारखी मनाची अस्वस्थता कधींहि अनुभविली नव्हती."

साहेबांचें हे शब्द तोंडांतल्यातोंडांत आहेत, इतक्यांत फाटकापाशीं साहेबांचे विलायती कुत्रे भयंकर रीतीनें भुंकूं लागले. त्यांचा तो शब्द ऐकून माझीतर छातीच उडाली. कुत्रे एकसारखे मोठमोठ्यानें कां ओरडत आहेत, हें पहाण्याची अर्थातच आह्मांला जिज्ञासा झाली. फाटकाजवळतर कोणीहि दिसेना; परंतु कुत्रेतर कोणाच्यातरी अंगावर गुरगुरून त्याच्यावर तुटून पडत होते. साहेबांचा मुलगा आणि पुतण्या दोघेहि फाटकापाशीं गेले. परंतु तेथें कोण आहे ! दूरवर पाहिलें, परंतु कोणाचीच चाहूल दिसेना. कुत्रेहि आतां किंचित् स्वस्थ झाले. किंचित्काल उभें राहून कोणी दिसत नाहीं असें पाहून ते उभयतां परत आमच्याजवळ आले.

ते व्हरंड्यांत आले मात्र, तोंच कुत्रे पूर्वींपेक्षांहि भयानक आरोळ्या मारूं लागले. कांहीं केल्या उगी ह्मणून राहीनात. तेव्हां काय प्रकार आहे तो समक्ष पहाण्यासाठीं ह्मणून साहेब स्वतां फाटकापाशी गेले. ते तेथून परतले मात्र, तोंच त्यांचें तोंड

इतकें भीतिपूर्ण दिसूं लागलें कीं, माझ्यानें वर मान करूनहि त्यांच्याकडे पहावेना. साहेब म्लानमुखानें आम्हां सर्वांनां म्हणाले "रात्र बरीच झाली, तुम्ही आपापल्या जागीं निजा जा. मीहि आतां निजतों." असें म्हणून ते आपल्या निजावयाच्या खोलींत जाऊन बिछान्यावर पडले.

यावेळीं रात्रीचे साडेअकरा उलटले होते. आणखी फक्त अर्ध्या तासानें १४ वी तारीख संपणार. म्हणून आम्ही कोणीहि तेथून न हालतां आणखी अर्ध्या तासानें साहेबांचें संकट टळल्याबद्दल त्यांचें अभिनंदन करण्यासाठीं म्हणून जागत बसलों. आम्हांला मनामध्यें आतां केवढा आनंद झाला होता! कधीं एकदा अर्धा तास जाईल, असें सर्वांस झालें होतें. परंतु हाय! भवितव्याला का कुणाला ठकवितां येईल?

व्हरंड्यांत बसून आम्ही बारांचे ठोके पडण्याची मार्गप्रतीक्षा करित आहों, इतक्यांत जनरलसाहेब उठून बाहेर गच्चींत आले. मिसेस निकल्सनहि या वेळीं त्यांचेबरोबर होत्या. घरांत फारच उष्मा होऊं लागल्यामुळें थोडा वेळ मोकळ्या हवेवर बसून वायुसेवन करण्यासाठीं म्हणून साहेब तेथें आले होते. आम्हांला हा प्रकार कळलाहि नाहीं. आमचें सारें लक्ष्य घड्याळाच्या कांट्यांकडे लागलें होतें. बारांला आतां एकच मिनिट कमी होतें, इतक्यांत भयंकर आरोळी ऐकूं आली. आम्ही सर्व मंडळी वायुवेगानें गच्चींत धावून गेलों. साहेब आणि त्यांची पत्नी गच्चींत स्वस्थ बसलीं आहेत—मग ही आरोळीतरी कसली आणि कुणाची?! परंतु आमचा हा विस्मय फार वेळ टिकला नाहीं. ती आरोळी क्रमाक्रमानें जास्तच भीतिप्रद ऐकूं येऊं लागली—कोणा स्त्रीचीच ती आरोळी असावी असें आम्हांला वाटूं लागलें व आणखी एका क्षणाच्या आंत एक रक्तानें लडबडलेली स्त्री भीतीनें कांपतकांपत येऊन साहेबांच्या पायांवर तिनें लोळण घेतली. तिच्यामागून कोणी धावून येत असल्याचा आवाज ऐकूं आला. ती स्त्री कांपतकांपत म्हणाली "खुदावंद! मला वांचवा—मला वांचवा—रहीम सुरा घेऊन माझा खून करण्यास येत आहे—हा पहा आला—आला—" बोलतांबोलतां पिरोजाची बोबडीच वळली. साहेबांचा बबर्जी रहीमबक्ष याची पिरोजा बायको होती.

इतक्यांत रहीमबक्षहि हातांत रक्तानें माखलेला सुरा घेऊन धावतच आला. त्या कृतांत काळाला पाहून पिरोजा जीव घेऊन जागा मिळेल तिकडे पळूं लागली. आम्ही सर्व मंडळी चित्रासारखी तटस्थ होऊन टकटक पहातच राहिलों. जनरलसाहेब या वेळीं अत्यंत संतप्त झाले होते. त्यांनीं एका नोकरास हांक

मारून ह्मटलें "या बदमाशाला कैद करून कोंडून ठेवा. सकाळीं याचा इन्साफ करूं."

बबर्जीवर या या वेळीं खून चढला होता. पिरोजा हातची निसटल्यामुळें त्याला अतिशय त्वेष येऊन त्यांत आणखी साहेबांच्या तोंडचे हे रागाचे शब्द ऐकतांच तो चांडाळ एकदम साहेबांच्या अंगावरच तुटून पडला व क्षणार्धांत हाय–त्याच्या हातांतील सुरा साहेबांच्या छातींत घुसला !

काय तो भयंकर प्रसंग ! शत्रूवरहि असा प्रसंग पहाण्याची पाळी कधीं न येओ ! माशाप्रमाणें तडफड करून साहेबांनीं तत्क्षणीं प्राण सोडला. त्या मुलीच्या भविष्यवाणींतील प्रत्येक अक्षर खरें ठरलें. खरोखर, अदृष्टलिपि अखंडणीय होय ! नाहींतर आज हा असा अकल्पित प्रकार कां घडता ? मला सर्व गोष्टींचा विसर पडेल—परंतु जनरलसाहेबांचा तो शोचनीय अंतकाल मी केव्हांहि विसरणार नाहीं !

या गोष्टीला आज ३८ वर्षे लोटलीं आहेत. सांप्रत आह्मी पलितकेश, गलितदंत, ऐशीं वर्षांचे वृद्ध आजोबा बनलों आहों. कोंकणांत समुद्रतीरीं हरिहरि ह्मणत नातवंडांपणतवंडांचें सुख अनुभवित सरकारी पेन्शनीचा खुशाल उपभोग घेत आहों. तथापि १८६५ सालच्या मे महिन्याच्या १४व्या तारखेच्या मध्यरात्रीची ती भयंकर गोष्ट आजहि माझ्या डोळ्यांपुढें जशीच्या तशी उभी आहे. ती विसरण्याचा मीं पुष्कळ प्रयत्न केला व करितहि असतों, परंतु कांहींकेल्या ती स्मृतिपटलावरून दूर ह्मणून होत नाहीं !

* * * * * *

वाचकहो ! आपल्याला मीं सांगितलेली ही हकीगत खरी वाटो अगर न वाटो, विसाव्या शतकांतील ज्ञानप्रकाशानें तुमचे डोळे दिपून गेले असल्यामुळें तुह्मी माझी ह्मातान्याची थट्टा करा अगर मला ह्मातारचळ लागला आहे असेंहि खुशाल ह्मणा–पण जें मी एवढा ह्मातारा झालों तरी विसरूं शकलों नाहीं, जें आजहि माझ्या रोमरंध्रांत खिळून राहिलें आहे तेंच मीं तुह्मांला सांगितलें. तुह्मी विश्वास ठेवा अगर नका ठेवूं, पण मी तुह्मांला स्पष्ट सांगतों कीं, सुखदुःख, संपत्तिविपत्ति, लाभहानि, जन्ममृत्यु हीं सारीं भवितव्याधीन आहेत. या भवितव्याला व्यर्थ करण्याची शक्ति प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्याहि ठिकाणीं नाहीं; मग क्षुद्र मानवांचा तेथें काय पाड !

# गोष्ट ६ वी.

## क्षुल्लक चुकीचा भयंकर परिणाम.

त्र्यंबकरावांसारख्या सुशिक्षित गृहस्थावर एका क्षुल्लक चुकीमुळें असा भयंकर अनर्थ ओढवलेला पाहून एखाद्या पाषाणहृदयालाहि पाझर फुटेल!

सुमारें वीस वर्षांची गोष्ट. व्यवसायानिमित्त मला नेहमीं बाहेरगांवीं रहावें लागे. तरी कधींकधीं मी एकदोन दिवसांसाठीं पुणें येथें येत असें. त्याप्रमाणें एकदा पुणें येथें असतां त्र्यंबकराव दुसरें लग्न करणार आहेत असें बोलतांबोलतां एका स्नेह्याकडून मला समजलें. ही बातमी पहिल्यानें मला खरीच वाटेना. त्र्यंबकरावां-सारखा विचारी, सुधारणाप्रिय, सुशिक्षित गृहस्थ असें भलतेंच वर्तन करील, या गोष्टीवर माझा कसा बरें विश्वास बसावा? तथापि मनाची रुखरुख कांहींकेल्या शांत होईना. त्यांनां समक्ष भेटून या बाबतींत विचारावेंच, असा निर्धार करून मी तसाच उठलों व त्यांच्या बिऱ्हाडीं गेलों; परंतु दुर्दैवानें त्यांची माझी मुलाकत झाली नाहीं. ते कालच मुंबईस गेले व तिकडे दोनतीन दिवस त्यांचा मुक्काम होणार आहे, असें मला कळलें. आणि मलातर दुसरेच दिवशीं सोलापुरास जावयाचें होतें. मुंबईस जाऊन त्यांची भेट घ्यावयाला अथवा ते परत येईपर्यंत पुणें येथें थांबावयाला अवकाश नव्हता. म्हणून मीं त्यांनां या बाबतींत एक पत्र लिहून आपल्या कामावर निघून गेलों. आठ दिवसांनीं त्र्यंबकरावांकडून माझ्या पत्राचें पुढील उत्तर आलें:—

"पुणें, ता. २५ नोव्हेंबर, १८८३.

सा. न. वि. वि.—

एकच दिवसाच्या चुकामुकीनें आपल्या दर्शनाचा लाभ घडला नाहीं, याबद्दल मला अत्यंत दुःख होत आहे. आपल्या भेटीविषयीं मलाहि फार उत्कंठा लागली होती; परंतु योगायोग नव्हता, असेंच समजलें पाहिजे. असो.

आपल्या प्रत्यक्ष भेटीची मी कां अपेक्षा करित होतों, याचें कारण आपणहि ताडलेंच असेल. आपल्या पत्रावरून आपल्यास त्या कारणाचा सुगावा लागल्याचें स्पष्ट दिसतच आहे. आपण भेटलां असतां म्हणजे आपल्या गळ्याला मिठी मारून मोकळ्या मनानें मला पुष्कळ रडायाला मिळालें असतें व त्यानंतरी दुःखाचा भार थोडाबहुत हलका होता; परंतु आतां त्याचें काय! तथापि आपल्याशिवाय मन मोकळें करून दुःखाचा आवेग बाहेर घालविण्याला मला दुसरें एकहि स्थळ नसल्यामुळें आज हें पत्र लिहून माझ्याबरोबर आपल्यासहि दुःखी करण्याचें साहस करित आहें.

होय, मी दुसरें लग्न करण्याचें ठरविलें आहे. आपल्यास कां, मलाहि माझ्या या वर्तनाबद्दल आश्चर्य वाटत आहे ! तथापि असें वागण्याचा मजवर प्रसंग येत असल्याबद्दल आपण माझा तिरस्कार करण्याऐवजीं माझी कींवच कराल, अशी माझी खात्री आहे. मीं आजपर्यंत जें दु:ख, त्रास, अवमान सहन केला, त्याची कोणालाच कल्पना नसेल ! तारेच्या सौंदर्याला भुलून मीं खरोखर मोठीच चूक केली, असें वाटून त्याबद्दल मला आतां अत्यंत पश्चात्ताप होत आहे. लग्नाचे वेळीं माझ्या मित्रांनीं आणि मीं केवढीं मनोराज्यें केलीं होतीं ! खरोखर सांगतों, त्या वेळीं मी स्वताला एवढा कांहीं भाग्यवान् समजत होतों कीं, खुद्द माझा मलाच त्याबद्दल हेवा वाटे ! परंतु अल्पावकाशांतच माझीं सर्व सुखस्वप्नें नष्ट होऊन माझ्यासारखा हतभागी प्राणी जगांत कोणीहि नसेल, अशी माझी खात्री होऊन चुकली. तिच्या सुखाकरितां, तिच्या कल्याणाकरितां मी एवढा जीव तोडून झटत असतां तें तिच्या खिसगणतींतहि नाहीं ! उलट सारा दिवस फुरगटलेली ! स्त्रियांच्या सर्व इच्छा, हौसी पूर्ण करावयाला, त्यांचे बंदे गुलाम होऊन त्यांनीं ऊठ ह्मणतांच उठावें आणि बस ह्मणतांच बसावें असें वागावयाला, सारांश, प्रत्येक गोष्टींत स्त्रियांची ताबेदारी करावयासाठींच परमेश्वरानें पुरुषजात निर्माण केली आहे, असाच तिच्या एकंदर वर्तनाचा रोंख दिसत आहे. पतीची आज्ञा, पतीची इच्छा मान्य करणें हें तिला मोठें अपमानकारक वाटतें. तात्पर्य, मला ज्या गोष्टी आवडतात त्या तिला तिरस्कारार्ह वाटतात व तिच्या आवडींविषयीं माझीहि स्थिति तशीच आहे. मिळून आह्मां उभयतांमध्यें समाधान असें कधींच नांदत नाहीं. या संसाराला मी अगदीं कंटाळून गेलों आहें. तारेला शुद्धीवर आणण्यासाठीं मीं माझे होते नव्हते तेवढे सर्व उपाय करून पाहिले, परंतु तिच्या डोक्यांत प्रकाश ह्मणून पडत नाहीं. ज्या त्या गोष्टींत तिला स्वताचें वर्चस्व पाहिजे आहे. तिला शुद्धीवर आणण्यासाठीं मीं तिला लोभलालूच दाखविली, दागिने वस्त्रें वगैरे वस्तूंनीं मोहविण्याचा प्रयत्न केला, शेवटीं कठोर भर्त्सना करून ताडनहि केलें, तथापि तिचा जन्मस्वभाव ह्मणून बदलत नाहीं. या दुष्ट स्त्रीपासून मला सुखप्राप्ति होणार नाहीं, हें मी कळून चुकलों आहें. कारण, ज्या स्त्रीचेठायीं पतीविषयीं यत्किंचितहि आदर नाहीं, ममता नाहीं, प्रेम नाहीं, त्या स्त्रीपासून पतीला सुखप्राप्तीऐवजीं त्रास, कंटाळा आणि दु:ख यांचाच लाभ होणार ! प्रेमाचा विकास आणि लोप क्रमाक्रमानें होत असतो. पहिल्यानें एखाद्याविषयीं आदर वाटला पाहिजे. आदर वाटला कीं उत्कंठा उत्पन्न झालीच. उत्कंठेपासून आकांक्षा, आकांक्षेपासून आसक्ति आणि आसक्तीपासून प्रेम यांचा क्रमाक्रमानें

विकास होत असतो. परंतु याच्या उलट प्रेमाभावामुळें अवहेलना, अवहेलनेपासून अनादर, अनादरापासून तिरस्कार आणि तिरस्कारापासून अवमानजन्य दुःख आणि कंटाळा उत्पन्न होतो व त्या मनुष्याचें मुखावलोकनहि करूं नयेसें वाटतें. माझी स्थितीहि अशीच झाली आहे. मी तारेला अगदीं कंटाळून गेलों आहें. त्या दुष्ट स्त्रीचें दर्शनहि मला असह्य त्रासदायक होऊं लागलें आहे.

माधवराव, मी किती दुःख अनुभवित आहें, याची आपल्याला कल्पनाहि नसेल ! कांहीं दिवसांपूर्वी एका गोष्टीवरून आह्मा उभयतांमध्यें खडाजंगी उडाली होती. त्या वेळीं त्या दुष्ट स्त्रीनेंतर मला साफ सांगितलें कीं 'माझें तुमच्यावर यत्किंचितहि प्रेम नाहीं !' त्या वेळीं मीहि संतप्त होऊन तिला पुष्कळच बोललों व 'ज्यापक्षीं तुझें मजवर प्रेम नाहीं त्यापक्षीं तूं इथून तोंड घेऊन गेल्यानें तुलाहि सुख होईल आणि मलाहि सुख होईल !' असें ह्मणालों. त्याच रात्रीं न सांगतां न विचारतां ती माहेरीं निघून गेली. आणि मीहि पण तिची समजूत घालण्याच्या किंवा तिला परत इकडे बोलावण्याच्या नंतर भानगडींत पडलों नाहीं.

तारेवर मी केवढें प्रेम करित असें, तिच्या सुखाविषयीं किती दक्ष असें— परंतु तें तिच्या ध्यानींमनींहि नाहीं ! तिनें आपला दुष्ट स्वभाव बदलला असता, वर्तन सुधारलें असतें, मला सुख होईल अशा रीतीनें वागली असती, तर आज असा प्रसंग कां येता ! ती माझ्या मर्जीप्रमाणें वागत नाहीं, मजवर प्रेम करित नाहीं, उलट माझा धिक्कार, अवहेलना करिते. मीहि मनुष्य आहें. मलाहि हृदय आहे. तिला याचा योग्य मोबदला देण्याचा मीं निर्धार केला आहे. यांत मजकडून कोणता वरें अपराध घडला ?

सर्वच गोष्टी पत्रांत लिहून कळवितां येत नाहींत. सांप्रत मी अतिशय दुःखी आहें. या दुःखांतून मुक्त होण्याचा उपाय करित आहें. कळावें, लोभ असावा हे विनंति,

आपला त्र्यंबक."

त्र्यंबकरावांचें हें पत्र वाचून मला फार वाईट वाटलें व त्यांच्या स्थितीविषयीं दयाहि उत्पन्न झाली. खचीत येथें कोणच्यातरी हातून गंभीर चूक घडत आहे आणि ह्मणूनच हे सारे क्लेश उत्पन्न होत आहेत याविषयीं आतां मला संशय राहिला नाहीं. त्र्यंबकराव आपल्या हातांनींच आपल्या पायांवर ही कुऱ्हाड मारून घेत आहेत. काय वेडा गृहस्थ आहे पहा ! आपल्या पत्नीविषयीं हा एवढ्या आशा बाळगतो ? निदान या बाबतींत माझेंतरी मत अगदीं भिन्न आहे. मी माझे स्नेही, वर्तमानपत्रें, मासिक पुस्तकें, कादंबऱ्या, पार्ट्या, चिरूट, प्रवासादिकांतच

प्रेमलाभ मिळवित आहे. आमच्या राणीसरकारहि मुलांबाळांची निगा राखणें, घरखटला संभाळणें, विणणेंभरणें— एक मूल होतांच विणण्याभरण्याच्या कामालाहि स्वारींनीं रजा दिली आहे!—इत्यादि व्यवसायांत आनंदांत कालक्रमणा करित आहेत! केव्हांकेव्हां आह्मा उभयतांत थोडेंसें तंटाभांडण, मानअभिमान होतो, नाहीं असें नाहीं—आणि नवराबायकोंत हें असें नेहमीं चालायचेंहि— तथापि आह्मी आपले सदोदित आनंदांत मग्न असतों. आमच्या कुटुंबालाहि कधीं दुःख होत नाहीं! मुलाच्या आजारामध्यें तिचें तोंड किंचित् सुकलेलें दिसतें तेवढेंच कायतें—एरवीं मुद्रा सदा प्रफुल्लित. मग यांचीच अवस्था अशी कां व्हावी! त्र्यंबकरावांच्या त्या पत्राचें मीं ताबडतोब पुढीलप्रमाणें उत्तर लिहिलें:—

सोलापुर, ता. २६ नोव्हेंबर, १८८२.

प्रिय मित्र त्र्यंबकराव,

आपलें पत्र आजच सकाळी मिळालें. वाचून अत्यंत दुःख वाटलें. पतिपत्नींमधील भांडण इतक्या विकोपास जाणें अगर पोंचविणें हें उभयपक्षीं योग्य नव्हे. तुमची एक पत्नी जिवंत असतां तुह्मीं दुसरें लग्न करण्याचा जो विचार चालविला आहे, तोतर फारच चुकीचा आहे, असें मी ह्मणतों. दुसरें लग्न करण्यापूर्वी पुष्कळच विचार करून कायतें ठरवा, असें माझें आपल्यास आग्रहाचें सांगणें आहे.

इंग्रज लोकांत ज्याप्रमाणें 'डायव्होर्स' केल्याविना स्त्रीला अगर पुरुषाला पुनः लग्न करतां येत नाहीं, कोणीं करण्याचें धाडस केलेंच तर तो कायद्यानें अपराध ठरतो, तशा प्रकारचें बंधन आपल्या देशांत नसल्यामुळें अविवेकी पुरुष राजरोसपणें दुसरें लग्न करित असतात; परंतु असें करणें नीतिदृष्ट्या योग्य होईल काय? आपल्यासारख्या समंजस पुरुषांनींहि जर असा अन्याय केला, तर मग काय राहिलें! उद्यां कोणी असेंहि ह्मणे, आणि करूं लागेल कीं, ज्या अपराधाला कायद्यानें शिक्षा होत नाहीं तो अपराध करणें हें दोषास्पद नाहीं! अशानें जग सुरळीतपणें चालेल का? एवढ्यातेवढ्या कारणावरून पहिली पत्नी जिवंत असतां जे तिच्या डोक्यावर दुसरी सवत आणून बसवितात, त्यांनां एखाद्या स्त्रीनें जर असें करण्याचें मनांत आणिलें तर तें सहन होईल काय? ही नुसती कल्पनाहि आपल्या समाजाला अत्यंत भयंकर, दुष्टतेची व अंगावर शहारे आणणारी होईल! परंतु सुज्ञ ह्मणविणारे पुरुष हा भयंकर प्रकार विनदिक्कत करितात आणि आपला समाजहि डोळ्यांवर कातडें ओढून स्वस्थ रहातो व हें समाजाच्या अत्यंत निकृष्ट नीतिमत्तेचें आणि ढळढळीत पक्षपाताचें उदाहरण होय.

त्र्यंबकराव! आपण इतके विवेकांध व्हाल, अशी मीं कल्पनाहि केली नव्हती! तुह्मी लिहितां कीं 'तिला याचा योग्य मोबदला देण्याचा मीं निर्धार केला आहे.' तुह्मी दुसरें लग्न करून का आपल्या पत्नीवर सूड उगविणार आहां? तुह्मीच लिहितां कीं, तुमच्या स्त्रीचें तुमच्चेवर प्रेम नाहीं. ज्या स्त्रीचें नवऱ्यावर प्रेम नाहीं, त्या स्त्रीला तिच्या नवऱ्यानें दुसरें लग्न केल्यानें दुःख होईलसें का तुह्मांला वाटतें? अर्थात् नाहीं. मग तुह्मी स्वतां तुमच्यावरच का सूड उगवून घेणार? खरोखर, तुमचा हा समज अगदींच वेडेपणाचा दिसतो. माझी अद्यापिहि खात्री आहे कीं, तुह्मी अंतःकरणांतून अद्यापिहि तुमच्या पत्नीवर प्रेम करित आहां. सांप्रत त्यावर फक्त अभिमानाचें पटल चढलें आहे. विवेकानें तें दूर साराल तर आंत स्वर्गसुखानंदकारी उज्वल प्रेमप्रतिमा आपल्याला दिसेलच दिसेल! तुमच्या पत्नीच्या वर्तनामध्यें कांहीं अक्षम्य दोष असता, तिच्या हातून अन्यथा आचरण घडलें असतें, तर तिच्याविषयीं तरफदारी करण्यास निदान मीतरी धजलों नसतों. परंतु तसें कांहींएक नाहीं आहे. येऊनजाऊन तुमच्या पत्नीच्या अंगीं जो कांहीं दोष आहे तो अभिमानाचाच होय. परंतु मीतर हा दोष न समजतां उलट एक गुणच समजतों! ज्याच्याठायीं स्वमताची—मग तें मत खरें असो अगर चुकीचें असो—सत्यता पूर्णपणें बाणलेली असते, आपलें ह्मणणें सप्रमाणपणें खोडून टाकण्याला जोंवर दुसरें कोणी समर्थ होत नाहीं, तोंवर ज्यालात्याला स्वमताभिमान हा असावयाचाच! दोन आणि दोन चार होतात अशी एखाद्याची बालंबाल खात्री असतां, ते चार होत नाहींत असें कोणीं आग्रहानें ह्मटल्यास तो त्याचें ऐकेल का? त्याचप्रमाणें दोन आणि तीन सहा होतात असा एखाद्याचा अज्ञानामुळें दृढ विश्वास असल्यास त्याची मूर्खांत गणना करून त्याचा तिरस्कार केल्यानें तो आपलें ह्मणणें सोडील का? त्याची खात्री पटेल अशा रीतीनेंच त्याची समजूत केली पाहिजे. केवळ धाकदपटशा दिल्यानेंच कार्यभाग व्हावयाचा नाहीं. अभिमानाचीहि अशीच गोष्ट आहे. एखाद्याच्या अज्ञानामुळें त्याला सत्य गोष्ट असत्य वाटूं लागली किंवा असत्य सत्य वाटूं लागली, तर त्याचा तिरस्कार करण्यापेक्षां त्याचें अज्ञान दूर करण्याचाच प्रयत्न केला पाहिजे. आज त्याच्या अज्ञानजन्य अभिमानामुळें आपल्याला जो त्रास सहन करावा लागत असेल तेवढाच किंबहुना त्याहूनहि अधिक आनंद त्याच्या ठायीं सत्यमार्गाचा अभिमान उत्पन्न केल्यानें अनुभवितां येईल. शिवाय मी असें विचारतों कीं, पुरुषांनींतरी स्त्रियांस ऊठ ह्मणतांच उठण्यास आणि बस ह्मणतांच बसण्यास लावण्याची इच्छा कां धरावी! जें कोणी चुकत असेल त्याची प्रेमानें समजूत घाला, त्याची समजूत पटली कीं तें सत्यमार्गाचें अवलंबन केल्याविना रहाणार नाहीं. एखाद्याच्या

अभिमानाची निंदा गाण्यापेक्षां आपल्याला त्याचें समाधान करण्याचें सामर्थ्य नाहीं असें कां समजूं नये ! तुमच्या पत्नीच्याच अंगीं खोटा अभिमान आहे आणि तुह्मांला त्या अभिमानानें सोडिलें आहे, असें निदान माझ्यानेंतरी ह्मणवणार नाहीं ! नव्हे— तुह्मीच अभिमानानें अधिक अंध झालां आहां, विवेकशून्य झालां आहां, असें मी ह्मणेन. त्र्यंबकराव! तुमच्या पत्नीच्या हातून गैरसमजानें किंवा अप्रबुद्धपणामुळें अपराध घडला तर तिला शुद्धीवर आणण्यासाठीं तुह्मी प्रयत्न करणार नाहीं, तर कोण करील ? बोलून चालून स्त्रियांची जात— त्यांची अक्कल ती केवढी असणार !

खचीत कुठेंतरी गैरसमज झालेला आहे. हा दूर करण्याचा प्रयत्न करा. क्षणिक क्रोधाच्या वश होऊन संपूर्ण आयुष्य दुःखांत घालविण्याची चूक करूं नका. आणि मी तुह्मांला असेंहि विचारितों कीं, एका स्त्रीपासून ज्याला सुखप्राप्ति झाली नाहीं ती त्याला दुसऱ्या स्त्रीपासून होईलच, हेंतरी कशावरून? दुसरी पत्नी करतांच तुह्मी सुखगिरीच्या उच्च शिखरावर जाऊन बसाल, अशी तुह्मी खात्री घाल काय ? आपल्यासारख्या सुशिक्षित मनुष्याच्या डोक्यांत असे घाणेरडे विचार यावे, याबद्दल मला फारफार वाईट वाटतें ! कोणतीहि गोष्ट करण्यापूर्वीं नीट विचार करा. फुंकून खा. ऊन आहे तोंच घाईनें खाल तर गळा भाजेल ! कळावें, पत्राचें उत्तर जरूर यावें, हे विनंति,

आपला माधव. ”

त्र्यंबकरावांनां वरील पत्र पाठवून त्याच दिवशीं माझ्या पत्नीकडून ताराबाईनांहि मीं एक पत्र पाठविलें. त्या पत्रांत ताराबाईनां आपल्या नवऱ्याची क्षमा मागून नवऱ्याच्या घरीं जाण्याविषयीं लिहविलें होतें व दुसराहि बराच उपदेश करविला होता. ताराबाईकडून आठ दिवसांनीं त्या पत्राचें पुढील उत्तर आलें:—

मुक्काम मुंबई, ता. ३ दिसेंबर, १८८३.

वज्रचूडेमंडित अखंडसौभाग्यवती प्रियभगिनी रमाबाई नगरकर,
मु० सोलापुर यांस, नमस्कार वि. वि.—

आपलें सोलापुरहून आलेलें पत्र मिळालें. फार दिवसांनीं आपल्याकडून आलेलें पत्र वाचून मनाला जो आनंद झाला आणि जें समाधान वाटलें, तें पत्रांत लिहून कळवितां येत नाहीं. मजकडून आपल्याला मुळींहि पत्र नाहीं, मी आपल्याला विसरलें कीं काय, ह्मणून विचारतां. रमाबाई, माझी स्थिति आपण पूर्णपणें जाणत

असून असें कां बरें हिणवितां? पत्र लिहिण्याजोगी माझ्या मनाला स्वस्थता असती, तर 'माझ्याकडून पत्र आल्यावरच नंतर मला पत्र पाठविण्याचा तुमचा विचार आहे कीं काय नकळे!' असें मला जें तुह्मीं टोंचून लिहिलें आहे, तसें लिहिण्याचा तुह्मांला प्रसंगच येऊं दिला नसता. परंतु काय करूं! जिवाला चैन ह्मणून मुळींच नाहीं, आणि ह्मणूनच कुणाला पत्र वगैरे लिहिणेंसुद्धां मजकडून घडत नाहीं. मी आपल्याला कशी विसरेन? एवढी माझी आठवण अद्यापि नाहींशी झालेली नाहीं. तथापि माझी स्थिति एखाद्या भ्रमिष्ट माणसासारखी झाली आहे, हें मात्र खोटें नाहीं!

मी आज इतके दिवस जें दुःख, जे शारीरिक मानसिक क्लेश सहन करित आहें, ते एका नारायणालाच ठाऊक! ईश्वरानें अशा यातना कुणालाहि देऊं नयेत. रात्रंदिवस माझ्या अंतराला जे विंचू डसत आहेत व त्यामुळें ज्या असह्य वेदना मी अनुभवित आहें, तें माझें दुःख मला कधींहि व्यक्त करतां यावयाचें नाहीं. पतीच्या प्रेमाला जी स्त्री अंतरली, तिचें जिणें कसलें! जिवंत असूनहि ती मेल्यासारखीच आहे! मीं पूर्व जन्मीं काय पाप केलें होतें नकळे, कीं या जन्मीं त्याचें फळ भोगित आहें. रमाबाई, आपल्यालासुद्धां माझी कर्मकथा सांगण्यास मला धैर्य होत नाहीं. तथापि माधवराव भावोजींच्याहि कानांवर ही गोष्ट गेली आहे व तुह्मीं उभयतां मिळून मला तिकडच्या मर्जीप्रमाणें वागण्याविषयीं कळवळ्यानें उपदेश केला आहे ह्मणूनच आज येथें मोकळेपणें दोन शब्द लिहितें.

तिकडचा स्वभाव आपल्यालाहि माहीतच आहे. सारा दिवस वाचनांत, विचारांत आणि चिंतनांत गढलेले असावयाचे. मुद्रेवर कधीं उल्हास ह्मणून आढळावयाचा नाहीं. मी कधीं जवळ गेलें व लडिवाळपणें कांहीं बोलण्यास आरंभ केला, कीं खरकन् अंगावर यायचें व नानाप्रकारचीं अपमानकारक आणि कुजकट बोलणीं बोलून मला रडावयास लावायाचें. 'तुझे हे पोरासारखेच चाळे! आपल्याला ते मुळींच आवडत नाहींत—तुझ्यांत प्रौढपणाच नाहीं—तूं सदा आपल्या शृंगारभूषणांतच गढलेली असतेस—तूं मूर्खच आहेस—भलभलतेच हट्ट करितेस—तूं गर्विष्ठ आहेस—अभिमानी आहेस— दुष्ट आहेस— तुला अक्कलच नाहीं!' इत्यादि आणि याहूनहि वाईटवाईट शब्द—ज्याचा उच्चारहि करवत नाहीं —मला बोलून जवळ उभेंहि राहूं द्यावयाचें नाहीं!

मी पोर असेन, पोरपणाचे चाळे करित असेन, माझ्यांत प्रौढपणा नसेल व अज्ञानामुळें माझ्या हातून भलतेंच वर्तन घडतहि असेल. परंतु माणूस आईच्या पोटांतूनच नाहींना सगळें शिकून येत? माझ्या अंगीं खरोखरच जर कित्येक दोष असतील—नाहीं असें मी ह्मणत नाहीं—तर ते दूर करण्याचा प्रयत्न करायचा, कीं मला त्याबद्दल पदोपदीं छळून

आणि मर्मभेदी भाषणें करून माझें मस्तक फिरवायचें ? पतीच्या मनाप्रमाणें वागून पतीला प्रिय व्हावें, असें कोणत्या स्त्रीला वाटणार नाहीं? जगांत अशी दुष्ट स्त्री एकतरी असेल का? मी त्यांच्या मर्जीप्रमाणें वागण्याचा यत्न करित नव्हतें का ? पण मला जवळच येऊं देत नसत. माणसानें उगीच एखाद्याचा असा छळ केला ह्मणजे त्याचें मस्तक ठिकाणावर कसें बरें राहील? आणि त्यांत माझा स्वभावतर फारच मानी आहे. मी कुणाकडून कधीं फट्हि ह्मणून घ्यावयाची नाहीं. ते ज्याप्रमाणें मला टाकून बोलत त्याप्रमाणें मीहि कधींकधीं त्यांनां तसेंच लावून बोलें; स्त्रीनें पतीला असें बोलूं नये हें खरें, परंतु देहभान न राहून संतापाच्या भरांत मजकडूनहि त्यांचा बरेच वेळ अपमान झाला आहे.

मी बरेच दिवस माहेरीं येऊन राहिलें आहें, घरीं जात नाहीं, तरुण स्त्रियांनां हें शोभत नाहीं, असें आपण लिहितां. या गोष्टी मला कळत नाहींत असें नाहीं. इकडे अशा विरहामध्यें दिवस कंठणें मला किती दुःसह होत आहे हें माझें मीच जाणें. परंतु मी इकडे कां राहिलें आहें, हें पुढील गोष्टीवरून आपल्यांला कळून येईल. माझी आई अत्यावस्थ असल्याचें मुंबईहून मला पत्र आलें होतें. तिनें मला ताबडतोब निघून येण्याविषयीं लिहिलें होतें. आईच्या दुखण्याच्या चिंतेनें सारा दिवस माझें मन अस्थिर झालेलें होतें. संध्याकाळीं घरीं येतांच मीं त्यांनां ही हकीगत कळवून रात्रीं मुंबईस जाण्याविषयीं परवानगी मागावयास ह्मणून गेलें. माझी ती दुःखी मुद्रा पहातांच त्याचें खरें कारण काय असावें याची चौकशी किंवा विचार कांहींहि न करितां एकदम ‘तूं इथून चालती हो. तुझें हें दुर्मुखलेलें तोंड मी पाहूं इच्छित नाहीं !’ असें मला टोंचून बोलायचें झालें. आधींच मी दुःखानें पोळलें होतें. त्यांत विनाअपराध असा अपमान मला सहन झाला नाहीं व माझें मस्तक फिरून मी त्यांचा तेथल्या तेथें सर्वांसमक्ष अपमान केला. तेव्हांतर तेहि फार चिडले व ‘तूं उद्यां माहेरीं चालती हो ! तुझें याउपर तोंडहि पाहूं इच्छित नाहीं’ असें मला ह्मणाले. उद्यां कशाला, आतांच चाललें, असें ह्मणून मींहि एक तांगा बोलावून त्याच रात्रीं इकडे निघून आलें. येतांना त्यांनीं माझा जो पाणउतारा केला व जे जे शब्द बोलले त्यांचा मला मरेपर्यंत विसर पडायाचा नाहीं. ‘ तुझें मजवर मुळींच प्रेम नाहीं, यासाठीं तूं माझ्या डोळ्यांसमोर नसलेलीच बरी. ह्मणजे तुलाहि सुख होईल आणि मलाहि सुख होईल !’ मला इकडे आल्याला आज सहा महिन्यांवर दिवस होत आले, परंतु कधीं एक दिवस पत्र किंवा खबर कळविली विचारली आहे का ? एवढा मजवर राग करायचा ?

पतीचा राग, पतीनें केलेला तिरस्कार, नव्हे पतीच्या हातचा मारहि स्त्री सहन करील—परंतु पतीचें प्रेमरहित वर्तन स्त्रीला क्षणभरहि सहन होणार नाहीं. त्यांनींतर मजवर शस्त्र धरलें आहे. त्यांनीं माझें नांवच सोडिलें आहे. परंतु माझ्यानें कांहीं आतां धीर धरवत नाहीं. माझ्या अविचारी वर्तनाबद्दल माफी मागून मला नेण्याविषयीं मीं आजच्च त्यांनां एक पत्र पाठविलें आहे. भावोजींकडूनहि त्यांनां एक समजुतीचें पत्र लिहवून पाठवाल अशी आशा करितें. नवराबायकोंतील कलह नाहींसा करून बिघडलेली घडी नीट बसविण्याचें पुण्य लहानसहान नाहीं, हें आपल्याला सुचविलें पाहिजे असें नाहीं.

मुलांलेंकरांची खुशाली कळवावी. वरचेवर पत्र पाठवून या हतभागिनीचा समाचार घेत जावा. ही विनंति,

आपली नम्र भगिनी,

ताराबाई देशमुख."

त्र्यंबकरावांच्या पत्नीचें हें पत्र पाहूनतर माझी खात्री झाली कीं, उभयतांनांहि अभिमानराहूनें पूर्ण ग्रासिलें आहे. या अभिमानाच्या पायींच एवढा अनर्थ ओढवला आहे. तथापि किती झालेंतरी स्त्री ती स्त्री, आणि पुरुष तो पुरुष! स्त्री आपली नैसर्गिक कोमलता, मधुरता, नम्रता टाकूं शकणार नाहीं. पुरुषासारखें कठोरपण स्त्रीकडून कदापिहि व्हावयाचें नाहीं. जर तसें घडतें, तर हा संसार स्मशानवत् बनला असता! पृथ्वी मानवीप्राण्याच्या वस्तीसहि अयोग्य झाली असती!

कांहीं दिवसांनीं त्र्यंबकरावांकडून माझ्या पत्राचें उत्तर आलें. तें येणेंप्रमाणें:—

"पुणें, ८ दिसेंबर, १८८३.

सा. न. वि. वि.—

आपलें पत्र मिळालें. या संपूर्ण जगतामध्यें मी दुसरें कांहींएक मिळविण्यास समर्थ झालों नसलों, तरी आपल्यासारखा एक खरा मित्र प्राप्त करून घेतला आहे, ही कांहीं थोड्या भाग्याची गोष्ट नव्हे! परंतु दिलगीर आहें, आपल्या उपदेशाप्रमाणें वागण्याची स्थिति उरली नाहीं. आपल्याला मित्र शोभण्याजोगी योग्यताहि माझ्या ठायीं सांप्रत राहिली नाहीं.

पूर्व जन्मीं मीं असें कोणतें अघोर पातक केलें होतें नकळे, कीं या जन्मीं पत्नीरूपानें त्याचें प्रायश्चित्त भोगित आहें. त्या दुष्टेनें माझें जीवन मृतवत् केलें आहे; माझ्या संपूर्ण आशा, उमेदी, मनोराज्यें धुळीस मिळविलीं आहेत. उत्साह, शांति, सुख समाधानाची राखरांगोळी केली आहे. आपल्या हातून कांहींतरी देशकार्य घडून जन्माची

सफलता करावी, अशी माझी केवढी इच्छा होती! परंतु त्या सर्वांवर पाणी पडलें आहे. माझ्या हातून कांहीं झालें नाहीं आणि आतां पुढें होण्याची आशाहि उरली नाहीं!

मीं दुसरें लग्न करण्याचा विचार आतां सोडून दिला आहे. आपलें ह्मणणें अगदीं खरें आहे, असें मलाहि वाटूं लागलें आहे. एका स्त्रीपासून जर सुखप्राप्ति झाली नाहीं, तर दुसरी स्त्री केल्यानें ती होईल, असा भरंवसा धरणें चुकीचें आहे. पहिल्याप्रमाणेंच तिच्याकडूनहि दुःख प्राप्त झाल्यास मग त्या फजितीस पारावार रहाणार नाहीं, हें अक्षरशः खरें आहे. पुनर्लग्नाच्या मूर्ख विचारास माझ्या मस्तकांतून हुसकावून लावून मीं आतां निराळाच विचार योजिला आहे. लवकरच मी देशांतराला जाणार आहें. उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत आणि पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत सर्व दिशा, देश, प्रांत भ्रमण करण्याचें मीं ठरविलें आहे. त्यायोगेंतरी माझ्या उत्तप्त हृदयाला स्थैर्य येतें कीं काय त्याचा अनुभव पहाणें आहे. कुठें जाईन तें अद्यापि नक्की केलें नाहीं; पुनः केव्हां परत येईन तेंहि आज सांगवत नाहीं; त्याचप्रमाणें पुनः परत येईनच कीं नाहीं, तेंहि पण निश्चित नाहीं! भगवंताची जशी मर्जी असेल तसें घडेल. ज्याला घरामध्यें केवळ दुःख दुःख आणि दुःख आहे त्याला कशाचें आकर्षण असावयाचें? पुनः घरीं, स्वदेशीं येण्याची त्याला वासनातरी कां ह्मणून होईल!

नुकतेंच तारेकडूनहि मला एक पत्र आलें आहे. ती मुंबईस गेल्यापासून तिचें हें पहिलेंच पत्र होय! तिनें पत्रांत लिहिलें आहे कीं 'आपल्याकडून आजवर जो अपराध झाला त्याची क्षमा करावी. आपल्याला माहेरीं मुळींच चैन पडत नाहीं. आपल्याला पुण्याला घेऊन जावें!' असें पत्र तिनें कां लिहिलें कळत नाहीं. हे तिच्या अंतःकरणापासून निघालेले उद्गार खास नव्हत. तिला माहेरीं भाऊभावजयांकडून जाच होत असेल, तेव्हांच ती इकडे येऊं पहात असावी. परंतु जी स्त्री मला विचारल्यासवरल्यावांचून आणि सर्वांदेखत माझ्याशीं उद्धट वर्तन करून निघून गेली आहे, तिला मी होऊन बोलावणें पाठवीन इतका निर्लज्ज स्वभाव अद्यापि माझा झालेला नाहीं. मीं तिला स्पष्ट लिहिलें आहे कीं 'तुझें मुखावलोकन करण्यासहि मी इच्छित नाहीं. तुझें भरणपोषण करणें हें माझें कर्तव्य आहे आणि त्याप्रमाणें तुला दरमहा पोटगीची रकम मिळण्याची व्यवस्था करून मी चुकलों आहें. मी तुला बोलावणें पाठविणार नाहीं आणि तूं होऊन इकडे आलीस तरी मी तुला भेटणारहि नाहीं!' ज्या स्त्रीचे ठिकाणीं पतीविषयीं प्रेम नाहीं, अवहेलनाबुद्धि आहे तिच्या समागमानें पतीला कोणत्या सुखाची प्राप्ति होणार आहे! असें दाम्पत्य परस्परांपासून दूर राहील तरच त्यांत उभयपक्षीं सुख आहे.

कळावें, जास्त लिहिण्याजोगी मनाला स्वस्थता नाहीं. दैवांत असलें तर पुनः दर्शन होईलच. सध्या हाच निरोप घेतों. हे विनंति,

आपला दुर्दैवी त्र्यंबक. ”

त्र्यंबकरावांचें हें पत्र वाचून माझी अटकळ शेवटीं खरी ठरल्याचें मला दिसून आलें. त्यांनीं क्षणिक उत्तेजनामुळेंच दुसरें लग्न करण्याचा विचार केला होता; माझ्या पत्रानें त्यांचा तो विचार रहित झाला. जो दूरवर दृष्टी ठेवून आणि मागचा पुढचा विचार करून एखादी गोष्ट करण्याचें ठरवितो, त्याच्या हातून तो विचार असा एकाएकीं रहित होणें असंभवनीय आहे. त्र्यंबकराव क्षणिक मनोविकारांना वश होणारे, अस्थिर मनाचे गृहस्थ होते; आणि देशांतर करण्याचा त्यांचा विचारहि त्याच अस्थिरवृत्तीचें फल होय. हा त्यांचा निश्चय ढळविण्यास ह्मणजे मोठेसे आयास लागतील असें मुळींच नाहीं, असें मला वाटलें. परंतु त्यांनीं आपल्या पत्नीला जें उत्तर पाठविलें होतें त्याचें मला अत्यंत वाईट वाटलें. त्र्यंबकरावांच्या अंगीं जो दोष होता तोच ताराबाईंच्याहि ठिकाणीं होता. नवरा आपल्यावर रागावला आहे अशा वेळीं त्याच्या तोंडाला तोंड देऊन त्याला अधिक चिडविण्या-पेक्षां तो शांत झाल्यावर प्रेमानें त्याचें समाधान करण्याचा प्रयत्न तिनें केला असता, आपली चूक झाली कीं नवऱ्याची होत आहे ह्याचा उभयतांनीं मिळून शांतपणें विचार केला असता, अभिमानास दूर झुगारून दोघांपैकीं एकानें नम्र-वृत्तीचा अंगिकार केला असता, तर उभयतांमध्यें एवढें भयंकर वितुष्ट कां उद्भवतें! परंतु दोघेंहि क्षणिक मनोवृत्तींच्या आधीन होऊन विवेकशून्य बनून आपापल्या सुखाची राखरांगोळी करून घेत होतीं. उभयतांचेंहि परस्परांवर अकृत्रिम प्रेम असे, परंतु मध्यें अभिमानाचें पटल आड येऊन तीं एकमेकांस वैऱ्याप्रमाणें भासत होतीं. असा प्रकार असल्यामुळें त्र्यंबकरावांच्या या पत्राचा ताराबाईंच्या मनावर भयंकर परिणाम होऊन त्या कांहीं भलतेंसलतें करण्यासहि मागेंपुढें पहाणार नाहींत, अशी मला भीति वाटली. ताराबाईंची समजूत करण्यासाठीं मीं त्याच दिवशीं माझ्या कुटुंबाला मुंबईस रवाना केलें व कामाची व्यवस्था लावून एकदोन दिवसांनीं मीं स्वतः पुण्याला जाऊन त्र्यंबकरावांना समक्ष भेटण्याचें ठरविलें.

परंतु भवितव्य कोणालाहि चुकवितां येणार नाहीं! माझी पत्नी मुंबईस जाऊन पोंचण्याचे पूर्वीं एकच दिवस व्हावयाची गोष्ट होऊन गेली होती! 'मी उद्यां पुणें येथें येत आहें' अशी त्र्यंबकरावांना तार पाठविल्यावर मला एकाएकीं कांहीं

महत्लाच्या कामामुळें मद्रास येथें जावें लागलें. तिकडून १५ दिवसांनीं परत येतों तों त्र्यंबकरावांचें पुढील पत्र दोन दिवसांपूर्वी येऊन टेबलावर पडलें होतें:—

बनारस, ता. ३० दिसेंबर १८८३.

प्रिय माधवराव,

सर्व कारभार आटोपला ! तारेनें माझें पत्र पाहून आत्महत्या केली ! तुह्मीं जें लिहिलें होतें, तेंच अखेर खरें ठरलें. आतां मला माझी चुकी समजली. मीं मोठीच चुकी केली होती, परंतु आतां काय ? या जन्मांत कांहीं ती भरून यावयाची नाहीं. त्या पापाचें क्षालन करण्यास मला अनेक जन्म घ्यावे लागतील.

खरोखर तारेचें हृदय प्रेमरसानें भरलेलें होतें ! अभिमानानें, ईर्षेनें, अविवेकानें अंध झालेल्या मला चांडाळाला तिचें प्रेममय अंतःकरण पहातां आलें नाहीं. ज्या स्त्रीचें पतीवर प्रेम नसेल ती स्त्री पतीच्या यःकश्चित् तिरस्कारामुळें प्राणत्याग का करील ? खचीत खचीत, मीं महान अपराध केला आहे—एका निरपराध पतिव्रता स्त्रीच्या हत्येचें महापातक मीं आपल्या हातानें मस्तकावर घेतलें आहे. तेव्हांच जर मीं शांत चित्तानें विचार केला असता, विवेकशून्य बनून एखाद्या नरपशूप्रमाणें न वागतां प्रेमानें वागलों असतों, तर आजचा अनर्थ ओढवता काय ? परंतु—

तारेनें मरणापूर्वी एक पत्र लिहून मला पाठविलें आहे. हाय! त्यांतील अक्षरान् अक्षर माझ्या सर्वांगास शल्याप्रमाणें बोंचत आहे. अशा भयंकर वेदना मीं आजवर केव्हांहि अनुभविल्या नव्हत्या ! ती लिहिते:—"आपण मला चरणांशीं स्थान दिलें नाहीं, माझ्या अपराधांची क्षमा मागण्यास अवसरच दिला नाहीं, तेव्हां आतां हा पापी देह धारण करण्यांत काय अर्थ आहे ! मी महान् अपराधी आहें. माझ्याकडून आपले असंख्य अपराध घडले आहेत. तथापि आपण माझे पति आहां, माझे गुरु, माझा देव आपणच आहां. आपल्याला जर या अभागिनीची करुणा येत नाहीं, आपण या पापिणीला क्षमा करित नाहीं तर आतां मला जगांत तोंड दाखवायला कुठें स्थळ उरलें आहे ? जी हतभगिनी आजन्मांत कधीं पतिप्रेमाला पात्र झाली नाहीं, ज्या दुष्टेनें सदैव आपल्या परमपूज्य पतिदेवतेला छळण्यांतच भूषण मानिलें, ती स्त्री जगांत रहाण्याला मुळींच पात्र नाहीं. तिनें मरणें हेंच श्रेयस्कर ! प्राणनाथ ! माझ्या दुष्ट आचरणामुळें आपल्याला जे असह्य कष्ट होत असत आणि त्या वेळीं आपलें सुंदर मुख जें कोमेजून जाई, तें पाहून मला केवढ्या वेदना होत ह्मणून सांगूं ? एकांतांत जाऊन मी त्याबद्दल रडत बसें. तथापि पुनरपि आपल्याला कष्ट देण्यास ही पापिणी चुकत नसे. त्या वेळीं माझें

मस्तकच ठिकाणावर रहात नसे. हा दोष दुसऱ्या कुणाचाहि नाहीं, माझ्या अदृष्टाचाच हा दोष होय. अरेरे! मी केवढी अघोर पातकी, कीं मला मरतेवेळींसुद्धां पतिचरणांचें दर्शन घडलें नाहीं! पतीचें सुंदर मुख एकाग्रदृष्टीनें अवलोकित मला मृत्यु येता— आपली क्षमा मागून मीं देहाचा त्याग केला असता— हाय! तें भाग्यहि या कपाळ-करंटेच्या दैवीं बिधीनें लिहिलें नव्हतें. माझ्या पापाचें प्रायश्चित्त मी परलोकीं भोगून परमेश्वराची अनन्य भावें प्रार्थना करीन कीं, प्रभो! दुसऱ्या जन्मीं मला ह्याच पायांचा लाभ दे. आणि या जन्मीं न घडलेली पतिसेवा दुसऱ्या जन्मींतरी मजकडून सांग घडूं दे. प्राणनाथ! आपणहि मला असा आशीर्वाद द्यावा आणि माझे सर्व अपराध पोटांत घालावे."

माधवराव! मींच माझ्या पत्नीच्या मृत्यूला कारण आहें. ती बिचारी साध्वी होती. मी पातकी, अधम, चांडाळ आहें. मी आत्महत्या करणार नाहीं! जिवंत राहून माझ्या अघोर पातकाचें उग्र शासन भोगित राहीन. रौरव नरकहि माझ्या पापाला योग्य प्रायश्चित्त नव्हे! आपण माझ्यासाठीं एकहि अश्रु गाळूं नये. त्या दयेला हा अधम मुळींच पात्र नाहीं. या जगांत आतां हीच अखेरची भेट!

आपला हतभागी त्र्यंबक."

* * * * * *

गेल्या कार्तिकी एकादशीच्या यात्रेनिमित्त मी गाणगापुरास गेलों होतों. तेथें रात्रीच्या वेळीं धर्मशाळेंत पडलेल्या एका संन्याशाला पहातांच मी एकदम दचकलों. संन्यासाची मुद्रा करपून गेलेली होती. डोळे खोल गेले होते. मुखावर पूर्ण पश्चात्ताप दिसत होता. बराच वेळपावेतों मी त्याच्याकडे एकाग्रदृष्टीनें पहात राहिलों. माझी ती कावरीबावरी मुद्रा पाहून संन्यासी ह्मणाला " माधवराव, मीच तो हतभागी प्राणी! आज सतत वीस वर्षे देहाला कष्टवून तीर्थयात्रा करित हिंडत आहें, परंतु अंतःकरणाची तळमळ कांहीं केल्या शांत ह्मणून होत नाहीं! मला माझ्या पातकाचें प्रायश्चित्त भोगूंद्या—तुह्मी कशाला माझ्यासाठीं कष्टी होतां!" बोलतांबोलतां संन्याशाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

दुसरे दिवशीं सकाळीं उठून पहातों तों संन्याशाचा पत्ता नाहीं. मीहि व्यथितांःतकरणानें दुसरीकडे निघून गेलों.

# गोष्ट ७ वी.

## "—पण,

अक्षरें दोनच—पण, त्यांचा प्रताप केवढा विलक्षण!

एक गृहस्थ आहेत. दैवाच्या कृपेनें ह्मणा—आह्मींतर दुर्दैवाच्याच कृपेनें समजतों —वाडवडिलांनीं कमावून ठेविलेल्या बऱ्याचशा संपत्तीचे ते मालक आहेत. "कांहीं उद्योगधंदा करून वडिलार्जित संपत्तीची वृद्धी आणि त्या बरोबरच चार अन्नार्थी लोकांना व्यवसाय लाविल्याचें श्रेय कां घेत नाहीं?" असा त्यांनां कोणीं प्रश्न केला असतां ते या पण शब्दपुराणाचें जें कथन करतात, तें ऐकून ऐकणारे निरुत्तरच होतात! "—पण, सुखांतला जीव दुःखांत कोण घालून घेतो?—पण, नोकरलोक हरामखोर निघून त्यांनीं कपाळावर हात फिरविले तर? —पण, व्यापारांत नुकसान होऊन आहे तेंहि गेलें तर?—पण, आमच्या वाडवडिलांनीं कुठें उद्योगधंदा केला होता?" वगैरे वगैरे. स्वारी व्यसनें, जुगारादि पापकर्मांत आपल्या आयुष्याची आणि बरोबरच वडिलार्जित संपत्तीची माती करित राहिली आहे.

दुसरे एक गृहस्थ आहेत. या स्वारीचें डोकें मोठें कल्पक असून त्यांनीं कित्येक आश्चर्यकारक कल्पना बसविल्या आहेत. घरची स्थितीहि साधारण बरी आहे. आमची पक्की खात्री आहे कीं, तनुमनधनें करून जर ते याच विषयाच्या मागें लागतील, तर त्यांच्या कल्पक डोक्याचा समाजाला पुष्कळ फायदा होऊन त्यांचेंहि कल्याण झाल्याविना रहाणार नाहीं. परंतु ते या—पणरूपी राक्षसाच्या तावडींत सांपडून कोटांतील एका युरोपियन व्यापारी कंपनींत ३० रुपड्यांवर हमाली करित राहिले आहेत. "—पण, घातलेले पैसे व्यर्थ गेले तर!—पण, लोकांनीं या कल्पनेचें चीज केलें नाहीं तर!—पण, आह्मां नेटिवांच्या हातून काय दिग्विजय लागायाचा आहे!" वगैरे वगैरे.

हे—पण,—पण,—पण, राक्षस आपली अक्राळविक्राळ मुद्रा धारण करून ज्याप्रमाणें या गृहस्थाला भेवडावित असतात आणि त्याला जगांत पुढेंच येऊं देत नाहींत, त्याचप्रमाणें कोलंबसानेंहि या—पण राक्षसांच्या बागुलबुवास भिऊन पळ काढला असता, तर अमेरिका खंड शोधून काढल्याबद्दलची जगांत आज त्याची कीर्ति झाली असती काय? कोलंबसाच्या वेळीं हा—पण शब्द प्रचारांत नव्हता, अथवा आजच्याप्रमाणें—पण शब्दाच्या पुजारी मित्रांचा त्याला

अभाव होता, अशांतला प्रकार मुळींच नाहीं. कोलंबसाच्या कित्येक दीर्घ शहाण्या मित्रांनीं आणि हितचिंतक ह्मणविणारांनीं या पण शब्दपुराणांतील एकेक अनुभविक कथा त्याला . ऐकविली होती. "तूं जाणार ह्मणतोस खरा–पण, ती भूमी नाहींच सांपडली तर!—पण, समुद्रांत तुफान नड्रन तुमचें जहाजच बुडालें तर! —पण, वाट चुकून तुह्मी भलतीचेसलतींकडेच गेलां तर!—पण, असुक झालें तर!—पण, तमुक झालें तर!—" वगैरे वगैरे चर्पटपंजरी सुरू केली होती. पण, साहसी कोलंबसानें पण शब्दावरोवरच या दीड शहाण्यांनांहि थाब्यावर बसवून "काय होईल तें होओ— पण, इच्छिलेलें कार्य शेवटास नेईनच नेईन," असा निश्चय केला आणि शेवटीं तो त्यांत यशस्वी झाला.

राणी इलिझाबेथच्या वेळचा प्रख्यात मुत्सद्दी सर वाल्टर रॅले, हाहि एकदा या पण राक्षसाच्या सपाट्यांत सांपडला होता; पण, त्या चाणाक्ष राणीनें थोडक्यांत त्याला बचाविला. सर वाल्टर रॅले याच्या अंगीं प्रख्यात मुत्सद्याला लागणारे इतर सर्व गुण होते पण, तो किंचित् भित्रा होता. एकदा राजवाड्यांतील खिडकीच्या काचेच्या एका तावदानावर त्यानें पुढील लेख लिहिला. "कीर्तिगिरीच्या उच्च—शिखरावर आरूढ होण्याची मला अत्यंत लालसा आहे, आणि मी तसे प्रयत्नहि चालवित आहें—पण, एखादे वेळीं तेथून गडगडून खालीं पडेन कीं काय, अशी मला भीति वाटते." राणीच्या दृष्टीस तो लेख पडतांच तिनें त्याच्या खालींच पुढील लेख लिहिला "—तुझें मन जर शंकित असेल, कीर्तिगिरीवर चढण्यास जर तूं भीत असशील, तर तूं त्याच्यावर चढण्याचा मुळींच प्रयत्न करूं नकोस!"

पुण्यश्लोक श्रीशिवाजी राजा "—पण, बलिष्ठ मुसलमानांपुढें आपलें काय चालणार?—पण, आणीबाणीच्या प्रसंगीं हातावर शिर घेऊन आपल्या साह्यास कोण येईल?—पण, असुक झालें तर!—पण, तमुक होईल तर!" असे कुतर्क लढवित राहिला असता, तर अर्वाचीन इतिहासांत हिंदुपदपाच्छाईचें नांवतरी ऐकूं आलें असतें काय? कोल्हापुर, बडोदें, इंदुर, ग्वाल्हेर, सांगली, मिरज वगैरे वगैरे हिंदुराजांचीं—केवळ नांवाचींच कां होईनात—राज्यें, आणि राजवैभवाचीं अल्पस्वल्प चिन्हें जीं आपल्यास अद्यापिहि पहावयास मिळत आहेत, तीं दिसलीं असतीं काय? या पण राक्षसास भिऊन जाते तर नानासाहेबांचें बंड, झांशीच्या राणीचे पराक्रम, फार लांब कशाला परवांचें बोअर लोकांचें युद्ध वगैरे गोष्टी ऐकूं आल्या असत्या काय?

हा पण शब्द माहीत नसता तर संपूर्ण महाराष्ट्रास चिंतातुर करणारें कोल्हापुरचें 'वेदोक्तपुराणोक्त प्रकरण' आज उपस्थित झालें असतें काय? अभिमानाला पेटून नखानें तुटणाऱ्या गोष्टीला कुऱ्हाडीचा प्रयोग जो कोल्हापुरचे शाहु छत्रपति सध्या करित आहेत, आणि त्याचप्रमाणें, पोलीस, पोस्ट, कस्टम वगैरे वगैरे सरकारी आफिसांत शिपायांचीं, पटेवाल्यांचींसुद्धां कामें करणारे, त्याचप्रमाणें शिंप्याचीं, लोहाराचीं, सोनारसुताराचीं कामें करणारे आपल्या पायाखालीं काय जळत आहे तें न पहातां स्वतास ब्राह्मण ह्मणवून 'हिंदुस्थानांत आज क्षत्रियच उरले नाहींत!' असें दिमाखानें ह्मणत आहेत व काळ, वेळ, परिस्थिति वगैरे गोष्टींकडे दुर्लक्ष्य करून आपल्या वेळाचा, कर्तृत्वशक्तीचा दुरुपयोग करित राहिले आहेत, तें दृष्टोत्पत्तीस आलें असतें काय?

पण या दोन अक्षरी शब्दाच्या अंगीं महत्वाकांक्षा, पुरुषार्थ, लौकिक वगैरे गुणांचीच राखरांगोळी करण्याचा प्रताप नसून त्याच्या ठायीं आणखीहि तसेच अनेक अनर्थावह प्रताप वसत आहेत! एखाद्या निर्दोष, निरपराध मनुष्याला जमीनदोस्त करण्यास, जगांत एखाद्याची उगीच्या उगीच नालस्ती करण्यास, फटफजिती उडविण्यास हा पण शब्द फार उपयोगीं पडत असतो. मनुष्यजातीचाच असा नैसर्गिक नीच स्वभाव असतो—ज्याला योग्य नांव ठेवण्यास कोणत्याहि भाषेंत यथार्थ शब्दहि आढळत नाहीं, आणि ह्मणूनच एका संस्कृत कवीनें 'ते के न जानीमहे!' ह्मणून आपलें अज्ञान प्रगट केलें आहे—कीं, त्याला दुसऱ्याचा उत्कर्ष, सुख, वैभव वघवत नाहीं. आणि अशा परोत्कर्ष सहन न होणाऱ्या अधमांनां हा पण शब्द फारच कामीं पडतो. "कळलें का तुह्मांला, त्या आपल्या गोपाळराव वकिलांची प्रॅक्टिस फार सुरेख चालूं लागली आहे," असें एकानें ह्मटलें पुरे, तोंच दुसरा या पण शब्दाचें पालुपद धरून त्याचे गुणानुवाद गाऊं लागतो "—पण, तो दारू पितो, वेश्यागमन करितो, त्याला बरेंच कर्ज आहे, तो लुच्चा लफंगा आहे—" गोविंदरावांनीं बरींच वर्षें निमकहलालीनें नोकरी करून दोन पैसे सांठवून स्वतंत्र उद्योगधंदा आरंभिला व देवदयेनें त्यांत त्यांचें चांगलें बस्तान बसलेलें पाहिलें, कीं माधवरावांच्या पोटांत शूळ उभा राहिलाच! "—पण, त्या हरामखोरानें डल्ला मारला ह्मणूनच त्याला व्यापारांत एवढें भांडवल घालतां आलें.—पण, त्या गळेकापूनें गिऱ्हाइकांची मान मुरगाळल्याविना का एवढी माया जवळ केली आहे?" यशवंतराव परीक्षेंत पहिल्या नंबरास

पास झाले, कीं त्यांच्या सहाध्यायांनीं सुरुवात केलीच "—पण, परीक्षकांस लांच भरल्याविना का पहिला नंबर मिळत असतो?—पण, त्यानें बुकावरून कापी केली आहे हें कुठें तुह्मांला माहित आहे?" वगैरे वगैरे मत्सराचे, परोत्कर्षासहिष्णुतेचे, दुष्टपणाचे विषारी गोळे या पण शब्दाच्या आड लपून सोडतांना जगाला आपण पहात असतों.

उलट्याचें सुलटें आणि सुलट्याचें उलटें, त्याचप्रमाणें खऱ्याचें खोटें आणि खोट्याचें खरें करून दाखविण्याची अजब शक्तीहि या पण शब्दाच्या अंगीं आहे! "तुह्मी ह्मणतां तें बरोबर आहे—पण, मला तसें वाटत नाहीं!—होय, गोष्ट खरी आहे—पण, मला तें मान्य नाहीं.—मीं तुह्मांला वचन दिलें तें मला आठवतें—पण लाचार आहें, माझ्यानें तुमचें काम होणार नाहीं.—तुह्मी खोटें बोलणार नाहीं ही माझी खात्री आहे—पण, मी तसें बोललोंच नाहीं!" याप्रमाणें हातानें सहज घडणाऱ्या गोष्टी या पणच्या मागें राहून टाळतां येतात, पण शब्दाला पुढें करून दिलेलीं वचनें मोडतां येतात आणि एखाद्या आंधळ्यालाहि दिसणारी वस्तु हा पण शब्दरूपी चष्मा चढवून मुळींच दिसत नाहीं असें भासविण्याची दिव्यशक्ति या पण शब्दाच्या अंगीं आहे.

पुरुषांपेक्षां स्त्रियांसतर या पण शब्दानें फारच पछाडिलें आहे. "देसायांची इंदिरा बी.ए., ची परीक्षा पास झाली–" "—पण, त्याचं कारण कुठं कळलं आहे तुह्मांला? तिच्याशीं लग्न करायलाच जर कुणी कबूल होत नाहीं, तर कालीजांत जाऊन अभ्यास करण्याशिवाय काय करील बापडी!" "जोशांच्या मालतीचं अक्षर किती सुंदर—" "—पण, तें ती कुठं लिहिते? तिच्या नांवानं तिचा भाऊ लिहितो!" "पंडितांच्या शांताबाईच्या कानांतील हिऱ्याचीं कुडीं किती सुंदर दिसत होतीं–" "—पण, तीं तिचीं नव्हत बरं का! तिनं तीं घरवाल्याच्या सुनेचीं घटकाभर घातलीं होतीं." "नाईकांच्या तारेच्या हातांतील गोटपाटल्यांचा घाट मोठा सुबक दिसतो–" "—पण, त्या खऱ्या कुठं आहेत? गिलिटाच्या आहेत बरं!" "तिकडे आज विनायक भावजींच्या घरीं जेवायला जायचं झालं होतं. रमाबाईनीं केलेल्या केशरी भाताची फारच बाई तारीफ करित होते–" "—पण, तो सूपशास्त्रांत वाचून तिनं केला होता. त्या पुस्तकांत सांगितला आहे त्याप्रमाणं केल्यास आह्मांला नाहीं का करतां येणार?" "सुंद्राकाकूंची सुशीला चांगल्या घरांत पडली हो—" "—पण, नवरा रोगी, बावळट आहे. सासू मोठी खट आहे." "यमुनेचं

दिसत होता, तथापि त्याच्या मुद्रेंत करारीपणा, कृतज्ञता, सरळपणा आणि उमेद यांची झांक दिसत होती. डाक्टरसाहेबांनीं त्याला पसंत करून त्याचा एक हात उघडा केला व त्याच्या दंडांतून शस्त्रानें हवें तेवढें रक्त काढून तें रोग्याच्या शरीरांत प्रविष्ट केल्यावर जवळ आश्चर्यानें स्तब्ध उभे राहिलेल्या मंडळीला ह्मटलें "आतां रोगी बरा झाला तर तो या तरुण माणसाच्या पुण्याईनें झाला, असें समजा. आपल्या शरीरांतलें रक्त दुसऱ्यास देण्यास तयार होणाऱ्या या तरुणाचे तुह्मीं आभार मानले पाहिजेत."

हे स्तुतिपर उद्गार ऐकून त्या तरुणानें नम्रपणानें खालीं पाहिलें आणि हळूच ह्मटलें "उपकाराची फेड करण्याचा सुप्रसंग मला आणून दिल्याबद्दल मी परमेश्वराचे आभार मानतों."

* * * * *

हा एवढा महानुभव कोण ह्मणून जो तो त्या तरुणाकडे पाहूं लागला. भाऊसाहेबहि आपल्या क्षीण नेत्रानें त्याच्याकडे टक लावून पाहूं लागले. बराच वेळ याप्रमाणें पाहिल्यावर एकदम सद्गदित कंठानें ते ह्मणाले " कोण? कृष्णराव!"

कृष्णरावांनीं "माझ्या चुकीची क्षमा करा" असें ह्मणून भाऊसाहेबांचे पाय धरले. भाऊसाहेबांनीं कृष्णरावांची ही कृतज्ञता पाहून आपल्या जिंदगीचा अर्धा हिस्सा कृष्णरावांच्या नांवें करून दिला व नंतर बाकीच्या जिंदगीची व्यवस्था लाविल्यावर शांतपणानें प्राण सोडला.



## गोष्ट १३ वी.
## जशास तसें.

महाराष्ट्रांत सतरावें शतक ह्मणजे किती घालमेलीचें व उलाढालीचें होतें तें वाचकांस सांगितलें पाहिजे असें नाहीं. गेल्या सहाशें वर्षांत महाराष्ट्राच्या इतिहासांत खरा उत्साहजनक, सद्वृत्तिप्रेरक व अभिमानोचित असा याशिवाय दुसरा काळच नाहीं, असें ह्मटलें तर आमच्यावर अतिशयोक्तीचा आरोप कोणासहि करितां येणार नाहीं. सर्व राष्ट्र परकीयांच्या खडतर अमलाला कंटाळून स्वातंत्र्यौत्सुक्यानें अगदीं हालून गेलें होतें. स्वाभिमानाच्या झंझावातानें महाराष्ट्रोदधि अगदीं खळवळून सोडला होता. अशांत त्यास श्रीशिवाजीसारखा संकट व कष्ट यांविषयीं बेपर्वा राहून स्वतः अंगानें झटणारा व मराठशाहीची प्राणप्रतिष्ठा करण्याच्या दृढ संकल्पानें विजापूरकराची—व तशीच वेळ ठेपल्यास दिल्लीकराचीहि—नांगी ठेंचण्याचें वीरकंकण बांधणारा मार्गदर्शक मिळाला. महाराजांनीं आपल्या उत्कट धर्मनिष्ठेनें, निष्कपट देशाभिमानानें, निर्मळ नीतीनें, मोहक वाणीनें, अलौकिक साहसानें व आश्चर्यकर मुत्सद्दीपणानें आसपासच्या दरोबस्त भोळ्या परंतु प्रेमळ, उत्साही व विश्वासू मावळे लोकांस आपलें अंकित करून घेतलें व त्यांच्या साहाय्यानें सकृद्दर्शनीं अचाट व प्रायः अशक्य भासणाऱ्या महाकार्याचा उपक्रम केला. आज हा किल्ला सर कर, उद्यां त्याला शह दे, परवां तें शहर लूट, जुने किल्ले दुरुस्त कर, नवे बांध, कधीं बादशाही खजिनाच लूट, अशा रीतीनें ते राज्यप्रासादाच्या पायाचा मालमसाला जमवूं लागले. इसवीसनाच्या सतराव्या शतकाच्या मध्याला हें बांधकाम चांगलेंच रंगारूपाला आलें. अशा प्रकारची राज्यक्रान्ति व्हावयाची, ह्मणजे कांहीं वर्षेंपर्यंत देशांत जिकडेतिकडे अस्वस्थता, बेबंदशाही, लुटालूट, जाळपोळ हीं चालावयाचींच; तें केवळ अपरिहार्य होय. तरी पण अशा स्थितींतहि दरोबस्त प्रजाजन महाराजांवर अत्यंत खूष असून, स्वधर्म व स्वदेश यांच्या प्रेमानें उत्तेजित होऊन, पोटाची खळी कशीतरी भरून, राष्ट्रसेवेला हातावर शिर घेऊन निरंतर तयार असत. महाराजांविषयीं त्यांच्या मनांत इतका एकनिष्ठ भाव वसत असे कीं, त्यांच्या कृपाकटाक्षलाभार्थ किंवा त्यांच्या तोंडून नुसती शाबासकी मिळविण्यास असंख्य मराठे वीर प्राण तृणवत् लेखून वाटेल तें साहस करण्यास एका पायावर तयार असत. अशा प्रकारचें वीरतेज, श्रेष्ठांविषयीं पूज्य निष्ठा व निरपेक्ष

देशभक्ति ज्या समाजांत वसेल, त्याची उन्नति होण्याला, त्याला सोन्याचे दिवस दिसण्याला कशाला विलंब लागेल !

असो. हळूहळू महाराजांनीं तोरणा, चाकण, कोंडाणें, रायरी, जावळी वगैरे बरेच किल्ले काबीज केले व फौजफांटाहि मातबर जमविला. अखेर शिवाजीचें प्रस्थ बरेंच माजलें, ही बातमी विजापुरीं जाऊन तेथून लहानमोठे सरदार त्यांच्या पुंडाईच्या बंदोबस्तासाठीं येऊं लागले.

अशा वेळीं गुरगांवीं एक मोठा समारंभ चालला होता. सुभानराव पाटलांचा लग्नसोहळा ह्मणजे आसपासच्या मराठ्यांनां मोठाच उत्साहाचा दिवस ! सुभानराव सुमारें बाविशीच्या घरांत होते; तरी पण शौर्यासंबंधें फार नाणावलेले व शिवाजी महाराजांच्या पूर्ण मर्जींतले होते. आतां देश व धर्म यांच्या संरक्षणार्थ जे पूर्णपणें वाहलेले व सदासर्वदा समरांगणीं उभे, त्यांनीं विवाहपाशांत पडणें ह्मणजे स्वताला जखडून घेणें व इष्ट कार्यापासून च्युत होणें असें प्रथमदर्शनीं वाटण्याचा संभव आहे; परंतु हल्लींचा कागदी बेगडी ज्वानांचा काळ व तो पहिल्या शूरांचा काळ, यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. त्या काळीं जसा पुरुषांचा तसाच स्त्रियांचाहि धर्माभिमान व देशाभिमान जागृत झाला होता. वीरपत्नी देशसेवेंत आपल्या शूर पतींच्या आड न येतां उलट त्यांस प्रोत्साहनच देत. असत. पतिव्रताहि समरांतून पराङ्मुख झालेल्या पतीची निर्भर्त्सना करीत व त्यास मृतप्राय लेखीत. प्रसंग पडल्यास त्या स्वताहि शस्त्रांचा खण्खणाट करून विजयश्रीला बळेंच खेंचून आणीत. जसें शिवाजी महाराजांनां मातुःश्री जिजाबाई वेळोवेळीं उपदेश करून, उत्तेजन देऊन व प्रसंगीं हिणावूनहि स्फुरण चढवीत, तसेंच घरोघर माता आपापल्या मुलांबरोबर वागत असत. एकंदरींत लग्न झाल्यामुळें पत्नी किंवा आई देशसेवेच्या आड न येतां, उलट तिला दुजोरा—तिजोरा—आणीत.

असो. सुभानराव पाटलांची वधू कमळाबाई हिचें वय सोळा वर्षांचें होतें. कमळाबाई ही खरी खरी वीरकन्या होती व सुभानरावांचीं साहसाचीं व शौर्याचीं कृत्यें ऐकून त्यांच्याविषयीं तिच्या मनांत निर्मळ आदर व पूज्यभाव बरेच दिवस उत्पन्न झाला होता. पुढें त्यांनीं गुदस्तां कमळाबाईस जेव्हां मागणी घातली व ती तिच्या बापानें कबूल केली, तेव्हां तिच्या आदराला व निष्ठेला जी विशिष्ट प्रेमाची भर पडली व त्यापासून जो अननुभूत आनंद उद्भूत झाला, त्याची कल्पना पुरुषांस किंवा ती स्थिति ज्यांनीं अनुभविली नाहीं अशा स्त्रियांसुद्धां होणार नाहीं.

आज ती वीरकन्या वीरपत्नीची पदवी पावली. लग्नाची बरेच दिवस तयारी चालली होती. सुभानरावांच्या कुळाचा व त्यांचा खताचाहि लौकिक मोठा असल्यामुळें वऱ्हाड अपरंपार जमलें होतें. आसपासच्या पांचपन्नास गांवांतल्या मंडळीची या कार्यानिमित्त मोठीच तारंबळ उडाली होती. मोठ्या थाटानें चार दिवस लग्नसमारंभ होऊन एकदाची वरात घरीं आली. तोंच अशी बातमी आली कीं, विजापुराहून निघालेल्या मोठमोठ्या सरदारांपैकीं एक अहमदखां शेरगडावर आपल्या बायकामुलांसकट राहिला आहे व त्यानें एक सैन्याची तुकडी गुरगांव व त्याच्या आसपासचीं ठिकाणें उध्वस्त करण्याकरितां पश्चिमच्या बाजूनें पाठविली आहे. ही बातमी येतांक्षणींच जिकडेतिकडे एकच धांदल सुरू झाली. या प्रांतांतील प्रमुख प्रमुख मराठे या लग्नकार्यांत गुंतले आहेत हें पाहून अहमदखानें आपला लाग साधण्याचा हा प्रयत्न चालविला होता. गुरगांवाच्या उत्तरेस सुमारें सात कोसांवर शेरगड व आग्नेयेस तितक्याच अंतरावर बेरगड असे दोन किल्ले होते. ते दोन्ही त्या वेळीं मुसलमानांच्या कबजांत होते.

असो. वरील बातमी येतांक्षणींच मराठे बारगीर, शिलेदार वगैरे सर्व शिपाई-गड्यांनां वीरश्री चढली व दुसरा दिवस उजाडण्याच्या पूर्वींच सर्व ज्वान मंडळी बरोबर घेऊन शत्रूला तोंड देण्यासाठीं पश्चिम दिशेला सुभानराव चालू झाले. वरात घरीं येऊन थोडेसे कलाक गेले नाहींत, तोंच त्या वीरपत्नीला पतिविरह झाला व ह्मणून किंचित् काळजीची छायाहि तिच्या तोंडावर दिसूं लागली. पतीस जय लाभून तो सुखरूप घरीं परत येओ, अशी ती मनांत देवाची करुणा भाकूं लागली. परंतु आपल्या पतीनें समरांगणांत शत्रूशीं भिडण्याला जाऊं नये ही कल्पनाहि तिला शिवली नाहीं, एवढेंच नव्हे तर या वेळीं सुभानराव शत्रूंवर चालून जाण्यास जर कांकूं करते, तर तिनें त्यांची तत्काळ अत्यंत निर्भर्त्सना केली असती.

सुभानरावांच्या सैन्याला सूर्यास्ताच्या सुमारास शत्रूची छावणी दिसूं लागली. शत्रूनें अगदीं ऐन डोंगरांत तळ दिलेला होता. ज्या खोंड्यांत ही छावणी होती, ती जागा ह्मणजे आमच्या मराठ्यांच्या अगदीं पायाखालची व अशा ठिकाणीं—मोठ्या अडचणीच्या जागेंत—तळ देण्याचें वेडेपण मुसलमानांच्या हातून व्हावयाचें नाहीं. परंतु **विनाशकाले विपरीतबुद्धिः** ह्मणतात तेंच खरें. संध्याकाळ-पर्यंत या अहमदखांच्या तुकडीनें बरेच गांव जाळूनपोळून बेचिराख केले होते व बहुतेक मराठे शूर गडी गुरगांवास गेले असल्यामुळें, या महमदीयांच्या हैदोसाला फारसा अडथळा कोठेंच झाला नाहीं; तेव्हां ते अगदीं चढून गेले होते.

सर्व मराठे शिपाई बेसावधपणें गुरगांवांत लग्नांत गुंतले आहेत, त्यांना आपली बातमी लागली नाहीं, उद्यां नेटानें कूच करून सर्व गनीमांना–सैतानांना–एकदम गुरगांवांतच कोंडमारा करून ठार मारूं असे त्यांचे मनांत बेत चालले होते व सूर्यास्त होतांच अगदीं पोंच न ठेवितां त्यांनीं या अडचणीच्या जागीं बेसावधपणें तळ दिला होता. ही एकंदर स्थिति सुभानरावांनीं तेव्हांच ताडली व शत्रूच्या नजरेस पडण्याच्या पूर्वींच आपल्या सैन्याच्या त्यांनीं तीन टोळ्या केल्या व असा हुकूम फर्माविण्यांत आला कीं, या तीन टोळ्यांनीं लपतलपत शत्रूस चाहूल न लागूं देतां, तीन दिशांनीं शत्रूच्या गोटाजवळ जावें व मध्यरात्रीच्या ऐन अंमलांत एकदम तिन्हीं बाजूंनीं हल्ले करून कत्तल उडवून शत्रूस जेरीस आणावें.

हुकूम सुटण्याचाच काय तो अवकाश, लगेच सैन्याच्या त्या तीन तुकड्या तीन मार्गांनीं चालूहि झाल्या. अविंध अगदींच बेफिकीर होते. आज मिळालेल्या लुटीमुळें त्यांना अतिरिक्त आनंद होऊन गाफीलपणा मात्र वाढला होता. कित्येक अफू, दारू वगैरे मादक पदार्थ सेवन करून अगदीं तर्रर् व धुंद झाले होते. त्यांना आपण स्वर्गांत, नरकांत किंवा पृथ्वीवर आहों याचें भानच नव्हतें. कित्येक जुगार, इष्कबाजी इत्यादि व्यसनांत चूर होऊन पशूप्रमाणें वर्तत होते. अशा स्थितींत ऐन मध्यरात्रीला कर्णकर्कश "**हरहर महादेव!**" हा काळध्वनि ऐकून कांहीं भानावर आले, तर बरेच भयानें गर्भगळित किंवा आश्चर्यानें भ्रांत होऊन गेले. त्यांना शस्त्र उचलण्याचें सुचेना किंवा पळण्याचेंहि साधेना. सर्व दिशांनीं अकस्मात् एकदम घाला पडला व भयंकर कत्तलीला सुरुवात झाली! जवळजवळ तीन हिस्से अविंध गारद झाले, व कांहीं थोडेसेच अंधकारांत वाट फुटेल तिकडे जीव घेऊन पळून गेले. मराठ्यांनीं सर्व गोट लुटून फस्त केला व मुख्यमुख्य कैदी बरोबर घेऊन दुसऱ्या दिवशीं सकाळींच पुन्हा गुरगांवाकडे फिरले व संध्याकाळला तेथें येऊन पोंचलेहि.

परंतु तेथें त्यांच्या दृष्टीस काय हा भयंकर प्रकार पडला! सर्व गांव अगदीं उजाड झाला होता. ठिकठिकाणीं स्त्री, पुरुष व मुलें यांच्या प्रेतांच्या राशी पडल्या होत्या! हा रक्तपात पाहून त्या शूर वीरांना काय वाटलें असेल व इत्थंभूत वृत्त समजून घेण्याविषयीं किती उत्सुकता उत्पन्न झाली असेल, तें वाचकांनीं कल्पनेनेंच जाणावें. गांवांत कोणीतरी बातमी सांगणारें भेटले ह्मणून सुभानरावांचे लोक हिंडत होते. परंतु कोठें चिटपांखरूंहि दृष्टीस पडेना. इतक्यांत कांहीं पांचदहा इसम दबतदबत

रानांतून गांवांत आलेले त्यांस आढळले. लागलीच त्यांच्याभोंवती सगळ्यांचा गराडा पडून हा काय प्रकार आहे ह्मणून प्रश्नांवर प्रश्न सुटूं लागले. त्यांच्या सांगण्यावरून असें समजलें कीं—सुभानराव सैन्य घेऊन गेल्यानंतर सुमारें पांचसहा कलाकांनीं ऐन दुपारीं एकाएकीं शेरगडावरील शिल्लक असलेलें बहुतेक सर्व सैन्य घेऊन अहमदखानें गुरगांवावर हल्ला केला. गांवांत तरुण, ज्वान मंडळी ह्मणण्यासारखी मुळींच नव्हती. ह्यातारेकोतारे, बायका व मुलेंच होतीं. त्यांचा त्या सैन्यापुढें मुळींच टिकाव लागला नाहीं. मुसलमानांनीं बहुतेक सर्व लोकांची कत्तल उडविली. त्यावेळीं बऱ्याच स्त्रियाहि शत्रूच्या हातीं लागण्यापेक्षां शस्त्रांचे दोन हात करून मरण पावल्या; परंतु कांहीं जीवंत शत्रूच्या हातीं सांपडल्या; त्यांत कमळाबाईहि होती. मुसलमानांनीं लुटालूट करून बऱ्याच बायका—कमळाबाईसह—कैद करून ते बेरगडाला मुक्कामाला गेले. अहमदखांचीं बायकामुलें शेरगडावरतीच थोड्याशा लोकांसह अद्याप होतीं. परंतु खुद्द अहमदखां यशानें शेंफारून हातीं पडलेल्या हिंदु बायका व आपलें सैन्य घेऊन बेरगडावर गेला होता.

हा भयंकर प्रकार ऐकतांच सुभानरावांस विलक्षण चेव व त्वेष आला. ताबडतोब बेरगडावर चालून जाऊन त्या मुसंड्याच्या नरडीचा घोंट घ्यावा व आपली पत्नी व इतर बायका यांची सुटका करावी, असें त्यांच्या मनांत आलें. परंतु पूर्ण विचारांतीं हें काम फार धाडसाचें व बरेंच धोक्याचें आहे अशी त्यांची खात्री झाली. बेरगड हा किल्ला मजबूत होता. खानाचें सैन्यहि बरेंच होतें व मराठे आपल्या स्त्रियांच्या सुटकेकरितां खात्रीनें हल्ला करणार ह्मणून तो पूर्ण सावध राहून निकरानें लढणार, हेंहि उघड होतें. सुभानराव पाटलांच्या लक्ष्यांत या सर्व गोष्टी येऊन त्यांनीं एका युक्तीची योजना करण्याचें ठरविलें व आपल्या सर्व सोबत्यांस लवकर जेवून रातोरात पुन्हा कामगिरीवर जाण्यासाठीं तयार होण्याबद्दल हुकुम सोडला.

असो. रात्रीं नवांचे सुमारास आमचें मराठी लष्कर पुन्हा तयार झालें व पाटलांनीं त्यांस शेरगडावर एकदम चालून जाण्याचा आपला बेत सांगितला. तें ऐकतांच सर्वत्रांस मोठा अचंबा वाटला. कारण अहमदखां बायांस घेऊन बेरगडास गेला होता हें वर सांगितलेंच आहे. परंतु पाटलांनीं "गडे हो! शेरगडावरच हल्ला करून आपले बेत सिद्धीस जातील, नाहींतर बेरगडावर आपल्याला ठोकर बसून ओंफ्स झाल्याशिवाय रहावयाचेंच नाहीं." ह्मणून सांगितलें व एकदम कूच करण्यास आरंभ केला. ही मराठ्यांची स्वारी बारांच्या सुमारास शेरगडास

पोहोंचली. गडावर फारशी शिबंदी नव्हती व बंदोबस्तहि नीट नव्हता. मराठ्यांनीं एकदम त्वेषानें हल्ला करून गड काबीज केला व अहमदखांच्या बायकामुलांना कैद करून तसेच घाईघाईनें सकाळला परत गुरगांवास आले.

त्याच दिवशीं दुपारीं तीन वाजण्याच्या सुमारास बेरगडापुढें पांचदहा मराठे शिलेदार घोड्यावर स्वार होऊन व भाला बर्ची वगैरे हत्यारांनीं सज्ज होऊन आले होते. त्यांच्या आघाडीलाच सुभानराव होते. त्यांनीं गडाजवळ येतांच शिंग फुंकिलें व आपण शांततेच्या हेतूनें अहमदखांजवळ मसलत करण्याकरितां आलों आहों ह्मणून गडावर निरोप पाठविला. अहमदखां हा शाहणा, अब्रूचा व शूर शिपाई होता. सुभानरावांचें शौर्य व दानत यांचा लौकिक त्यानें ऐकिला होता व त्यांच्याविषयीं त्याच्या मनांत थोडाबहुत आदर वसत होता. शांततेचें बोलणें लावण्याकरितां पाटील आले आहेत हें ऐकतांच त्यानें त्यांस मोठ्या सन्मानानें गडावर नेलें व त्यांची मुलाखत घेतली. तेव्हां पाटीलबोवा ह्मणतात "खानसाहेब, आपण आमच्या प्रांताला पश्चिमेस शह देऊन व आह्मांला तिकडे गुंतवून गुरगांवावर हल्ला केलात, त्याबद्दल आमचें कांहीं ह्मणणें नाहीं. हे लष्करी व मुत्सद्दी पेंच आहेत; त्यांत जो फसेल तो हरेल. परंतु आपण आमच्या बायकांस मारून, जिवंत सांपडल्या त्यांस धरून आणिलेंत हें नामर्दपणाचें काम आहे. आपण इभ्रतदार आहां, तसे आह्मीहि आहों. आमच्या बायकांप्रमाणें तुमच्या बायका जर आह्मीं पळवून आणल्या तर आपल्यास काय बरें वाटेल ?"

त्यावर खान ह्मणाले "पाटील! शांततेचें बोलणें लाविण्यासाठीं आपण आलां, तें हेंच का? ज्याची बायको परक्यानें बळजोरीनें नेली, त्याला तें बरें न दिसणें हें साहजिक आहे; परंतु मराठ्यांनीं आपल्या बायका निराश्रित टाकिल्या, त्यांस आह्मीं आश्रय दिला यांत वावगें तें काय! यांत आमची इभ्रत मुळींच गेली नाहीं; तुमची गेली, तर तुह्मीं आपल्या दैवाला किंवा वर्तनाला दोष द्या! असें भागूबाईसारखें रडगाणें गाण्यांत काय मतलब आहे?"

हें ऐकतांच पाटलांच्या कपाळाला किंचित् आंठ्या पडल्या; पण ते लागलेच शांत होऊन ह्मणाले "खानसाहेब, आपण लाखाची गोष्ट बोललां! आह्मींहि तुह्मांला हेंच सांगायला आलों आहों कीं, तुमचें पुरें उट्टें काढण्याकरितां गेल्या रात्रीं आह्मीं शेरगडावर हल्ला केला व तुमच्या बिबी व छोकरे सर्व कैद करून गुरगांवांत बंदोबस्तांत ठेविलीं आहेत. जर आज अवशीस एक प्रहर रात्रीपर्यंत आह्मी आपल्या

स्त्रियांसकट गुरगांवास गेलों नाहीं, तर त्यांची तत्काळ कत्तल करण्याचा सक्त हुकूम सोडून मी इथें हें सामाचें बोलणें लावण्यास आलों आहें. तेव्हां आतां आपलें काय ह्मणणें आहे तें ताबडतोब सांगा पाहूं. आपणांस कदाचित् माझें ह्मणणें खोटें वाटेल, ह्मणून हे खुणेकरितां आपल्या बिबीचे दागिने व हें एक पत्र आणिलें आहे."

असें ह्मणून दागिने व पत्र पाटलांनीं खानापुढें फेंकिलें. खानानें अगदीं आश्चर्य-चकित व भयभीत होऊन तोबा तोबा ह्मणत ते दागिने निरखून पाहिले व पत्रहि वाचलें. पत्र त्यांच्या मोठ्या बिबीसाहेबांच्या हातचें होतें. पाटलांचा मजकूर खरा आहे हें पत्रावरून उघड झालें. तेव्हां खिन्न मुद्रेनें खान ह्मणाले "पाटील, या शर्यतींत आह्मीं हरलों खरे! शेरगडावर तुह्मीं जाल, असें माझ्या ध्यानींमनींहि नव्हतें. येथें मात्र तुमचा हल्ला येईल, ह्मणून मी अगदीं जय्यत तयारींत होतों. परंतु आपण ह्मणतों एक व होतें भलतेंच, हेंच खरें. पण आह्मीं तुमच्या बायका तुमच्या स्वाधीन केल्या, तर तुह्मीं आमच्या परत कराल याला प्रमाण काय? यांत दगलबाजी होण्याचा संभव आहे."

त्यावर पाटील छातीला हात लावून ह्मणाले "खानसाहेब! या शूर मराठ्याच्या वचनापलीकडे मी कांहींएक हमी देऊं शकत नाहीं! खानसाहेब, खरा मराठा प्राणहानि पत्करील, परंतु वचनभंग होऊं देणार नाहीं! तुह्मीं आपले दहापंधरा इसम आह्मां-बरोबर धाडावेत व आमच्या बायका आमच्या स्वाधीन कराव्यात, ह्मणजे तुमच्या बिबी व मुलें तुमच्या मनुष्यांच्या स्वाधीन करण्याचें मी आपल्याला वचन देतों. एक प्रहर रात्रीपूर्वी मात्र या गोष्टी झाल्या पाहिजेत. नाहींतर दिरंगाईचा आपल्याला पुढें व्यर्थ पश्चात्ताप होईल!"

झालें. खानांला हें बोलणें मान्य करावें किंवा बायकापोरांस आंचवावें, याशिवाय अन्य गतीच नव्हती. तेव्हां त्यांनीं यापैकीं कोणता मार्ग स्वीकारला असेल, तें वाचकांस सांगितलें पाहिजे असें नाहीं.

* * * * *

त्या दिवशीं रात्रीं गृहसुखाविषयीं निराश झालेल्या कितीतरी मराठे कुटुंबांनां पुन्हा आनंदाचा दिवस दिसला! लोकांनीं सुभानरावांच्या या युक्तीचें कितीतरी कौतुक केलें! कमळाबाईनां आपल्या पतीचें अप्रतिम शौर्य व शहाणपण पाहून फार कृतकृत्यता वाटली, यांत नवल तें काय!



# वीरपत्नीचें समाधान.

[ बुरुजावरून पतीचें युद्धकौशल्य अवलोकन करून संतोष पावलेल्या एका वीरपत्नीचे उद्गार या पुढील काव्यांत गोविले आहेत. ]

दुंदुभी दुंदुभे भारी
नभमंडल भरती भेरी;
धूलिनें धुंद दिक् चारी
सेनाहि दिसेना सारी;
रणकंदन माजे भारी
बिजली जशि चमके स्वारी !

गडगडाट या तोफांचा !
खणखणाट ही टापांचा !
ऐकुं ये त्यांत स्वारीचा
ध्वनि, वीरां देत हुषारी !
बिजली जशि चमके स्वारी. १

लखलखाट तलवारींचा !
चिलखतें आणि भाल्यांचा !
तिकडील तुऱ्या तोड्यांचा !
कशि बाइ मूर्ति मल्हारी !
बिजली जशि चमके स्वारी ! २

झुंजती वीर वीराशीं,
तळपे मधिं स्वारी खाशी,
पाडीत अरीच्या राशी;
खणखणा झडति तलवारी !
बिजली जशि चमके स्वारी ! ३

जळ झुले जसें वाऱ्यानें
तिकडील तशा शब्दानें
कशिं पहा झुलति हीं सैन्यें !
देईल विजय मल्हारी !
बिजली जशि चमके स्वारी ! ४

हा ! दिली पाठ सेनांनीं,
परि कशी स्वारि मागोनी
गंभीर धीर शब्दांनीं
अरिवरी फिरवि माघारी;
बिजली जशि चमके स्वारी ! ५

हो अरिची दाणादाण,
लोटलें सैन्य मागोन;
चमुशिरीं वारुवरि कोण !
तिकडीलच बाइ भरारी !
बिजली जशि चमके स्वारी ! ६

पति असे लाभले जीतें
वीरसू वीरपत्नी ते !
अभिमान योग्य मिरवीते !
ती धन्य धन्य संसारीं !
बिजली जशि चमके स्वारी ! ७

## गोष्ट १४ वी.

# चांगलें काय ?

तैमुरलंगाचा नातु बाबर हा चांदनीच्या मेदिनीरायाचा, मेवाडच्या संग राण्याचा व दुसऱ्याहि मोठमोठ्या वीर पुरुषांचा पराभव करून दिल्लीच्या तक्तावर बसला होता. साऱ्या हिंदुस्थानांत बाबराचा गर्व हरण करील असा कोणीहि वीर उरला नव्हता.

संध्याकाळचा वेळ. उष्णकाळाचे दिवस. यमुनेच्या रम्य तीरावर वायुसेवनासाठीं कांहीं मंडळी भ्रमण करित होती. त्यांत एक तरुण रजपूत कुमारहि होता. हा कुमार केवळ वायुसेवनासाठींच यमुनातटावर आलेला दिसत नव्हता. कारण त्याच्या चर्येवर प्रसन्नतेची यत्किंचितहि झांक नव्हती. पहाणारास भयच वाटेल अशी त्याची भीमसुद्रा दिसत होती. कसल्यातरी गहन विचारांत तो गुंतला असावा व त्या विचारांतच इकडूनतिकडे येरझाऱ्या करित आहे, असें त्याच्या मुद्रेवरून, अंगविक्षेपांवरून स्पष्ट दिसून येत होतें. तो मध्येंच थबके, आकाशाकडे दृष्टि लावी, क्षणांत यमुनेच्या निश्चल प्रवाहाकडे पाही, क्षणांत भूमीकडेच पाही व लगेच भरभरभरभर पावलें टाकित चालूं लागे. क्षणार्धांत एकदम मागें फिरून कुठेंतरी बसे. त्याचे डोळे इंगळासारखे लाल झाले होते. नाकांतून उष्ण श्वास निघत होते. क्षणार्धांत तो स्वताशींच पुटपुटूं लागला "बाबर! भरलीं तुझीं शंभर वर्षें! नीचा! हरामखोरा! तूं माझ्या मातृभूमीचा अपमान केला आहेस; आमच्या स्वातंत्र्याचा नाश केला आहेस; तुझ्या वधामुळें मला केवढेंहि पातक लागो, त्या पातकाचें प्रायश्चित्त मी संतोषानें भोगीन पण आज तुला या जगांत ह्मणून राहूं देणार नाहीं!"

हळूहळू काळोख होत चालला. यमुनानदीच्या सुनील जलामध्यें आकाशांतील कांहीं तारका आपल्या सखीजनांसह जलविहार करूं लागल्या. लवकरच रोहिणी-वल्लभ चंद्रमाहि यमुनेच्या जलांत शिरला. तो रमणीय प्रसंग पाहून वायुहि हर्षभरानें नृत्य करूं लागला.

तरुण रजपूत आतां जाग्यावरून उठला. त्यानें चंद्रप्रकाशांत राजमार्गाकडे दूरवर नजर करून पाहिलें. आपल्या कमरेजवळ गुप्तपणें खोविलेली कट्यार बाहेर काढली. इतक्यांत समोरच्या देवालयांतून आरतीच्या शंखांचा भीषण नाद सुरू झाला. त्या नादानें तरुणाच्या अंगीं अधिकच स्फुरण चढलें व तो आतां बिलकूल इकडेतिकडे न पहातां एकदम राजमार्गाला लागला व द्रुतगतीनें चालूं लागला.

[ २ ]

बाबर दिल्लीपदारूढ झाल्यावर आपल्या राज्यामध्यें काय प्रकार चालला आहे हें स्वनेत्रांनीं अवलोकन करण्याकरितां दररोज निरनिराळे गुप्तवेश धारण करून नगरामध्यें फिरत असे. आमच्या रजपूत तरुणास ही गोष्ट ठाऊक होती. बाबराला तो पूर्णपणें ओळखित असे. बाबरानें कसलाहि वेश धारण केला तरी त्याचें रूप आमच्या या रजपूत तरुणापुढें लपलें जात नसे. तो त्याला तेव्हांच हुडकून काढी. आणि याच विचारानें बाबराला रस्त्यांत एकटा गांठून त्याचा खून करावा ह्मणून हा रजपूत तरुण आज सर्व तयारीनिशीं बाहेर पडला होता.

अरे! ही एवढी कसली गडबड माजली आहे? हा काय घोटाळा चालला आहे? हे लोक धापा टाकित एवढ्या त्वरेनें कोणीकडे आणि कां पळत सुटले आहेत? कोणी कोणाशीं बोलत नाहींत, भीतीनें सर्वांचीं तोंडें सुकलीं आहेत, जो तो वाट मिळेल तिकडे सैरावैरा पळत आहे, हा काय प्रकार आहे ?

"हत्ती सुटला–हत्ती–हत्ती! पळा–पळा–" अशी एकाएकीं एकच ओरड झाली. क्षणार्धांत एक मदोन्मत्त हत्ती पायाखालीं मिळेल त्या वस्तूचा चुराडा करित समोरून धावत येत असलेला सर्वांच्या दृष्टीस पडला. जे आतांपर्यंत कसली गडबड आहे याचा आश्चर्यचकित होऊन विचार करित जागच्या जागीं थबकले होते त्यांची दाणादाण काय विचारावी! कोणी समोरच्या घरांत शिरूं लागले, कोणी झाडांवर चढूं लागले, कोणी किंकर्तव्यमूढ होऊन कावऱ्याबावऱ्यासारखे करूं लागले. कोणी धावूं लागले, कोणी पडूं लागले, हत्तीच्या पायाखालीं चिरडून मरण्यापूर्वीं त्या असंख्य गर्दींतच चिरडून कित्येक परलोकाप्रत जाते झाले. असा एकच हाहाकार उडाला!

आमचा तरुण रजपूतहि या गर्दींत होता. त्याला 'बाबर–बाबर–बाबर–' याशिवाय हा वेळपर्यंत दुसरें कांहींहि दिसत नव्हतें. परंतु हा अकल्पित प्रकार दृष्टीस पडतांच तरुणाच्या मनांतील पूर्वींचे विचार नष्ट होऊन तो या गर्दीकडेच लक्ष्य देऊन पाहूं लागला. इतक्यांत कोणी मोठ्यानें ओरडलें "अरे पोरा, धाव धाव—"

एक सुंदर चिमुकला मुलगा हत्तीच्या वाटेंत आला होता. हत्ती आतां अगदींच जवळ आला होता. एकदोन पळांत तो चिमुकला बाळ हत्तीच्या पायाखालीं चिरडला गेला असता. बिचारा हास्यमुखानें रस्त्यांत खेळत होता. जगांतील सुखदुःखांपासून अलिप्त असलेल्या त्या सकुमार निर्दोष बालकाला हत्तीची काय बिशाद! तो अधिकच हास्यमुद्रेनें हत्तीजवळ जाऊं लागला.

एकजण मोठ्यानें ओरडला "त्या पोराला खेंचा, खेंचा—हत्ती आला!" दुसरा बोलला "त्याचेंतर मरण भरलेंच! धडधडीत पेटलेल्या आगींत उडी कुणीं घ्यावी? त्याचेबरोबर दुसऱ्यानेंहि आपला प्राण गमावण्यांत पुण्य काय? भूषण काय?"

तथापि आमचा हा तरुण रजपुत त्या बालकाला रस्त्यांतून दुसरीकडे नेण्यासाठीं धावत होता; परंतु शेजारीं उभ्या असलेल्या दहापांच जणांनीं त्याला घट्ट पकडून ओरडून ह्मटलें "अरे मूर्खा! मुद्दाम काळाच्या दाढेंत कां उडी घेतोस? शिवाय तो भंग्याचा पोर आहे. त्याला स्पर्श करणें पातक आहे!"

बिचारा तरुण रजपूत नाइलाज होऊन जागच्या जागीं राहिला. मृत्युमुखीं पडलेल्या भंग्याच्या पोराला प्राणदान देतांना होणाऱ्या विटाळाच्या पातकाला भिऊन तो गेला नाहीं, असें मुळींच नव्हे! तर ज्या अधमांना अशा वेळींहि भंग्याच्या मुलाला स्पर्श करणें परम घोर पातक वाटत होतें त्या मांगहृदयी नरपशूंनीं त्याला घट्ट पकडून धरल्यामुळें त्याला पुढें पाऊलच टाकतां येईना. अरेरे! बिचारा कोमळ बालक हत्तीच्यापायीं मरण पावणार!

परंतु त्या बालकावर या मांगहृदयी अधमांप्रमाणें सर्वांचा मायबाप जगचालक निष्ठुर झाला नव्हता. त्याला वांचविण्यासाठीं त्या असंख्य गर्दीमधून परमेश्वरानें आपल्या एका सुपुत्रास पाठविलेंच! बाणासारखा एकजण धावत येऊन त्या पोराला उचलून घेऊन बाजूस झाला. डोळ्यांची पापणी लवते नलवते इतक्या अवकाशांत हा प्रकार घडला. लगेच हत्तीहि मोठमोठ्यानें डुरकणे फोडित पुढें चालता झाला. कांहीं वेळानें गर्दी मोडली. सर्व लोक आपापल्या वाटेनें निघून गेले.

[ ३ ]

गर्दी मोडल्यावर आमचा तरुण रजपूत त्या मुलाला जीवदान देणाऱ्या वीर पुरुषाजवळ जाऊन त्यानें त्याच्या चरणांवर एकदम लोटांगण घातलें. मघांपासून तो एकसारखी टक लावून त्या पुरुषश्रेष्ठाकडे पहात होता. "हा महा पुरुष कोण बरें असावा? याचा पोषाखतर अगदीं भिकार दिसतो. परंतु तोंडावरील तेज झांकलें जात नाहीं. दुसऱ्याचा जीव वांचविण्यासाठीं स्वताचा जीव बळी देण्यास सिद्ध होणारा मनुष्य या जगांत आढळणें विरळा. हा कोण बरें दैवीपुरुष असावा?" इत्यादि विचारांत निमग्न असलेल्या या तरुण मनुष्यानें लवकरच गुप्तवेषांत असलेल्या बाबरास ओळखलें व छपविलेली कट्यार बाबराच्या हातांत देऊन तो कांहीं बोलत होता, इतक्यांत बाबरानें विचारलें "तूं कोण आहेस? आणि ही कट्यार मला कां देतोस?"

रजपुताचे डोळे भरून आले. कंठ सद्गदित झाला. तो कांपऱ्या स्वरानें म्हणाला "जहांपना ! आपल्या दुष्मनाचा या कट्यारीनें जीव घ्या ! ह्या कटारीनें आपला जीव घेण्यासाठीं म्हणून मी आज आलों होतों; परंतु दुसऱ्याचा जीव घेण्यापेक्षां दुसऱ्याला जीवदान देणें हेंच माणुसकीचें लक्षण होय, हें मला आपण शिकविलें. या चांडाळाचा जीव घेऊन आपण निर्भय व्हा."

आपला आशय बाबराला कळवून तो तरुण आपल्या छातींत कट्यार खुपसून आपला जीव घेण्याविषयीं बाबराला आग्रहपूर्वक सांगूं लागला. एकंदर प्रकार लक्ष्यांत येतांच बाबराचे डोळेहि भरून आले. त्यानें ती कट्यार फेंकून देऊन त्या तरुणाला छातीसरशी घट्ट आलिंगून सद्गदित स्वरानें म्हटलें "खरोखर भाई ! दुसऱ्याचा जीव घेण्यापेक्षां त्याला जिवदान देणें हेंच चांगलें आहे. परंतु तुझा जीव मात्र मी घेतों. आजपासून त्यावर माझी मालकी झाली आहे. तूं नेहमीं मजबरोबर रहावेंस; तुला मीं माझ्या शरीरसंरक्षकांचा मुख्य अमलदार नेमिलें आहे."

कृतज्ञतेच्या अश्रूजलानें त्या तरुणाच्या अंतःकरणांतील बाबराचा प्राण हरण करण्याचा द्वेषाग्नि विझून गेला. त्या दिवसापासून तो बाबराचा शरीरसंरक्षक ( बॉडीगार्ड ) होऊन राहिला.

या वीर रजपुताची बहादुरी बाबरच्या अनेक प्रसंगीं दृष्टीस पडली. अनेक प्रसंगीं जीवावर उदार होऊन त्यानें बाबराचा जीव वांचविला. बाबराची त्याच्यावर अत्यंत प्रीति जडली.

* * * * *

जो मनुष्य एक दिवस बाबराचा जीव घेण्यासाठीं टपून राहिला होता तो आतां त्याच बाबराचा जीव वांचविण्यासाठीं स्वताच्या जिवावर उदार होऊन झटत होता ! वाचकहो ! आपणच सांगा पाहूं, दुसऱ्याचा जीव घेणें चांगलें कीं दुसऱ्याला जीवदान देणें चांगलें ?



## गोष्ट १५ वी.

# महाराजा देवीसिंह.

बादशहा शिकंदर लोदी याचा वजीर आसरखां कांहीं कारणानिमित्त बुन्दी नगरांत गेला असतां महाराजा देवीसिंहाचा पाथार नामक अत्यंत मनोहर घोडा पाहून त्याच्या मनांत त्या घोड्याविषयीं अनिवार लोभ उत्पन्न झाला. दिल्लीला येतांच आसरखांनें देवीसिंहाच्या घोड्याची बादशहापाशीं फारच प्रशंसा केली. शिकंदर लोदी हा घोड्यांचा मोठा शोकी होता. पुष्कळ पैसे खर्चून दूरदूरच्या देशांतून त्यानें अनेक सुंदर घोडे आणून आपल्या संग्रहीं ठेविले होते. देवीसिंहाच्या पाथार घोड्यासारखा घोडा आपल्या अश्वशाळेंत नाहीं, ही गोष्टच मुळीं तो खरी मानींना. परंतु वजीर निक्षूनच सांगूं लागल्यामुळें बादशहा अत्यंत कुपित होऊन ह्मणाला "तूं ह्मणतोस हें खरें करून दाखीव, नाहींतर तुझा शिरच्छेद करण्यांत येईल !"

मोंगलबादशहांच्या अमदानींत मनुष्याच्या प्राणाची–मग तो मनुष्य केवढाहि मोठ्या योग्यतेचा का असेना–किंमत कांहींच नव्हती, ही गोष्ट इतिहासवाचकांनां अवगतच असेल. बिचाऱ्या आसरखांला आतां असें वाटलें कीं, आपल्याला कुठून ही दुर्बुद्धि सुचली व आपण बाहशहापाशीं महाराज देवीसिंहाच्या घोड्याची प्रशंसा केली !

[ २ ]

वजीर उमरावांनीं परिवेष्टित असा बादशहा शिकंदर लोदी आज दिल्लीच्या सुवर्ण सिंहासनावर विराजमान झाला आहे. भृत्यगण छत्रचामरें घेऊन उभे आहेत. भाटलोक स्तुतिगीतें गात आहेत. स्तुतिपाठक बादशहाच्या नसत्या गुणांचीं स्तोत्रें पढत आहेत. खुषमस्करे आपल्या चातुर्ययुक्त भाषणानें बादशहाच्या चेहऱ्यावर हास्यरेषा उमटवित आहेत. इतक्यांत महमदखां नांवाचा एक अमीर दरबारांत येऊन रीतीप्रमाणें कुरनीस करून बादशहासमोर विनीत भावानें उभा राहिला. हा बादशहाच्या आज्ञेवरून बुंदीच्या राजाला आमंत्रण करण्यासाठीं गेला होता.

बादशहानें विचारलें "महमद ! बुन्दीराजाची काय खबर आहे ?"

महमदखांनें हात जोडून अदबीनें उत्तर दिलें "खुदावंद ! आपण पाठविलेल्या नजराण्याचा महाराज देवीसिंहानें आदरपूर्वक स्वीकार करून आपल्या आमंत्रणाच्या बहुमानाबद्दल तो स्वतास कृतकृत्य मानित आहे. आपल्या हुकुमाप्रमाणें लवकरच इकडे निघण्याची त्यानें तयारी चालविली आहे."

बादशहा वजीराकडे वळून ह्मणतो "आसरखां! आतां घोडा मैदान जवळच आहे. बुन्दीराजाचा घोडा आतां लवकरच येथें येईल. अद्यापिहि तुझें तेंच मत कायम आहे?"

आसरखां मस्तक नमवून ह्मणाला "हुजूर! गुलामाला बेअदबी माफ असावी. माझें सदासर्वकाळ तेंच मत आहे आणि राहील. बुन्दीराजाच्या घोड्याची सर आपल्या अश्वशाळेंतील एकाहि घोड्याला यावयाची नाहीं!"

"माझा नबाब नांवाचा घोडा त्याहून कमी आहे?"

"जी हुजूर!"

आतांतर बादशहा अधिकच क्रोधायमान होऊन ह्मणाला "आणि गुदस्तां इराणच्या बादशहानें जो घोडा पाठविला आहे तो तुझ्या लक्ष्यांत आहे?"

"होय खुदावंद! तो मीं पाहिला आहे; आपल्या अश्वशाळेंतील एकूनएक घोडे माझ्या चांगल्या माहितीचे आहेत. बुंदीराजाच्या घोड्याची बरोबरी करील असा एकहि घोडा आपल्या संग्रहीं नाहीं!"

बादशहा किंचित्काल स्तब्ध राहून ह्मणाला "ठीक आहे. लवकरच काय तो निर्णय होईल. पण लक्ष्यांत ठेव, तुझें ह्मणणें खोटें ठरल्यास तुझी गर्दन उडविली जाईल. कधींहि क्षमा व्हावयाची नाहीं!"

वजीरानें खिन्नमुद्रेनें उत्तर दिलें "जशी हुजुरची मर्जी!"

[ २ ]

आज आठ दिवस झाले. महाराजा देवीसिंह दिल्लीला आला आहे. बादशहा शिकंदर यानें त्याचें उत्तम आदरातिथ्य चालविलें आहे. दररोज सकाळसंध्याकाळ बुन्दीराजाच्या समाचारासाठीं दरबारचे मोठमोठे उमराव येत आहेत. खुद्द बादशहाहि दोनदा महाराजाच्या निवासस्थलीं येऊन देवीसिंहाला भेटून गेला होता.

आज देवीसिंहाच्या चोपदारानें वर्दी दिली कीं "वजीर आसरखां आपल्या भेटीची इच्छा करित आहेत."

महाराजानें "येऊं द्या" ह्मणतांच थोड्या वेळानें आसरखां आंत येऊन सलाम करून बसला. देवीसिंहानें विचारलें "वजीर, काय खबर आहे?"

आसरखां ह्मणाला "आपण बादशहाच्या विनंतीला मान देऊन दिल्लीला येऊन भेटीचा लाभ दिला, याबद्दल बादशहाला फार आनंद झाला आहे. आणि आपल्याला कसलाहि त्रास न पोंचावा ह्मणून इकडील व्यवस्था स्वनेत्रांनीं अवलोकन करण्यासाठीं त्यांनीं मला मुद्दाम पाठविलें आहे."

देवीसिंहानें उत्तर केलें "बादशहाचे हे मोठे उपकार आहेत. मजविषयीं एवढी काळजी घेत असल्याबद्दल मी फार फार आभारी आहें व मला कसलीच अडचण होत नाहीं, सर्व उत्तम आहे, असें त्यांस कळवा."

आणखी कांहीं गोष्टी झाल्यावर आसरखां हंसतहंसत ह्मणाला "आपला पाथार घोडा पाहून बादशहा फार संतुष्ट झाले."

"हें ऐकून मला फारच आनंद होत आहे! माझा पाथार तसेंच सुंदर जनावर आहे. माझ्या सार्‍या राज्याहूनहि तो मला अधिक प्रिय आहे."

आसरखां पुनः ह्मणाला "बादशहाला घोडा फारच पसंत पडला."

आसरखांला वाटलें होतें कीं, आपल्या भाषणाचा इत्यर्थ लक्ष्यांत आणून महाराजा देवीसिंह आपण होऊनच आपला पाथार घोडा बादशहाला नजर करील. परंतु आसरखांचा तो समज अगदींच चुकीचा होता. देवीसिंह ह्मणाला "जव्हेर्‍याच्या प्रशंसेनेंच जवाहिराची किंमत होते."

आतां आसरखांच्यानें आपला कुटिल स्वभाव स्पष्टपणें व्यक्त केल्याविना रहावेनाच. तो अधिकच हास्यमुद्रा करून ह्मणाला "बादशहाच्या मनांत तो घोडा फारच भरला आहे. आपल्यापासून तो विकत घेण्यासाठीं मी आलों आहें. काय किंमत घ्याल?"

हें अभद्र भाषण श्रवण करतांच महाराजा देवीसिंह रक्तासारखा लाल झाला. कर्कशस्वरानें त्यानें उत्तर केलें, "जा, आणि बादशहाला सांगा कीं, पाथारला मी कधींहि विकणार नाहीं!"

आसरखांहि दिमाखानें ह्मणाला "महाराज! बादशहाला असा अपमानकारक जबाब देणें हें आपल्याला उचित आहे काय? स्वसंतोषानें द्याल तर त्यांत तुमचीच शोभा आहे. नाहींतर बादशहानें बलपूर्वक घोडा न्यावा, यांत भूषण काय?"

हें वाक्य ऐकतांचतर देवीसिंह अधिकच चवताळला. आसरखांचा धिक्कार करून तो ह्मणाला "या देहांत प्राण असेपर्यंत बादशहा पाथारच्या केसालाहि स्पर्श करूं शकणार नाहीं, हें खूप समजा. बादशहाला कळवा कीं, क्षत्रिय मृत्यूला डरत नाहीं!"

आसरखां विकट हास्य करित ह्मणाला "महाराज! आपण मलातर अगदींच वेडे दिसतां! देहांत प्राण असेपर्यंत आपण घोडा देणार नाहीं ह्मणतां खरे, परंतु देहांत प्राण किती वेळपर्यंत टिकेल याचा विचार करा! सिंहाच्या गुहेमध्यें बसून

सिंहाबरोबर युद्ध करण्याचा मूर्खपणा कोणींहि शहाणा करणार नाहीं! व्यर्थ प्राणहानि करण्यांत कोणता पुरुषार्थ आहे? नखाच्या गोष्टीला कुऱ्हाडी व तरवारी कशाला?"

आसरखांचा हा युक्तिवाद कांहीं खोटा नव्हता. बुंदीराजासहि त्याची सत्यता माहीत होतीच. पण पाथार ही देण्याजोगी वस्तु नव्हे. पुढें काय करावें, या विचारांत देवीसिंह पडला. देवीसिंह कांहींच बोलत नाहीं असें पाहून शेवटीं आसरखांच ह्मणाला "महाराज! बादशहाला काय सांगूं?"

बुंदीराज ह्मणाला "ठीक आहे. आजपासून पंधरा दिवसांनीं मी स्वतांच घोडा घेऊन बादशहापाशीं हजर होईन."

[ ४ ]

कांहीं वेळानें वजीर निघून गेला. बुंदीराज आतां मोठा चिंतातुर होऊन आपल्या उद्धाराच्या मार्गाविषयीं विचार करूं लागला. तो स्वताशीं ह्मणाला "प्राणांहूनहि प्रिय असलेला पाथार घोडा कांहीं आपण बादशहाला देणार नाहीं; परंतु न देऊनहि सुटका नाहीं. प्राणरक्षा होणें असंभवनीय आहे! मीं संतोषानें न दिल्यास बादशहा जबरीनें घोडा घेऊन जाईल, हें आसरखांचें ह्मणणें यथार्थ आहे. मीतर सांप्रत सिंहाच्या गुहेंतच येऊन पडलों आहें. पळून जाण्यासहि मार्ग नाहीं. पाथारला घेऊन मी गुप्तरीतीनें पळून जाईन ह्मटलें, तर प्रिय कुमार समर्षीची आणि माझ्या सेनेची काय दशा होईल! सर्वांची क्षणार्धांत कत्तल उडावयाची! कांहींतरी युक्ति लढविण्यासाठीं मीं पंधरा दिवसांची मुदत मागून घेतली आहे खरी! परंतु पंधरा दिवस हांहां ह्मणतां जातील. प्रसंगतर मोठा बिकट येऊन ठेपला आहे, यांतून पार पाडणार प्रभूच समर्थ आहे!"

अशा विवंचनेंत देवीसिंह सचिंत मुद्रेनें बसला आहे इतक्यांत कुमार समर्षि आंत येऊन ह्मणाला "महाराज! बादशहांचा शहाजादा विवाह करण्यासाठीं जाणार आहे. मला तो आपल्याबरोबर बोलावित आहे."

पुत्राच्या मुखांतून हें वर्तमान ऐकतांच बुंदीराजानें उत्सुकतेनें विचारिलें "कधीं जाण्याचें ठरलें आहे? विवाह कधीं व्हावयाचा आहे?"

कुमार ह्मणाला "लग्नाला अद्यापि एक महिन्याचा अवकाश आहे. पंधरा दिवसांच्या आंत आह्मांला इथून निघावें लागेल."

राजाच्या निराश हृदयामध्यें आशेचा संचार झाला. त्याचें कोमेजलेलें मुख प्रफुल्लित झालें. संकटांतून पार पडण्याचा त्याला उपाय सुचला. कुमार समर्षीला आलिंगन देऊन देवीसिंहानें बादशहाच्या वतीनें आसरखांनें केलेल्या धिक्कारपात्र

मागणीची हकीगत त्याला सविस्तर सांगितली आणि सद्गदित स्वरानें ह्मटलें "वत्सा, बादशहाचा शहाजादा तुला लग्नानिमित्य आपल्याबरोबर बोलावित आहे, ही मी ईश्वराची मोठीच कृपा समजतों. नाहींतर आपल्या बचावाचा कांहींच मार्ग नव्हता. तूं आपल्या सर्व सेनेसह शहाजाद्याबरोबर जा. बाकी राहिलेल्या लोकांस मुसलमान वेषानें मी शहराबाहेर काढतों आणि मीहि माझी प्रतिज्ञा पूर्ण करून तुमच्या मागोमाग येतों."

ठरल्याप्रमाणें बुन्दीराजाच्या सर्व सैन्यासह कुमार समर्षि शहाजाद्याबरोबर निघून गेला. बुन्दीराजानें मनांत आणिलें असतें तर तोहि घोड्यासह पळून जाऊं शकला असता; परंतु त्यानें बादशहाला वचन दिलें होतें कीं "मी पंधरा दिवसांनीं घोड्यासह आपल्या सेवेला हजर होईन." रजपूत वीर सत्यवचनी असतात, प्राणाचीहि पर्वा न करितां ते आपलें वचन पाळण्यास झटत असतात, हें इतिहासावरून सर्वांनां कळून चुकलेंच आहे. बुन्दीराजहि त्याप्रमाणेंच सत्यवचनी होता व ह्मणूनच तो आपलें वचन पुरें करण्यासाठीं जिवावर उदार होऊन बादशहाचा बंदिवान् होऊन अद्यापि दिल्लींत राहिला होता.

[ ५ ]

आज पंधरावा दिवस. वचनाप्रमाणें आज पाथारसह बादशहाच्या दरबारीं गेलें पाहिजे. बुन्दीराजानें प्रातर्विधि, स्नान, देवपूजा वगैरे आह्निक उरकून वीरोचित पोषाख धारण करून तो आपल्या प्रिय पाथार घोड्यावर स्वार झाला. आपल्या राज्यांतील जे थोडेसे लोक आतां त्याचेबरोबर राहिले होते त्यांनां मुसलमानी वेषानें नगराबाहेर पळून एकदम कूच करण्यास त्यानें आज्ञा केली व आपण दरबारीं जाऊन "पाथार घोडा घेऊन बुन्दीराज भेटण्यासाठीं आला आहे" अशी बादशहास वर्दी देण्यासाठीं चोपदारास आंत पाठविलें.

बादशहाहि उत्सुकतेनें बुन्दीराजाच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करित होता. पाथार दृष्टीस पडतांच बादशहाचे डोळे दिपून गेले होते व तो आपल्या संग्रहीं बाळगण्याविषयीं त्याच्या अंतःकरणांत अनिवार लालसा उत्पन्न झाली होती. बिचाऱ्या आसरखांची गर्दन शाबूत राहून त्यानें असा तेजस्वी घोडा दाखवून दिल्याबद्दल त्याला मोठी थोरली जहागीर प्राप्त झाली होती! देवीसिंहानें पंधरा दिवसांची मुदत मागितली होती त्याबद्दल बादशहाला फार घुस्सा आला होता; परंतु आसरखानें बादशहाची कशीबशी समजूत घालून त्याला पंधरा दिवस धीर धरावयास लाविलें होतें. आज शेवटचा दिवस. आज सकाळपासूनच बादशहाला

सारखी तळमळ लागून राहिली होती. देवीसिंह येतो कीं नाहीं अशी कुशंका क्षणोक्षणीं त्याच्या चित्ताचा स्वास्थ्यभंग करित होती. इतक्यांत ठरल्याप्रमाणें देवीसिंह हजर झाला. हें पाहून बादशहाला परमानंद होऊन त्याला सन्मानपूर्वक आंत आणण्यासाठीं खुद्द बादशहा सिंहासनावरून उठून बाहेर आला. बुन्दीराज सलाम करून ह्मणाला "माझ्या वचनाप्रमाणें घोडा घेऊन मी हजर झालों आहें."

घोडा पाहून बादशहा अत्यंत प्रसन्नमुद्रेनें ह्मणाला "बुन्दीराज! आपल्या या भेटीबद्दल मला फार आनंद झाला आहे. आपल्याला मी याचा योग्य बदला देईन. आजपासून आपण साऱ्या राजपुतान्याचे—"

परंतु बादशहाच्या भाषणाकडे मुळींच लक्ष्य न देतां महाराज देवीसिंह मध्येंच ह्मणाला "बादशहा! माझी एक गोष्ट नेहमीं ध्यानांत वागवा कीं, रजपूत लोकांकडे तीन वस्तु कधींहि मागूं नयेत! स्त्री, घोडा आणि तरवार—"

देवीसिंह घोडा दाखविण्याकरितां बादशहाला बाहेर घेऊन आला. आणि घोड्याच्या पुठ्यावर थाप मारून त्याची चाल दाखविण्याच्या मिषानें त्यावर स्वार झाला. घोड्यालाहि तेवढा इषारा पुरे झाला. बोलतांबोलतां देवीसिंहाचा घोडा वायुवेगानें उड्डाण करून आपल्या धन्यासह क्षणार्धांत अदृश्य झाला!



## गोष्ट १६ वी.

# जानकी बाई.

### [ एकांकी नाटक. ]

[ **स्थल**—ठाणें येथील एक बंगला. दिवाणखान्यांत एक वाटोळें मेज असून त्याचे सभोंवार समोरासमोर दोन खुर्च्या आहेत. खिडकीजवळ एक मोठी आरामखुर्ची असून भिंतीशीं एक लिहिण्याचें टेबल आहे. त्याचेजवळ एक खुर्ची, व टेबलावर लिहिण्याचें सर्व सामान व एका कागदाच्या डब्यांत विलायती विड्या, आगपेटी वगैरे जिनसा आहेत. दिवाणखान्याच्या एका भिंतीला मध्यभागीं एक मोठें थोरलें घड्याळ कांचेचें चौकटींत बसविलें आहे. दिवाणखान्यांतून निजावयाचे खोलींत जाण्यास एक दार असून तें अर्धवट उघडें आहे; **पात्रें**—रघुनाथराव व जानकीबाई; **वेळ**—रात्रीच्या नवांचा सुमार. ]

**जानकीबाई**—( दिवाणखान्यांत वाटोळ्या मेजाजवळचे एका खुर्चीवर बसून हातानें लोंकरीचें विणकाम करण्यांत गढून गेली आहे. घड्याळाकडे पाहून ) अग बाई, अक्रा वाजायला झाले ! ( जरा त्रासानें ) अक्रा, अं ! आणि अजून—( इतक्यांत जिन्यांत पावलें वाजतात ) येणं झालं वाटतं ! ( काम करण्यांत अगदीं गढून गेली आहे असें दाखविते. )

**रघुनाथराव**—( जिन्याचे दारांतून लगबगीनें आंत शिरून जानकीबाईच्या मुखाचें चुंबन घेण्याच्या आविर्भावानें तिच्या खुर्चीच्या मागें जाऊन तिच्या हनुवटीखालीं हात घालतो. ती मानेला हिसडा देऊन वर न बघतां काम करिते. रघुनाथराव जरा चकित होऊन तिचेकडे पहातो. जानकीबाई रागानें हातांतील काम मेजावर आपटून खुर्चीवरून उठते. रघुनाथराव तिचा हात धरण्याचा प्रयत्न करितो.)

**जा०**—मला जाऊं द्या. माझ्या अंगाला हात लावण्याचं कारण नाहीं, सांगतें ! ( मोठ्या झणकाऱ्यानें पाय आपटित खोलीच्या दरवाजाजवळ जाते. रघुनाथराव चकित मुद्रेनें तिचेकडे पहात रहातो. जानकीबाई खोलीचा दरवाजा उघडित रागानें ) आपल्याला माझी आतां कांहीं जरूर नाहीं, समजलं ! ( खोलींत शिरते. रघुनाथराव तिचे मागोमाग खोलींत जाण्याकरितां दरवाजापर्यंत जातो, तों दरवाजा जोरानें लागतो. )

**रघु०**—(मेजाजवळ परत येऊन खुर्चीवर बसतो व आश्चर्यकारक मुद्रेनें स्वगत) आज हें काय लचांड! हिला एवढा राग यायला काय झालें! कदाचित् ती विनोद करित असेल! (असें मनांत येऊन ती खोलींत काय करिते हें पहाण्याच्या इच्छेनें उठून दरवाजाच्या फटीशीं कान देतो. आंतून कांहीं आवाज येत नाहीं. आतां आपल्यावर मोठा घसरा होणार अशा भीतियुक्त मुद्रेनें खिडकीजवळ जाऊन आरामखुर्चीवर पडतो व शेजारीं पडलेलें वर्तमानपत्र उघडून जणूंकाय कांहींच झालेलें नाहीं असें दाखविण्याच्या मिषानें तें वाचण्यांत गुंग होतो.)

**जा०**—(हळूच दरवाजा उघडून रघुनाथरावांच्या खुर्चीमागें उभी राहून) आतां असंच माझ्याशीं वागायचं ना?

**रघु०**—(आश्चर्यानें तिचेकडे पहातो.)

**जा०**—सारा दिवसभर मेली एकसारखी माणसांनीं वाट पहात बसावं, कशासाठीं? तर संध्याकाळीं लवकर येणं होईल व जरा आनंदानं वेळ जाईल ह्मणून. पण—

**रघु०**—(खुर्चीवरून उठण्याच्या बेतांत आहे—)

**जा०**—नाहीं, नाहीं, कांहीं उठण्याची गरज नाहीं. मी मेली कशाला लोकांच्या वाचनांत अडथळा आणूं? दिवसभर बाहेर गेल्यामुळं आतां त्रास झाला असेल व जरा स्वस्थपणं पडावंसं वाटत असेल, हें मला चांगलं समजतं बरं!

**रघु०**—(कांहीं बोलण्याचा प्रयत्न करितो—)

**जा०**—मला मेलं वाईट इतकंच वाटतं कीं, मी कशाला इतका वेळ वाट पहात बसलें? मला जर असं ठाऊक असतं कीं, इकडे पहांट होईपर्यंत येणं व्हायचं नाहीं, तर—

**रघु०**—(घड्याळाकडे पहातो—)

**जा०**—कांहीं त्या घड्याळाकडे पाह्यला नको! तें वरंच मागं आहे—

**रघु०**—(खिशांतील घड्याळ बाहेर काढतो—)

**जा०**—(त्याच्या हातांतील घड्याळावर हात ठेवून) पण हें घड्याळतरी पहाण्याची काय गरज? माणसाला वेळाची पर्वा असेल तर ना? इकडे जोंपर्यंत स्वताची चैन चालली आहे तोंपर्यंत बारा काय, एक काय, दोन काय, नि चार काय सगळे सारखेच!

**रघु०**—(बसल्याबसल्या मागें वळून तिच्या खांद्यावर हात ठेवून बोलणार, इतक्यांत—)

**जा०**—इतका वेळ माणसाला तिष्ठत ठेवण्यांतच इकडे मौज वाटते, हें मला कळत का नाहीं? उद्यां संक्रांतीचा दिवस आहे याची इकडे आठवणसुद्धां नसेल, परंतु मला चांगली आठवण आहे!

**रघु०**—पण—

**जा०**—समजलं, आलं माझ्या ध्यानांत कांहींतरी थाप मारून मला फसवायचं असेल!

**रघु०**—( गालांतलेगालांत हंसतो—)

**जा०**—हें काय मेलं असं? लोकांचा जीव चालला आहे नि अशा वेळीं इकडे हंसणं शोभतं तरी का?

**रघु०**—( मोठ्यानें हंसतो—)

**जा०**—हं, आतां समजलें कां इतका उशीर झाला तो! मुंबईहून निघाल्यावर गाडींत ते मेले बाबुराव भेटले असतील; त्यांनीं केला असेल फार आग्रह रस्त्यांत उतरण्याचा; आणि ह्मणून वन्संबाईंच्या घरीं आज जाणं झालं—

**रघु०**—( एकदम चकित होतो—)

**जा०**—छेः, अगदीं खात्रीनं तिथंच जाणं झालं! आतां नाहीं ह्मणण्यांत काय हंशील आहे? तिथं जाणं झालं असेल, मग त्या कजाग मावशीनं आपल्या भोंवतीं नाचून आपल्याला अगदीं भारून टाकलं असेल, चांगलं चमचमीत जेवायला वाढलं असेल आणि मग इकडे काय! घरची अगदीं आठवणसुद्धां राहिली नाहीं. मला माहिती आहे ती कशी कौचालं करील ती!

**रघु०**—( हातांनीं नाहीं नाहीं, असें खुणावून आतां बोलणार इतक्यांत—)

**जा०**—आलं—आलं लक्ष्यांत आतां काय सांगणार तें, कीं मुंबईत एक मोठी सभा होती तिला गेलों होतों–तिथं अमका साहेब असं बोलला–तमका तसं बोलला, स्त्री–शिक्षणाबद्दल अशीं भाषणं झालीं, बायकांनां स्वतंत्रता देण्याबद्दल असंअसं लोक बोलले–ह्याच थापा मला बरं वाटावं ह्मणून आतां मारायच्या असतील!

**रघु०**—( आश्चर्यकारक मुद्रेनें पहातो– )

**जा०**—माझ्या बोलण्याचा आपल्याला कंटाळा का येतो? आणि तिकडे वन्संकडे जाऊन जेव्हां गोडगोड गोष्टी चालल्या असतील तेव्हां त्याचा नाहीं वाटतं त्रास होत!

**रघु०**—( हातानेंच छे छे, असें नव्हे, अशा खुणा करतो– )

**जा०**—नाहीं नाहीं. मी ह्मणतें तेंच खरं–

**रघु०**—( किंचित हंसून मानेनेंच नाहीं नाहीं अशी खूण करतो– )

**जा०**—दुसऱ्यांजवळ चांगलं रीतीनं वागायचं आणि मींच काय मेलीनं असं पाप केलं आहे ? ( असें ह्मणून रडण्याचा हुंदका काढून पलीकडच्या खिडकीशीं जाऊन बाहेर पहात उभी रहाते. )

**रघु०**—( खुर्चीवरून उठून तिच्याजवळ जातो व लाडानें खांद्यावर हात ठेवणार इतक्यांत—)

**जा०**—( मोठ्या झणकाऱ्यानें खांद्याला हिसडा देऊन ) माझ्याजवळ कुणी आतां यायलाहि नको, नि बोलायलाहि नको ! खबरदार माझ्या अंगाला कुणी हात लावला तर ! ( रडत ) मी काय मेली बटीक. घातलेल्या अन्नाची अन् सांगितलेल्या कामाची ! आह्मांला मेल्या बायकांनां कांहीं मान का आहे ?

**रघु०**—( बोलण्याकरितां अगदीं तोंड उघडतो इतक्यांत —)

**जा०**—आपली मर्जी राखायची ह्मणजे त्या वन्संबाई करतात किनई तसं आपण आल्याबरोबर अगदीं आपल्याभोंवतीं घिरट्या घालायला हव्या ! काय मेली नाचतेतरी 'माझा दादा आला, माझा दादा आला ' ह्मणून ! जणूं काय कुणाला वाटेल कीं, दादाशिवाय हिला अगदीं क्षणभरसुद्धां करमत नाहीं ! अन् इकडे काय मग पाह्यला हवं ! माझी यमू ह्मणजे काय अगदीं देवाच्या घरची लक्ष्मी ! ( हातांनीं ओंवाळते. )

**रघु०**—( मानेनें नाहीं असें खुणवितो– )

**जा०**—अहाहाहा ! जसं काय त्या गांवचेच आपण नाहीं ! असं ह्मणून चालेल कसं आतां ? मग मला असं सांगावं कीं, इकडे जर वन्संचा व बाबुरावांचा ओढा नाहीं, तर मागच्या दुखण्यांत बारा न् बारा चोवीस तास तीं नवराबायको इथं उशापायथ्याशीं कां बसत असत ? ओढा नाहीं ह्मणायचा तर मग इतकी कां काळजी ? वन्सं आणि मीसुद्धां लहानपणीं एके ठिकाणींच खेळत असूं. मग ती बया माझेजवळ कां नाहीं असे नखरे करीत ? आणि इकडे मात्र बरी एकसारखी साखर पेरित असते ती ?

**रघु०**—( मी काय ह्मणतों तें ऐक तरी ! अशा अर्थानें तिला खूण करतो–)

**जा०**—सकाळीं दहा वाजतां जेवून जायचं झालं, तेव्हांपासून मेलं उन्हानं त्रास झाला असेल, भूक लागली असेल, अशा एकनादोन, हजारों आठवणी काढून एकसारखी काळजी करित मी इतकी रात्र होईपर्यंत वाट पहावी–आतां येणं होईल, मग येणं होईल–ही गाडी चुकली असेल, दुसरीला आतां खचित यायचं होईल–

दुसरीला नाहीं, आतां तिसरीलातर अगदीं खास यायचंच ! असे एकसारखे वाटेकडे डोळे लावून मी मेली बसलें, आणि इकडेतर तें गांवींसुद्धां नाहीं ! ( हुंदका आणून ) कायरे देवा, आह्मीं पाप केलं? कीं आह्मीं अगदीं जीव तोडतोडून इकडची मर्जी राखावी आणि इकडे— ( जास्तच रडूं लागते. )

रघु०—( दिवाणखान्यांत आल्यापासून बायकोच्या एकसारख्या टांकीनें बोलण्याची मुळींसुद्धां संधी मिळाली नव्हती, ती जानकीबाईच्या आतांच्या रडण्यानें मिळणार, या आनंदाचे भरांत बोलण्यासाठीं अगदीं ओंठावर शब्द आले इतक्यांत–)

जा०—( एकदम रडें थांबवून ) काय मेल्या गारुडं करतात तरी इकडे भुरळ पाडायला !

रघु०—( बोलण्यासाठीं केलेला प्रयत्न निष्फळ झालेला पाहून निराशेनें भिंतीजवळ ठेवलेल्या टेबलाजवळ जाऊन खुर्चीवर बसतो. )

जा०—( त्याचे मागोमाग खुर्चीजवळ जाऊन टेबलाला टेंकून त्याचेकडे तोंड करून उभी रहाते. ) काय मेलं नवलतरी बाई ! बाबुराव ते काय आणि त्याच्या भारणीनं वेड लागण्यासारखं आहेतरी काय ?

रघु०—( आश्चर्यानें चकित झाल्यासारखी मुद्रा करतो– )

जा०—आपल्याला नवल का वाटतं? माझी आजीसुद्धां मला वारंवार ह्मणते कीं 'गंगू, त्या तुझ्या वन्सं आणि ते बाबूराव इकडे जळूसारखे चोखून खातील' ह्मणून.

रघु०—( तिचेकडे पहातो– )

जा०—आपल्याला खोटं का वाटतं ? खरोखरच आजी मला असं नेहमीं सांगते हो, पण मींच तें अजून इकडे सांगितलं नव्हतं ! ह्मटलं, बहिणभावंडांचं चांगलं प्रेम पाघळतंय त्यांत मी कशाला बाई उगीच बिब्बा घालायला जाऊं ? आतां आपलं ओघालाच आलं ह्मणून सहज सांगतें.

रघु०—( जरा त्रास आल्यासारखें दाखवतो– )

जा०—माझ्या बोलण्याचा आपल्याला त्रास का आला ? चुकलें हो; पदर पसरतें, एकवार क्षमा करावी; पुन्हा नाहीं वन्संच्या उलट एक अवाक्षर काढणार तोंडावाटे ! एकसारखे त्यांचे व बाबूरावांचे पोवाडेच गाईन बरं का ! खुशाल त्यांनीं नवराबायकोची ताटातूट करावी–इकडे जळूसारखं चुंबूनचुंबून खावं–माझ्या संसाराचा चिवडा करावा–मी अगदीं नाहीं उलट बोलणार ! माझी कांहीं तक्रार नाहीं ! पाठीला पाठ लावून आलीं आहेत तेव्हां असं होणारच ! ( रडूं लागते. )

**रघु०**—( पुन्हा एकवार बोलण्याची संधी आली असूनहि कांहीं न बोलतां आपल्या लाडक्या बायकोच्या तोंडाकडे पहात स्तब्ध बसतो. )

**जा०**—इकडची क्षमा मागितली तेवढी नाहीं वाटतं पुरली? बरं आहे. उजाडलं ह्मणजे मला तिकडे घेऊन जायचं, आणि मग वन्संच्या पुढं नाक घांसून त्यांचेपुढं पदर पसरीन, आणि त्यांनां सांगेन कीं, हें तुह्मी चांगलं करतां ह्मणून! मगतरी डोळे निवतील ना? आपली बायको पायां पडलेली पाहून आनंद होईल ना? ( बराच वेळ एकसारखी बोलण्याच्या त्रासानें दमून जरा स्तब्ध नवऱ्याकडे पहात उभी रहाते. )

**रघु०**—( संधी नंबर ३. बोलावें कीं नाहीं या विचारांत आहे तोंच- )

**जा०**—बरं चालवलं आहे! मी मात्र मेली इकडे येणं झाल्यापासून एकसारखी विचारतें आहें, पण एक चकार शब्द तोंडांतून निघेल तर शपथ!

**रघु०**—( अगदीं ओंठांवर शब्द येतात इतक्यांत- )

**जा०**—नको, एक शब्दसुद्धां नको, अगदीं नको! मला अगदीं ऐकायला नको!!

**रघु०**—( उठून तिच्या अगदीं जवळ येतो व तिच्या गळ्यांत टाकण्यासाठीं हात पुढें करितो तोंच- )

**जा०**—कां, आतां बोलून नाहीं माझी समजूत होत तेव्हां अंगावर हात टाकण्याची पाळी आली अं? हं चालूंद्या. खुश्शाल मारा. कुणी हात धरित नाहीं, समजलं? एक जल्म पदरीं पडलें आहें, तेव्हां काय सोहाळे व्हायचे असतील ते होऊंद्या! ( रडूं लागते. )

**रघु०**—( गोष्ट अगदीं निकरावर आली; आतां बायको जरा शांत होईपर्यंत येथें असूंच नये, अशा विचारानें बाहेर जाण्याकरितां दरवाजाजवळ जातो. )

**जा०**—कां, आतां माराला कोण भ्यालं? दार लावण्यासाठीं कांहीं इतकं जायला नको! मला मार बसला ह्मणून मी गडी माणसांनां नाहीं हांक मारणार वरं!

**रघु०**—( परत येतो. )

**जा०**—आपण मला अजून ओळखली नाहीं. मी तशांतली नाहीं हो बायको! मारणं झालं तरी मी गडी माणसांनां नाहीं हो हांक मारायची. त्यांनां हांक मारून तरी बायकोला कसं वागवायचं होतं हेंच सगळ्या गांवभर होणार किं नाहीं?

**रघु०**—( कांहीं झालें तरी बोलावयाचें ह्मणून नाहीं असा बेत करून पुन्हा टेबलाजवळ जाऊन स्वस्थ बसतो. )

**जा०**—आपलेच पोवाडे सर्व गांवभर ते गात बसणार किं नाहीं?

रघु०—( तिचेकडे एकदा तिरस्कारानें पाहून वर छताकडे पहात बसतो. )

जा०—मी काय बोलतें तें ऐकायलातरी येतंय का ?

रघु०—( एकेलें न ऐकलेंसें करून वर्तमान पत्र घेऊन तिचेकडे पाठ करून वाचण्यांत गुंग होतो. )

जा०—माझेजवळ बोलायचंसुद्धां नाहीं अं? मी त्या कागदाच्या कपट्यापेक्षांसुद्धां कवडीमोल झालें ना ? खरं लपवायची ही बरी युक्ति सांपडली ! ( त्याच्या समोर जाऊन उभी रहाते व वर्तमान पत्र ओढून घेते. ) दुसरं एखादं कुणी असतं तर आपली बायको दोन लाडाचे शब्द ऐकण्यासाठीं आपली इतकी विनवणी करते, असं पाहून तिची समजूत केल्याशिवाय रहातंच ना. तिला मांडीवर घेऊन तिचे मुके घेऊन, तिला गोंजारून, तिचे डोळे पुसून पुरेवाट केली असती. माझ्यावर जिवापेक्षां जास्त प्रीति करतों असं ह्मणायचं मात्र आणि एक फुकाचा गोड शब्दसुद्धां तोंडांतून निघूं नये ? ( डोळ्यांत पाणी आणते. )

रघु०—(न बोलण्याबद्दल केलेले बेत बायकोच्या डोळ्यांतील पाणी पाहून सर्व ढांसळून जाऊन तिचें मनगट धरतो व बोलण्यास सुरुवात करणार तोंच–)

जा०—आणि बरं, मीतरी विचारतें काय कीं इतका यायला उशीर कां झाला, इतकंच ना ?

रघु०—( तिला आपलेकडे ओढतो– )

जा०—आणि वाटेकडे एकसारखे डोळे लावून बसूनबसून मी अगदीं दमून गेलें हेंच ना मीं आपल्याला सांगितलं ?

रघु०—( जबाब देणार तोंच–)

जा०—मेले बारा वाजले, आतां यापुढं माणसानं किती बरं वाट पहावी ?

रघु०—( वरप्रमाणेंच– )

जा०—कालच नाहीं का मला सांगायचं झालं कीं उद्यांपासून मी सातांचे गाडीला खास येईन ह्मणून ?

रघु०—( पुन्हा तसेंच– )

जा०—इतका उशीर झालेला पाहून कशी बरं नाहीं माणसाला भीति वाटणार ?

रघु०—( सदर– )

जा०—आणि काळजी लागणार ?

रघु०—( तोच नमुना– )

जा०—दिवसभर मेले श्रम करायचे, तेव्हां रात्रींतरी नको का जरा विसांवा?

**रघु०**—( कित्ता- )

**जा०**—आणि मीं जर नाहीं इकडे सुख दिलं, तर मग मी मेली असूननसून सारखीच !

**रघु०**—( इतका वेळपर्यंत एक शब्दहि बोलण्यास अवकाश मिळाला नाहीं तेव्हां निराशेनें अगदीं काकुळतीनें तिच्याकडे पहातो. )

**जा०**—एक शब्दसुद्धां बोलायचा नाहीं, इतका का माझा राग आला ? ( रडूं लागते.) आईबापांनीं पदरीं बांधली आहे तेव्हां कशीतरी गोड मानून घ्यावी. आमचं काय मेलं बायकांचं ? पुरुष वागवतील तसं वागायचं आमच्या कपाळींच लिहिलेलं आहे !

**रघु०**—(तिची समजूत करण्याकरितां ह्मणून तिचा दुसरा हात धरण्याकरितां आपला हात पुढें करतो तोंच- )

**जा०**—( दोन्ही हातांस हिसडा मारून ) मला सोडायची, हां ! अशी माझी गुळमुळीत समजूत नाहीं मला खपायची ! मी हीं सगळीं ढोंगं समजतें ! कळलं? कुणीकडूनतरी मला रडवायची ! आतां झाली ना आपली हौस पूर्ण ? का आणखी कांहीं हवं दुसरं ?

**रघु०**—(बोलण्यासाठीं उतावीळ झालेला, परंतु संधी मिळत नाहीं असें पाहून उठतो व लांब अंतरावरच्या खिडकीशीं जाऊन बाहेर पहात उभा रहातो.)

**जा०**—झालं. आतां असंच माझ्याशीं वागायचं ना ? (मोठ्यानें गळा काढून) देवा ! कशाला रे मला जल्म दिलास ? आजपर्यंत चांगली प्रेमानं वागविली, पण आतां पुढं कसेरे देवा दिवस दिसणार ? यापेक्षां मरण कांरे नाहीं येत ? ( वरील शब्द उच्चारित खोलींत जाऊन धाडकन् पलंगावर अंग टाकते. )

**रघु०**—(आतांपर्यंत खिडकीजवळ उभा होता, तो जानकीबाई आंत गेलेली पाहून जरा सुस्कारा टाकून सौभद्र नाटकांतील 'भ्रुकुटि वक्र करुनि बघत, गाल लाल सर्व होत' हें पद आपल्याशींच पण जानकीबाईस ऐकूं जाई अशा रीतीनें गातगात भिंतीजवळचे टेबलाशीं येतो व खुर्चीवर बसून टेबलावर आपल्या गाण्याचा ताल धरतो- )

**जा०**—( खोलींतून फणफणत रागानें बाहेर येते व रघुनाथराव टेबलावर वाजवित होता तेथें तोऱ्यानें येऊन टेबलाशीं टेंकून उभी रहाते) वाहवा ! माझ्या जिवाचे चांगले धिंडवडे चालवले आहेत ! माझा विचारीचा विचारतांविचारतां घसा फुटला, त्याला हाच जवाब ना ?

**रघु०**—( शांतपणानें खुर्चीवरून उठतो व टेबलावरची एक विडी व आगपेटी घेऊन पुन्हा खिडकीशीं उभा राहून ती पेटवितो, व तोंडानें धुराचे मोठाले लोट सोडित व त्यांचीं कडीं बनून तीं वर कशीं जातात तिकडे पहात स्वस्थ उभा रहातो- )

**जा०**—आतां इतकीतरी कृपा करावी-माझ्या घरांत ती विडी नाहीं ओढायची! मला नाहीं ती मेली घाण आवडत. कालच त्या मेल्या विडीनं इतकी थोरली सतरंजी जळाली, आणि मागं एकदा ती चादर जळाली, तिची नाहीं का आठवण? ( असें ह्मणून पतीजवळ जाऊन त्याच्या तोंडांतील जळकी विडी काढून घेऊन ती खिडकींतून बाहेर फेंकून देते. )

**रघु०**—( पुन्हा टेबलाजवळ जाऊन दुसरी विडी घेऊन ती पेटवितो व दुसऱ्या खिडकीशीं जाऊन उभा रहातो. )

**जा०**—द्या, मला जेवढा त्रास द्यायचा असेल तेवढा या जल्मांतच द्या! जेवढे हाल करायचे असतील तेवढे करा. मेल्यांनों! विडीचा धूर मला आवडत नाहीं तर ती आधीं—( मुळमुळ रडत वाटोळ्या मेजाजवळ जाते व खुर्चीवर बसून व मेजावर कपाळ टेकून ) माझी लाडकी! माझी लाडकी! असं दररोज तोंडानं ह्मणायचं मात्र! मागं मला कबूल करायचं कीं, तुला संक्रांतीला हांतरीच्या वांकी आणीन ह्मणून! मी मेली आज अगदीं आशेनं वाट पहात होतें, आणि इकडे आपली भलतीच तऱ्हा!

**रघु०**—( तिच्याजवळ जातो व खिशांतून वांकीचा जोड काढून तिचा उजवा हात धरून त्यांत एक घालण्याचा प्रयत्न करितो- )

**जा०**—( डोकें वर उचलून व रघुनाथरावाच्या हातांत वांकींचा जोड पाहून आनंदानें एकदम उठून त्याचे गळ्यास मिठी मारते. ) खरोखरच का वांकी आणायच्या? आणि हे कोण मेले प्राण घ्यायचे लाड हे! हें मला अगोदरच सांगितलं असतं तर नसतं का चाललं? इतक्यासाठींच मुंबईत वेळ मोडला अं? आणि मी मेली उगीच नाहींनाहीं त्या शंका घेऊन इकडचं मन दुखिवलं! पुरे आतां, अगदीं माझ्या हातांतच नको कांहीं लागलीच घालायला! आधीं भूक लागली असेल, तेव्हां जेवायला चलायचं—

[ उभयतां जातात.

**[ पडदा पडतो. ]**

## गोष्ट १७ वी.

## बंडाची वावटळ.

" अकरा चिनी लोकांबरोबर एक रशियन, सात रशियनांबरोबर एक जपानी, पांच जपान्यांबरोबर एक जर्मन, तीन जर्मनांबरोबर एक फ्रेंच आणि अशा सात फ्रेंचमनांबरोबर एक इंग्रज वीर आहे ! " असें मिसेस आर. दर्पोक्तीनें ह्मणाली.

वाळकेश्वरावर मिसेस जे. च्या बंगल्यांत आज पार्टी होती. या पार्टीला बऱ्याचशा युरोपियन स्त्रियांबरोबर कित्येक हिंदु, पारशी, मुसलमान, नेटिव ख्रिस्ती वगैरे बायांसहि आमंत्रण होतें. मिसेस जे. शीं आणि दुसऱ्याहि कित्येक युरोपियन स्त्रियांशीं माझी अलीकडे बरीच ओळख होऊन आमच्यांत स्नेहसंबंध वाढला असल्यामुळें अशा पार्ट्या वगैरे असल्या ह्मणजे मला आग्रहाचीं आमंत्रणें येत व मीहि सहसा तीं चुकवित नसें. त्याप्रमाणें आजच्या या पार्टीलाहि माझ्या एका मैत्रिणीसह मी गेलें होतें. सर्व मंडळी जमल्यावर शिष्टाचाराप्रमाणें व्हावयाचे विधि झाले व नंतर गप्पागोष्टींस सुरुवात झाली. या गोष्टी अर्थातच मोकळेपणानें व कसलाहि संकोच न बाळगतां चालल्या होत्या. इकडल्यातिकडल्या कांहीं गप्पा झाल्यावर पुढें, सांप्रत सर्वतोमुखीं असलेल्या जपान–रशियाच्या युद्धाच्या गोष्टी निघाल्या व कोणाची सरशी होईल, अखेर कोण जिंकेल वगैरे गोष्टीवर प्रत्येकजण आपापलें मत देऊं लागल्या. होतांहोतां प्रत्येक राष्ट्रांतील योद्ध्यांच्या पराक्रमाचें वर्णन चालू झालें व त्यांतच मिसेस आर. ची वरील दर्पोक्ति निघाली.

आंग्लयुवतीचें हें गर्वाचें भाषण अर्थातच सर्व श्रोत्यांनीं कौतुकानें श्रवण केलें. परंतु सांप्रतच्या आपल्या शोचनीय दासस्थितीनें मनाला फार उद्विग्नता उत्पन्न होऊन व त्याबरोबरच आपल्या प्राचीन वैभवाचें, प्राचीन शूरत्वाचें मूर्तिमंत चित्र डोळ्यांपुढें उभें राहून माझें अंतःकरण गहींवरून आलें व त्या आवेशासरशी मी ह्मणालें " हे समोर दिसताहेत हे दोन स्तंभ पाहिले का ? हे ह्मणे आंग्रे घराण्यांतील राणी सती गेली होती तिच्या स्मरणार्थ आहेत !"

यावर मिसेस डी. ह्मणाली " ही सतीची चाल किति निष्ठुरपणाची होती !"

मी ह्मणालें "पण सती जाणं हें केवढ्या साहसाचं, धैर्याचं, वीरत्वाचं काम होतं!" पुढें मी ह्मणालें "आणि हीं समोर आंधेरी व कान्हेरी अशीं दोन बेटं दिसताहेत हीं ! हीं पूर्वीं आंग्र्यांच्या ताब्यांत असून आंग्रे सरकार आपल्या कैद्यांनां ह्मणे इथं ठेवित असे. या बेटांपैकीं हल्लीं एक ओसाड असून दुसऱ्यावर लाईट हौस आहे. त्या आंग्र्यानं ह्मणे सर्वांस पुरे पुरे केलं होतं. इंग्रज, पोर्तुगीज, पेशवे, मुसलमान हे त्याचा पाडाव करण्यासाठीं फार दिवस सारखे प्रयत्न करित होते,

पण त्यानं कुणासहि दाद दिली नाहीं! शिवाजी महाराजांच्या पराक्रमाचीतर सर्वत्र ख्याति आहे—”

माझें भाषण पुरें होण्याचे पूर्वींच मिसेस डी. ह्मणते “Horrid! but they were only pirates!”

शिवाजी, आंग्रे हे लुटारू, दरोडेखोर व चांचे ठरावे आणि इंग्रज लोकांनीं तशींच किंबहुना त्याहूनहि शहारे आणण्याजोगीं कामें करतांच ते मोठे पराक्रमी, शूर ह्मणून वाखाणले जावे, ह्या न्यायसरणीला धन्य असो!

माझें भाषण तितक्यावरच राहिलें. कारण मिस मेरी या नांवाची एक आठ दहा वर्षांची मुलगी एकदम ह्मणाली “Oh how dreadful! मावशी तुह्मी Indian mutiny (बंडा)चे वेळीं इंडियांत होतां काय हो?”

ही मुलगी मिसेस आर. ची भाची. हिचे आईबाप वारल्यामुळें ती अगदीं निराश्रित झाली होती व ह्मणून नुक्तीच इंग्लंडांतून आपल्या मावशीबरोबर आली होती. तिनें इंग्लंडांत असतां १८५७ सालच्या बंडाची हकीगत ऐकिली होती, त्याची तिला यावेळीं आठवण होऊन तिनें उत्सुकतेनें हा प्रश्न विचारला होता. मेरीच्या या प्रश्नावर मिसेस आर. हंसतहंसत ह्मणाली “नाहीं गडे, मी तेव्हां नव्हतें इकडे; आणि नसण्याचं मुख्य कारण एवढंच कीं, माझ्या बाबांनीं त्यावेळीं लग्न केलं नव्हतं. तथापि आमचे बाबा होते बरं या बंडांत!”

मिसेस आर. चें हें विनोदाचें भाषण ऐकून आह्मी साऱ्याजणी तिच्याकडे पाहून हंसूं लागलों. परंतु त्या साध्याभोळ्या पोरीला आह्मी कां हंसतों याचें खरोखरसें कारण कळलें नाहीं. ती भोळेपणानें पुढें ह्मणाली “अगबाई! खरं का काय? तुमच्या बाबांनां बंडखोरांनीं ठार मारलं का?”

यावर आमच्यांत अधिकच हंशा पिकला. मिसेस आर. हीसुद्धां हंसूं लागली. हंसतहंसतच ती ह्मणाली “वेडे पोरी! तूं अगदींच खुळसट कशी ग? जर माझे बाबा बंडांत मारले गेले असते तर आज तुला माझ्या घरीं यायला मिळालं असतं का?”

“ह्मणजे? बाबांचं तूं अजूनपावेतों दुःख करीतच का बसली आहेस?”

“कपाळ तुझं! तूं अगदीं अचरटच दिसतेस! बाबा नाहीं, मी मात्र एकदा या बंडांत सांपडलें होतें. ती मोठी गमतीची गोष्ट आहे.” ह्मणून मिसेस आर. नें आपल्या गोष्टीला सुरुवात केली.

ती ह्मणाली “लग्न होऊन मी नुक्तीच इकडे आलें होतें. मला याविषयीं प्रत्यक्ष असा कांहींच अनुभव नव्हता. पुस्तकांतून आणि सांगोपांग माहिती

कळली होती तेवढीच. मुंबईस आल्याचे दुसरेच दिवशीं आह्मी साताऱ्यास निघून गेलों. यावेळीं साताऱ्याला माझे पति असिस्टंट कलेक्टरच्या हुद्यावर होते. सरकारी कामानिमित्त त्यांनां वारंवार तालुक्यांतून फिरावं लागे. मीहि त्यांचे बरोबर नेहमीं जात असें. परंतु पुढंपुढं मला ह्या प्रवासाचा इतका कंटाळा आला कीं, बोलून सोय नाहीं. चार दिवस एका गांवांत तर दोन दिवस अरण्यांत; नाहीं कुणी बोलायचालायला कीं नाहीं कांहीं करमणुकीचं साधन; तंबूंत, जंगलांत वस्ती; मला कांहीं तो प्रवास आवडेना. ह्मणून एका खेपेला मीं पतीबरोबर प्रवासास न जातां ठाण्यांत रहाण्याचाच निश्चय केला व ती गोष्ट त्यांच्या कानांवर घातली. आणि या खेपेस त्यांनां कांहीं महत्वाच्या कामगिरीसाठीं जावयाचं होतं व आठ दिवसांत बारातेरा गांवीं फिरायचं होतं; तेव्हां अशा त्रासदायक प्रवासापेक्षां मीं साताऱ्यास बंगल्यांत रहाणंच चांगलं, असं वाटून त्यांनांहि माझा विचार पसंत पडला व माझी व्यवस्था लावून ते तांतडीनं 'टूर'वर निघून गेले. बंगल्यांत मी एकटीच होतें खरी, तरी माझ्या तैनातीस बरींच माणसं असत. आया, बटलर, सईस, कोचमन, माळी, धोबी व दुसरेहि कित्येक नोकर असून शिवाय चार पटेवाले असत. शिवाय त्यांनीं जातांना आणखी चार नवीन पटेवाले मुद्दाम पहाऱ्यासाठीं पाठविले होते. एवढ्या मंडळींत रहायला मला कसली भीति होती! ते तालुक्यांत फिरावयास गेले त्या रात्रीं मी रात्रीचं जेवण वगैरे उरकल्यावर एका इंग्रजी कादंबरीचीं शंभरसवाशें पानं वाचलीं व नंतर झोंपेनं डोळे फारच पेंगूं लागल्यामुळं सुमारं अकरा वाजतां झोंपीं गेलें. आया माझ्या निजावयाच्या खोलींतच तिला पूर्वी सांगून ठेवल्याप्रमाणं एका खाटेवर मघांच येऊन निजली होती. लवकरच मलाहि गाढ झोंप लागली.

"सुमारं एक दीडाचा अंमल झाला असेल, इतक्यांत एकाएकीं बाहेर कसलासा भयंकर गलबला चालल्याचा मला भास झाला व मी दचकून बिछान्यांत उठून बसलें. यावेळीं मी झोंपेच्या गुंगींत होतें, आणि जागी झालें ती गलबल्याच्या भीतीनं. अर्थात् कसली गडबड आणि काय प्रकार आहे, याचा विचार करण्यास मला अवकाशहि सांपडला नाहीं. एकदम उरांत धडकी भरली. लवकरच ती आरडाओरड मोठमोठ्यानं चालल्याचा व शस्त्रांच्या आवाजांचाहि मला भास झाला. १८५७ सालच्या बंडाच्या वेळचीं भयंकर कत्तलीचीं वर्णनं पुस्तकांतून आणि माझ्या कित्येक मैत्रिणींच्या तोंडून मीं ऐकिलीं होतीं व तीं वाचतांना आणि ऐकतांना बंडखोरांच्या अनन्वित कृत्यांच्या कल्पनेनं माझ्या अंगावर शहारे उभे

रहात असत. माझे पति ह्या खेपेस तालुक्यांत फिरावयास जाण्याचं कारण तिकडे दरवडेखोरांनीं फारच पुंडाई माजविली होती हें होय. ह्या सगळ्या गोष्टी यावेळीं एकदम माझ्या डोळ्यांपुढं उभ्या राहिल्या व हे कुणी बंडखोर, दरवडेखोर तर नसतील ना? असा संशय मनांत उद्भवून मी फारच भयभीत झालें. मनांत संशय येण्याचीच कायती खोटी, लगेच तो खराच आहे असा मनाचा ठाम निर्धार झाला व मी अगदीं कावऱ्याबावऱ्यासारखी होऊन गेलें. या बंडखोरांच्या अंतःकरणांत दयेमायेचा लेशहि वसत नाहीं; मला एकटीला पाहून आणि आमच्या पटेवाल्यांना सामील करून घेऊन संधी साधून ते माझा वध करण्यासाठींच आले आहेत; मला आज ही कुठली दुर्बुद्धि सुचली व मी पतीबरोबर न जातां ठाण्यांत एकटी राहिलें! इत्यादि विचारांनीं अत्यंत पश्चात्ताप होऊन यावेळीं मला सारं त्रिभुवन आठवलं. आतां या दुर्धर प्रसंगांतून मी खास वांचत नाहीं; आतां कुठली आईबापांची भेट अन् कुठलं काय! देवा, माझ्यावर कायरे हा असा गहजब केलास? मीं एवढं कोणतं घोर पातक केलं होतं, कीं, त्याचं असं भयंकर फळ आज मला भोगावं लागत आहे! आतां काय करूं? कुणाचं साह्य मागूं? माझी भीतीनं अगदींच तारांबळ उडून गेली. लगेच मला माझ्या शेजारीं निजलेल्या आयाची आठवण झाली व 'आया आया' ह्मणून मी घाबरून ओरडलें. पण काय आश्चर्य सांगावं! आयाहि आपल्या जाग्यावर नाहीं! अरे देवा! आयाहि पण बंडवाल्यांस सामील झाली? आतांतर माझा अंतकाळ अगदींच समीप आल्याबद्दल माझी खात्रीच झाली व मी प्रभु येशुख्रिस्ताची प्रार्थना करूं लागलें. इतक्यांत आया हलकेच आंत येऊन ह्मणाली 'मादामसाब—'

"आया पुढं कांहीं बोलणार होती, परंतु माझी यावेळीं भीतीनं एवढी कांहीं त्रेधा उडून गेली होती कीं, तिचं भाषण ऐकण्याला मला मुळींच अवकाश नव्हता. तिचा तो पूर्वीसारखाच सन्मानसूचक आणि भक्तिपूर्ण प्रेमळ शब्द कानीं पडतांच व तिच्या नेहमींच्या निर्दोष आणि उल्हासी मुद्रेवर कृष्णकृत्याची मुळींच झांक नसून नेहमींप्रमाणंच तिची शांत आणि मायाळू मुद्रा दृष्टीस पडतांच मला बराच धीर आला व पाण्यांत पडलेलं माणूस मोठ्या आशेनं एखाद्या यःकश्चित् काडीचा आश्रय करण्याससुद्धां जसं उत्सुकतेनं धडपड करतं तशी माझी स्थिति होऊन त्या संकटांत देहभान विसरून गेलेल्या मीं आयाला एकदम मिठी मारली व एकसारखी स्फुंदूं लागलें. आया बंडवाल्यांस सामील झाली नाहीं; परंतु पटेवाले मात्र

सामील झाले आहेत व ते आणि बंडखोर मिळून मला ठार करणार, असं आतां मला वाटलं व यांतून मला वांचविण्यासाठीं गयावयां करून मी आयाची विनवणी करूं लागलें. आया मला आपल्या परीनं धीर देऊं लागली; मी व्यर्थ भीत आहें, भिण्याचं कांहींएक कारण नाहीं वगैरे तिनं आपल्या भाषेनं सांगण्याचा आणि हावभावांनीं दर्शविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; परंतु माझी कांहीं खात्री होईना आणि आयाचं भाषणहि मला कळेना! मला हिंदुस्थानांत आल्याला कायते तीन चार महिने झाले होते; आव, जाव, नै, मंगता, इत्यादि दहापांच मोडकेतोडके शब्द समजण्यापुरतें मला हिंदुस्थानी भाषेचं ज्ञान होतं. माझा आजपर्यंतचा बहुतेक व्यवहार खुणांनीं आणि बटलराच्या धेडगुजरी इंग्रजी भाषेच्या साह्यानं चालला होता. अर्थात् यावेळीं आयाची भाषा मला मुळींच समजेना. तथापि ती जें कांहीं बोलली त्यांतील पुढील शब्द ऐकूनतर माझी भयंकर गाळण उडाली. 'सिपाही! पुलीस! लडाई! भोत!' अरे दैवा! एकून माझा तर्क खराचतर! बंडखोरांना आमचे पटेवाले सामील झाले आहेत; पोलिस शिपायांचीहि त्यांना मदत आहे; ते लढाई करण्यासाठीं आले आहेत; माझा खून करणार! आतां मी काय करूं? कुणाचं साह्य मागूं? मला कोण वांचवील? मी हताश होऊन आयाच्या गळ्याला घट्ट मिठी मारून रडत रडत ह्मणालें 'आया! आया! लडाई? Mutiny? ते मला ठार मारायला का आले आहेत? Oh help! help!'

"माझ्या बोलण्याचा सगळा अर्थ जरी आयाला स्पष्टपणं समजला नसला, तरी मी फार घाबरून गेलें आहें हें तिला कळल्याविना राहिलं नाहीं व ती आश्चर्यचकित होऊन व मूर्खासारखी मी उगीच भीत आहें असं दर्शविण्यासाठीं आपल्या कपाळावर हात मारून घेऊन ह्मणाली 'नेहि नेहि मादामसाब—'

"आया कपाळावर हात मारून 'नेहि नेहि' ह्मणते, तेव्हां आतां कांहींच आशा उरली नाहीं, असं वाटून मी गर्भगळित होऊन अधीरतेनं विचारलं 'नेहि नेही? No help! no hope? Oh God, save me–Oh save me!'

"इतक्यांत बाहेर अधिकच गलबला झाला व एक बंदुकीचाहि आवाज ऐकूं आला. त्यासरशी 'Help me Oh God' अशी एकदम मोठ्यानं किंकाळी फोडून मी तिथंच धाड्दिशीं पडलें. पुढं काय झालं तें मला माहीत नाहीं! त्या भयंकर रात्रीची आठवण झाली कीं अद्यापिहि मला कांपरं भरतं."

असें ह्मणून मिसेस आर. किंचित्काल थांबली. आह्मी सर्वजणी उत्सुकतेनं तिची गोष्ट ऐकत होतों. इतक्यांत मिस मेरी ह्मणाली "अरेरे! मावशी, मग त्या बंडवाल्यांनीं तुझा खून केला तर!"

मिसेस आर. हंसून ह्मणाली "मेरी! पोरी, तुला कधींग शहाणपण येईल? खुळे मुली, त्यांनीं जर माझा खून केला असता तर तुला ही गोष्ट सांगायला आज मी जिवंत राहिलें का असतें? वेडी ग वेडी, अगदींच खुळी पोर!"

मी ह्मणालें "पण पुढं काय झालं तेंतर सांगा? खरोखरच का ते बंडवाले होते?"

मिसेस आर. ह्मणाली "जेव्हां मी शुद्धीवर आलें तेव्हां आया माझी ममतेनं शुश्रूषा करित आहे व पति डाक्टराबरोबर कांहीं बोलत आहेत, असं माझ्या दृष्टीस पडलं. अद्यापिहि माझी भीति समूळ नाहींशी झाली नव्हती. मीं आयाला विचारलं 'आया, गेले का ते बंडवाले?'

"आयानं पूर्वींच्याच स्नेहयुक्त स्वरानं उत्तर दिलं 'मादामसाब, आप मत डरो. आबी सो जाव.'

"पुढं मी चांगली हिंडूंफिरूं लागल्यावर मला या बंडाचं खरं कारण कळून आलं. परंतु तें कळतांच मी इतकी कांहीं ओशाळलें, लज्जित झालें आणि त्या बरोबरच आमच्या 'पूलीससाब' चा मला इतका राग आला कीं, विचारूं नका! हा सारा अनर्थ 'पुलीससाबच्या' फाजील दक्षतेमुळंच उद्भवला होता. माझे पति मला एकटीला बंगल्यांत ठेवून स्वारीवर गेल्याची बातमी कळतांच या 'पुलीससाब'नीं मला नकळत माझ्या रक्षणार्थ पोलीसची एक तुकडी रात्रीं पहाऱ्यावर पाठविली होती. आपण पहारा करण्यास खंबीर असतां आणि आपल्या साहेबांनीं पोलिसच्या लोकांस पाठविलं नसतां पोलिस पहारा करण्यासाठीं आले, अर्थात् आपल्या मेहनतीचं श्रेय हे पोलिसचे लोक मधल्यामधं फुकट उपटणार, हें कांहीं माझ्या रक्षणार्थ आमच्या बंगल्यावर असलेल्या पटेवाल्यांस सहन झालं नाहीं, आणि ह्मणून त्यांनीं हुमरीतुमरीवर येऊन पोलिसच्या लोकांस अपशब्द बोलून पिटाळून लावण्याचा प्रयत्न आरंभिला होता. शिवाय या दोन्ही पक्षांत मारामारी उपस्थित होण्यास आमची आयाहि कारणीभूत झाली होती! आयावर आमच्या पटेवाल्यांपैकीं एकाचं प्रेम जडलं होतं व लवकरच त्यांचं लग्न व्हावयाचं ठरलं होतं. पोलिसच्या शिपायांपैकींहि एकाचा आयावर पूर्वींपासून डोळा होता. तिनं आपल्याशीं लग्न लावावं ह्मणून त्याची अद्यापिहि खटपट चालली होती. परंतु आयाचं आमच्या पटेवाल्यावरच जास्त लक्ष्य होतं. कारण लग्नानंतरहि उभयतांनां एकाच ठिकाणीं नोकरी करतां येईल व यदाकदाचित् आमची दुसरीं-कडे बदली झालीच तर आह्मी आयाच्या नवऱ्यालाहि आपल्याबरोबर नेऊं, अशी तिला सबळ आशा होती. पोलिसांतल्या त्या मनुष्याचं तसं होणं नाहीं. अर्थात्

वरील पोक्त विचार करून तिनं पोलिस शिपायाची मागणी नाकारली होती व आमच्या पटेवाल्याशींच लग्न करण्याचा निर्धार केला होता. तो पोलिसचा शिपाई वरील तुकडींत होता. आमच्या बंगल्यावर येतांच त्यानं आयाला गांठून तिच्याशीं तो कांहीं कुजबुजूं लागला. पटेवाल्याच्या दृष्टीस हा प्रकार पडतांच उभयतांची मारामारी जुंपली व नंतर पोलिसचे लोक एकीकडे व आमचे पटेवाले दुसरीकडे असे दोन पक्ष होऊन उभय पक्षांत पहिल्यानं शब्दयुद्ध व नंतर हस्तयुद्ध सुरू झालं. आमच्या पटेवाल्यांस भेवडावण्याकरितां पोलिसांतील एका शिपायानं बंदुकीचा वायबार केला होता. आणि त्याचा परिणाम वर सांगितल्याप्रमाणं घडला!"

मिसेस आर. च्या 'बंडाच्या वावटळी'च्या या मजेदार गोष्टीनें जमलेल्या सर्व मंडळीची मोठी करमणूक झाली. नंतर शिष्टोपचाराप्रमाणें सर्वांनीं यजमानीण-बाईंचे निरोप घेतल्यावर आपापल्या घरची वाट धरली.



गोष्ट १८ वी.

# पैसा मिळविण्याची पेटंट युक्ति.

गणपतरावांचें अध्ययन तात्यापंतोजीच्या शाळेंत छडीच्या धाकानें जें काय झालें असेल तेवढेंच. आपल्या मुलाला चार अक्षरें यावीं, त्यानें विद्या करून लोकांत मानमान्यता मिळवावी, अशी गणपतरावांचे वडील बाबासाहेब यांची फार इच्छा; आणि ती इच्छा पुरविण्यासाठीं त्यांनीं थोडाथोडका पैसा खर्चला, असें नाहीं. मुलाला खायलाप्यायला यथेच्छ द्यावें, त्याला घरीं शिकविण्यासाठीं मास्तर ठेवावा, खाऊची व बक्षिसाची लालूच दाखवावी, हरएक उपाय करून पहावा, पण गणपतरावांचें मन कांहींकेल्या अभ्यासाकडे वळूं नये, असें चाललें होतें. शेवटीं बाबासाहेबांनीं हात टेंकले. "हा कारटा असा ठोंब्या, मूर्ख, टोणपा निघेल असें कुणाला ठाऊक! नाहींतर याच्या विद्येपायीं जो पैसा पाण्याप्रमाणें ओतला तोतरी फुकट घालविला नसता! त्या पैशानें याच्या नांवाची एखादी सुरेखशी शेतवाडीतरी घेतली असती तर तिचें उत्पन्न हा जन्मभर खात रहाता. पण आतां पश्चात् बुद्धि काय कामाची?" असें बाबासाहेब एखादेवेळीं अगदीं त्रासून ह्मणत असत. बाबासाहेब असें बोलूं लागले ह्मणजे त्यांच्या बरोबरची स्नेही मंडळी त्यांनां ह्मणे "बाबासाहेब! ह्याबद्दलचा दोष चिरंजीवांकडे काय आहे? लहानपणांतले लाडच मुलांनां बिघडवितात. लहानपणीं तुह्मीं त्याला धाकांत ठेवावयाचें तें ठेविलें नाहीं; बरें, पुढें मुलगा मोठा झाल्यावर त्याच्या लग्नाची तुह्मीं घाई करायला नको होती, तीहि केली; ही त्याची चूक कीं तुमची? अगोदरच शिकण्याविषयींचा उल्हास, आणि त्यांत आतां संसार अंगावर पडला; मग चिरंजिवांला शिकण्याची इच्छा कशी होईल?"

बाबासाहेबांनां असें कोणीं ह्मटलें कीं आपण चूक केली खरी, असें त्यांनां वाटे आणि पश्चात्ताप होई. पण आतां पश्चात्ताप करून काय होणार? होणार तें होऊन गेलें. गणपतरावांनीं शाळा सोडून टोळभैरवासारखें गांवांत भटकण्याचा क्रम धरला.

दोन वेळां जेवणापुरतें घरीं यावें, बाकीचा वेळ कोठेंतरी एखाद्या अड्ड्यांत अगर नाटक मंडळीच्या सहवासांत, अथवा स्वस्थ झोंपा ताणण्यांत घालवावा, हा गणपतरावांचा रोजचा क्रम असे. दुसरा कांहीं उद्योग नाहीं, तर निदान घरची बाजारांतली नेआण कर, ह्मशीचें दूध काढ किंवा घरांत काय आहे नाहीं तें पहा, हीं कामें तर गणपतरावांनीं पहावयाचीं असतीं! पण वडील जीवमान आहेत

तोंपर्यंततरी निदान घरची व्यवस्था पहावयाची नाहीं किंवा कोणताहि उपयुक्त धंदा करावयाचा नाहीं, असा जणूंकाय त्यांचा निश्चयच होता.

गणपतरावांनीं शाळा सोडल्यावर लवकरच बाबासाहेब वारले. बाबासाहेबांचें वय कांहीं फार नव्हतें. चाळीसबेचाळिसांच्या आंतबाहेर असेल. त्यांची शरीर-प्रकृतिहि निकोप होती. पण अलीकडे चिरंजिवांचें वर्तन पाहून त्यांनां हृद्रोग लागल्यासारखें झालें होतें. आपल्यामागें आपल्या मुलाचें कसें होईल, या चिंतेनें त्यांचें मन सदासर्वदा ग्रस्त झालेलें असे, आणि या काळजीच्या पायींच झिजत जाऊन शेवटीं त्यांचा अंत झाला.

बाबासाहेब वारल्यानंतरहि कित्येक दिवस गणपतरावाचे डोळे उघडले नाहींत. तो कांहीं आतां लहान नव्हता. त्याचें वय विसीच्या सुमाराला असेल. एक मुलगीहि झाली होती; पण स्वारीची वृत्ति पालटली नव्हती, ती जशीची तशीच होती; किंबहुना आतां कोणाचा धाक नसल्यामुळें अधिक बेफाम झाली होती ह्मटलें तरी चालेल. बाबासाहेबांनीं कांहीं मोठीशी जिनगी मागें ठेविली नव्हती. घरदार, शेतवाडी, दागदागिना सगळी मिळून सहाएक हजारांची असेल. नीट जपून तिची व्यवस्था केली असती, तर जेमतेम निर्वाहापुरतें उत्पन्न तिच्यांतूनसुद्धां काढतां आलें असतें. पण गणपतरावांनां जपून खर्च करणें, व्यवस्था आणि दूरदृष्टि, या गोष्टींची ओळखसुद्धां नव्हती. नवें उत्पन्न कांहीं नाहीं, आणि खर्चतर मनास येईल तसा करावयाचा, अशा खालीं इस्टेट कशी रहाणार? लवकरच घरदार, शेतवाडी, सामानसुमान विकून आतां बायकोच्या अंगावरचें किडुकमिडुक विकण्याचा प्रसंग आला. घरांत दुपारासाठीं तांदूळ नसले तर हरकत नाहीं, पण सकाळीं दहापांच सोबत्यांनां घेऊन चहा पिण्याचा समारंभ झालाच पाहिजे! त्याचप्रमाणें नाचरंग, तमाशे, नाटकें, सहली वगैरे गोष्टींत कोठेंहि उणें पडत नसे. बाजारांतून एखादा जिन्नस आणायला सांगितला ह्मणजे गणपतरावांनीं कपाळाला आंठ्या घातल्याच आणि पैसे नाहींत ही सबब पुढें केलीच. पण पानावर बसल्यानंतर चमचमीत भाज्या, नरम पोळ्या, आंबेमोहोराचा भात, लोणकढें तूप वगैरे गोष्टींत यत्किंचित उणें पडलें तर सरस्वतीबाईच्या माहेरच्या तीन पिढ्यांचा एकदम उद्धार होण्यास, किंवा मिजासखोर पतीच्या प्रेमाचें चिन्ह पत्नीच्या गालावर उमटण्यास कदापि कसूर होत नसे! तिनेंतरी बिचारीनें हा त्रास कोठवर सोसावा? गणपतराव घरांतलें मुळींच कांहीं पाहीनात, आणि

त्यांच्या मिजासींत कमी झालेलें त्यांनां खपेना. तेव्हां तिनें कांहींना कांहीं निमित्त करून आपल्या भावाकडून पैसे आणावे, आणि संसाराचा गाडा कसातरी चालवावा.

पण असा प्रकार किती दिवस चालणार? माहेरहून पैसे आणूनसुद्धां त्या बिचारीच्या दैवांतले शिव्याश्राप व मार चुकेना, तेव्हां तीहि कंटाळली आणि एके दिवशीं गणपतराव मारावयाला अंगावर धावून आल्याबरोबर धिटाईनें त्यांनां ह्मणाली "पुरे पुरे! माणसानं मेला छळतरी किती सोसायचा? सगळी शिपाईगिरी बायकोपुढं दाखवायची. पुरुषासारखे पुरुष असून सासरच्या माणसांच्या पैशावर मिजास करायला मेली लाज कशी वाटत नाहीं? कांहींतरी उद्योग करून दोन पैसे मिळवावे तेंतर राहिलंच, उलट मी माहेरहून आणलेल्या पैशावर मौजा करायला आणि मला मारायला तयार! मी साफ सांगतें, आतां पैसे मागायला मी माहेरच्या माणसांकडे मुळीं जायची नाहीं! हवं असलं खायला तर बाजारचं सामानसुमान आणून द्यावं, तर मी सैपाक करीन, नाहींतर उठून माहेरीं चालती होईन. आतां माझ्याच्यानं हा छळ नाहीं बाई सोसवत!"

गणपतराव तसा कितीहि उनाड आणि बडबड्या असला तरी मनाचा कच्चा होता. सरस्वतीबाईंनीं आज थोडेंसें उग्र स्वरूप दाखविल्याबरोबर तिच्या अंगावर हात टाकण्याची त्यांची प्राज्ञा नव्हती; व खरोखरच त्यांनां तसें करण्याचें धैर्यहि झालें नाहीं. त्यांच्या डोक्यांत आतां निराळेच कांहीं विचार येऊं लागले होते. ते आपल्या मनाशीं ह्मणत होते "आतां या घरांत रहाण्यांत मौज नाहीं. प्रत्यक्ष जेथें बायकोनें आपला अपमान केला, तेथें रहाण्यांत काय भूषण आहे?"

परंतु बायकोच्या या कडक भाषणाला उत्तर दिलें नाहीं तर उद्यां ती अधिक धिटाईनें बोलून आपला अधिकच अपमान करील असेंहि भय त्यांनां वाटलें. ह्मणून ते ह्मणाले "पुरे पुरे. जीभ आवर. कांहींतरी जनाची लाज धर. तुला काय वाटलें कीं, मी उद्योगधंदा करूं लागलों तर मला कमाई करतां येणार नाहीं ह्मणून? तुझ्या माहेरचे पैसे हवे आहेत कुणाला? आणि तुला ते आणायला सांगितले होते कुणीं? हा पठ्ठा गय करतो तोंपर्यंत. पैसेपैसे असे काय मोठे दुर्मिळ आहेत? आज मी लाथ मारीन तेथें पैशाची खाण निघेल! समजलीस? बाजारचें सामानसुमान येईल तेव्हां सैंपाक करीन हा जसा तुझा निश्चय आहे, तसाच पैसे कमावून आणीन त्याचवेळीं घरांत पाऊल ठेवीन असा माझाहि पण निश्चय आहे. तुझ्या माहेरच्या पैशाच्या आशेवर तूं बसली असशील. हा गणपतराव तशांतला नाहीं, समजलीस!"

असें ह्मणून गणपतराव तडकाफडकी उठले. अंगांत कपडे चढविले, डोक्याला रुमाल गुंडाळला आणि "हा पहा पैसे मिळवायला चाललों" असें ह्मणून स्वारी घराबाहेर पडली.

[ २ ]

गणपतराव बायकोच्या रागानें घराबाहेर पडले खरे; पण जावयाचें कोठें, तें कळेना. पैसा कमावून आणण्याची प्रतिज्ञा तर करून चुकले, पण तो मिळवावा कशाच्या आधारावर, तें दिसेना. विद्या नाहीं, परीक्षा नाहीं, हुन्नरज्ञान नाहीं, दुसऱ्याला फसविण्याचें कसबहि अंगीं नाहीं! पैसा कसा मिळेल या विचारांत निमग्न होतहोत जिकडे पायांनीं नेलें तिकडे गणपतरावांची स्वारी गेली. जातां जातां गांव संपलें आणि दुतर्फा हिरव्यागार झाडांच्या गर्द छायेचा स्टेशनाकडे जाणारा रस्ता लागला. त्या रस्त्यानें रमतरमत जात असतां त्यांना एकाएकीं कांहीं आठवण झाली. खिशांत हात घालून पहातात तों दोन रुपये हाताला लागले. तशीच स्वारी स्टेशनकडे वळली. मुंबईला जाणारी गाडी स्टेशनवर येण्यास पंधरावीस मिनिटांचाच कायतो अवकाश होता. लागलीच मुंबईचें तिकीट घेऊन स्वारी मुंबईला रवाना झाली!

मुंबईला ठाकुरद्वाराजवळ त्यांचा मेहुणा (बहिणीचा नवरा) रहात असे. त्याचें नांव विष्णुपंत असें होतें; पण ते मुंबईस राजवैद्य या नांवानें प्रसिद्ध होते. गणपतराव आजपर्यंत मुंबईला कधीं गेले नव्हते. यामुळें मुंबईस बोरीबंदरच्या स्टेशनावर उतरतांच तें भव्य स्टेशन, जवळच म्युनिसिपालिटीचें टोलेजंग आफीस, ट्रामगाड्या आणि रस्त्यानें पादचारी लोकांचा प्रचंड समूह पाहून गणपतराव प्रथम गोंधळले. तशांतून टाकुरद्वार कोठें आहे, इकडे कुलाब्यापाशीं आहे कीं तिकडे परेलपाशीं आहे, कांहींच ठाऊक नव्हतें. भाड्याची गाडी करावी, तर खिशांतले पैसे संपुष्टांत आलेले. मुंबईत कोण कोणाची चौकशी करतो! लोक आपले त्याच्या भावड्या मुद्रेकडे पाहून हंसत आणि चालते होत. याप्रमाणें कांहीं काळ उभे राहिल्यावर एक सभ्य व पोक्त गृहस्थ दृष्टीस पडले. त्यांनां गणपतरावांनीं ठाकुरद्वाराची माहिती विचारली. तेव्हां त्या गृहस्थानें त्याला रस्त्याला लावून दिलें. मोठ्या कष्टानें एकदाचें ठाकुरद्वारतर त्यांनीं गांठलें, पण विष्णुपंतांचा पत्ता कोण सांगतो? राजवैद्य कोठें रहातात ह्मणून विचारलें असतें तर कोणींहि घर दाखवून देता. कारण त्यांचा दवाखाना तेथें सुप्रसिद्ध होता. पण विष्णुपंत राजवैद्य या नांवानें प्रख्यात आहेत हें बिचाऱ्या गणपतरावांस ठाऊक नव्हतें. सारांश, ठाकुरद्वारापाशीं येऊन

लवकर पत्ता लागेना. शेवटीं तेथेंहि असाच एक गृहस्थ अकस्मात् भेटला आणि त्यानें राजवैद्यांचा दवाखाना एकदाचा दाखवून दिला.

गणपतराव कंपौंडच्या आंत शिरले तों एक मोठा दुमजली भव्य बंगला दिसला. मुंबईसारख्या शहरांत एवढ्या मोठ्या बंगल्यांत रहाण्यासारखी विष्णुपंतांची श्रीमंती नाहीं, अशी गणपतरावांची समजूत होती. ह्मणून ते प्रथम चपापले. दहावर्षांपूर्वी हेच विष्णुपंत बारा रुपयांवर कंपौंडर होते आणि तेच आतां या भव्य इमारतींत रहाण्याइतके गबर झाले असतील, अशी त्यांना कल्पना नव्हती. पण त्या बंगल्यावर मोठ्या काळ्या पाटीवर 'प्रसिद्ध राजवैद्य विष्णु सदाशिव देशपांडे यांचें औषधालय' अशीं ठळक सोनेरी अक्षरें वाचलीं, तशी त्यांची शंका दूर झाली. गणपतराव क्षणभर इकडेतिकडे चकित नेत्रांनीं पहात राहून औषधालयाच्या दाराशीं गेले. तेथें रोग्यांची बरीच दाटी होती. पलीकडे ओसरींत एका आरामखुर्चीवर राजवैद्यांची स्वारी बसली होती. जवळ पांचचार श्रीमंत भाटे अत्यंत नम्रतापूर्वक प्रकृतीसंबंधाची हकीगत कळवित होते. शुभ्र पाषाणाच्या एका टेबलापाशीं एक कारकून बसला होता, तो वैद्यराजांच्या तोंडचीं औषधांचीं नांवें व अनुपानें भराभर लिहून ते कागद रोग्यांना देत होता. एकामागून एक रोगी याप्रमाणें प्रकृतीचें मान कळवून औषधें घेऊन चालले होते. पलीकडच्या खोलींत दोनचार कंपौंडर भराभर मिश्रणें, काढे, मात्रा, आसवें वगैरे तोलण्याचें काम करित होते. हेड कंपौंडर औषधांच्या किंमती आकारून त्याप्रमाणें पैसे वसूल करित होते. याप्रमाणें औषधालयाचें काम थाटानें चाललें होतें. इतक्यांत गणपतराव अकल्पित रीतीनें जाऊन विष्णुपंतांच्या पुढें एकदम उभे राहिले.

गणपतरावांनां पाहून विष्णुपंत आश्चर्यचकित झाले. गणपतरावांचा तो मळका पोषाख व काळजीनें ग्रस्त झालेली आणि प्रवासानें उतरलेली अशी त्यांची ती मुद्रा आणि पुढें पत्र वगैरे न पाठवितां अकल्पित येऊन उभें रहाणें, यावरून "हा काय प्रकार आहे ? तुह्मीं पुढें पत्र कसें पाठविलें नाहीं ? पुढें पत्र आलें असतें ह्मणजे स्टेशनावर तुह्मांला घरची गाडी पाठविली असती. तुमचा थाटमाट सगळा जाऊन ही दशा कशी आली ? प्रकृतितर ठीक आहेना ? कां कांहीं दुखणेंबिखणें लागलें ह्मणून औषध घेण्यासाठीं आलां ? असें एकाएकीं येण्याचें कारण काय?" वगैरे अनेक प्रश्न विष्णुपंतांनीं विचारले. पण गणपतरावांनीं या सगळ्या प्रश्नांनां एकच जबाब दिला. ते ह्मणाले "त्यासंबंधानें पुष्कळच बोलायचें आहे, तें मग आपण फुरसतीनें बोलूं."

विष्णुपंतांनींहि अधिक प्रश्न न विचारतां एका नोकरास बोलावून "यांना माडीवर दिवाणखान्यांत घेऊन जा, आणि यांच्या चहापाण्याची तजवीज करण्यास घरांत सांग. मीहि तोंपर्यंत हे चार रोगी पाहून वर येतों" असें त्याला ह्मटलें.

[ ३ ]

रात्रीं फराळ वगैरे आटोपल्यानंतर विष्णुपंत व गणपतराव एकांतांत बसून सुखदुःखाच्या गोष्टी बोलत होते. गणपतरावांनीं अगदीं लहानपणापासून आज तागाईत आपलें साद्यंत चरित्र सांगितलें आणि वडील विद्यमान होते तोंपर्यंत आपण कशाची फिकीर केली नाहीं, पण आतां कशी दुर्दशा प्राप्त झाली आहे, घरांत खर्चासंबंधानें कशी अडचण प्राप्त झाली आहे, आणि पैसे कमावून आणित नाहीं ह्मणून प्रत्यक्ष आपली पत्नी आपणास कसें टाकून बोलली व त्यावर आपण प्रतिज्ञा करून कसे बाहेर पडलों, तें सर्व सांगितलें. तेव्हां विष्णुपंत हंसत ह्मणाले "एवढेंच ना? तर मग आतां तुह्मी मुळींच फिकीर करूं नका! पण मला नवल वाटतें कीं, तुमची इतकी वाईट स्थिति झाली तरी तुह्मीं आपल्या बहिणीला यत्किंचित्सुद्धां कांहीं कळविलें नाहीं. असो, जें झालें तें झालें. पण आतां याच्यापुढें तुमचा भाग्योदय दिसतो आहे. ह्मणूनच तुह्मांला इथपर्यंत येण्याची बुद्धि झाली. तुमचें कुटुंब तुह्मांला अंमळ टाकून बोललें ह्मणून तुह्मांला राग आला खरा; पण हा रागच तुमच्या भाग्योदयाला निमित्त होणार, अशी माझी मनोदेवता मला सांगते. मनुष्याच्या वर्तनाला एकदम निराळी दिशा लावण्याला अशीच एखादी गोष्ट व्हावी लागते. कालिदासाचें चरित्र तुह्मीं वाचलेंच असेल. त्याला त्याची स्त्री अशीच कुठें टाकून बोलली होती. तेवढ्यावरून उठून जाऊन त्यानें देवीच्यापुढें तपश्चर्या मांडली आणि तिला प्रसन्न करून घेतलें. तुळशीदास केवढा स्त्रीलंपट! पण बायकोच्या एका शब्दानें त्याच्या अंगीं जेवढें साधुत्व बाणलें, तेवढें हजारों गुरूपदेशानें बाणलें नसतें. मलातर या तुमच्या गोष्टीवरून अशी खात्री वाटूं लागली आहे कीं, तुमचाहि कालिदासासारखा भाग्योदय होण्याला तुमच्या कुटुंबाची कटूक्तिच कारण होणार!"

गणपतरावांला ही सगळी आपली थट्टा चालली आहे असें वाटलें. ते ह्मणाले "विष्णुपंत, मेव्हणे झालांत ह्मणून भलत्याच वेळीं थट्टा करायची? अशा वेळीं मला पैसा मिळविण्याची एखादी विद्या शिकवायची तें सोडून तुह्मींतर माझी निवळ थट्टा मांडली आहे, याला काय ह्मणावें?"

हें भाषण ऐकूनतर विष्णुपंतांनां अधिकच हंसूं येऊं लागलें. परंतु तें दाबून ते पुनः ह्मणतात "हें काय बोलणें? अहो थट्टा नाहीं, खरोखर मनापासून गंभीरपणानें सत्य सांगतों कीं, तुमचा भाग्योदय आतां लांब नाहीं! अहो, तुह्मांला ही मुंबई माहित नाहीं. या ठिकाणीं आजकालच्या दिवसांत कालिदास किंवा शेक्सपिअर होणें कांहीं एवढें कठीण मानलें जात नाहीं. माझ्या पहाण्यांत आत्तांच्या आत्तां कितीतरी कालिदास आणि शेक्सपिअर होऊन गेले आहेत. तुह्मी वर्तमानपत्रें वाचित असतां ह्मणजे तुह्मांला समजलें असतें."

"तुमच्या कालिदासशेक्सपिअरच्या गोष्टी घेऊन मला काय करायचें आहे? त्या गोष्टी राहूं द्या, आणि मी विचारतों तेवढ्या प्रश्नांचा जबाब द्या. या तुमच्या धंद्यासंबंधानें पुष्कळ मोठमोठे अधिकारी व शेटसावकार वगैरे लोकांशीं तुमचा परिचय झाला असेलच. तर मग त्यांच्याकडून कुठें नोकरीचें संधान जुळण्या-सारखें आहे काय तें सांगा पाहूं? आतां कांहींतरी युक्ति करून पैसे मिळविले पाहिजेत. त्याखेरीज घरीं ह्मणून जायचें नाहीं, असा माझा निर्धार झाला आहे."

"तर मग तुह्मी या नोकरीबिकरीच्या भानगडींत मुळींच पडूं नका! मी नोकरी करून रहातों तर हा एवढा बंगला, गाडीघोडे, नोकरचाकर वगैरे ठेवण्याचें सामर्थ्य मला रहातें का? आजकाल या मुंबई शहरांत भपकेदार जाहिराती हेंच पैसे मिळविण्याला एक सुलभ साधन आहे. पलीकडल्या बंगल्यांत माझे स्वताचे दोन मशीनप्रेस आहेत. ते निवळ जाहिराती काढण्याकरितां मला ठेवावे लागतात. शिवाय दोघे संस्कृत पंडित व एक एम्. ए. असे तिघे गृहस्थ मीं नोकरीस ठेविले आहेत. ते प्राचीन आर्य वैद्यकाचे ग्रंथ शुद्ध करून संस्कृतांत व इंग्रजींत माझ्या नांवावर प्रसिद्ध करतात. त्यामुळें मी केवढा संस्कृत व इंग्रजी पंडित आहें असा लोकांचा ग्रह होतो. मी ज्या युक्तीनें राजवैद्य बनलों, त्याच युक्तीनें तुह्मांलाहि कालिदास, शेक्सपिअर बनण्याला काय हरकत आहे?"

"पण तें मला कसें साधेल?"

"तुह्मी दुसरें कांहींएक करूं नका. प्रथम एक संगीत नाटक लिहा; त्यांत खूपसे स्त्रीपुरुषांचे झगडे किंवा देशाभिमान अंगांत स्फुरण पावून उच्चारलेला 'सूड! सूड! सूड!' हा षडक्षरी मंत्र आणि सुधारकांची टवाळकी, इतके विषय कसेंतरी करून कोंबा, तें तुमचें पुस्तक आपल्या छापखान्यांत मी छापून काढतों; माझ्या ओळखीचे पुष्कळ बी. ए., एम्. ए., एल्. एल्. बी., सरकारी अधिकारी, वर्तमानपत्रांचे

संगीत नाटक कोणीकडे ! गणपतरावांसारखा प्रतिभाशाली लेखक अद्याप झालाच नाहीं, असें वर्तमानपत्रें ह्मणत. कारण उघडच आहे. तसें तीं न ह्मणतीं तर विष्णुपंतांनीं त्यांच्या पत्रांतल्या आपल्या औषधांच्या कालमचे कालम भरणाऱ्या 'स्टँडिंग' जाहिराती एकदम काढून घेतल्या असत्या. सारांश, या संगीत नाटकांत गणपतरावांनां कमींत कमी पांचशें रुपये मिळून नांवलौकिक झाला तो वर !

पहिल्याच प्रयत्नाला इतकें यश आलें तेव्हां गणपतरावांनां नाटकांची टांकसाळ घालण्यास अधिकच स्फुरण आलें. सामान्य, निरक्षर, हलकट, टवाळ आणि व्यसनाधीन लोकांची रुचि कशी आहे ती पाहून त्या धोरणानें नाटकें लिहूं लागतांच मोठमोठ्या श्रीमंत व्यसनी जहागिरदारांकडून, प्रसिद्ध वेश्यांकडून व इष्कबाज लोकांकडून गणपतरावांनां मेजवान्यांवर मेजवान्या होऊं लागल्या व मानपत्रें मिळूं लागलीं. याप्रमाणें सुमारें वर्ष दीड वर्षांचे आंत दोनचार हजार रुपये मिळवून आणि सर्वांकडून 'धन्यधन्य' ह्मणवून घेतल्यावर गणपतरावांनीं विष्णुपंतांच्या सल्ल्यानें आपल्या धंद्याची दिशा थोडी बदलली. आतां धर्माभिमानाला लोकांत ऊत आला आहे असें पाहून 'विश्वामित्र' या नांवाचें एक मासिक पुस्तक काढण्याबद्दलची जाहिरात काढून तिच्या लक्षावधी प्रती लोकांत वांटल्या. अलीकडे ख्रिस्तीलोक, सुधारक, आर्यसमाज, प्रार्थनासमाज वगैरे लोकांनीं हिंदु धर्माची विटंबना मांडली आहे, यास्तव त्यांचा खरपूस समाचार घेण्यासाठीं आणि लोकांमध्यें खऱ्या सनातन धर्माच्या ज्ञानाचा प्रसार करण्यासाठीं व एकंदरींत लोकांनां सज्ञान करण्यासाठीं 'विश्वामित्रा'ला पुनः जन्मास घालण्याचें ठरलें. या पुस्तकांत लिहिणारांच्या नांवाच्या यादींत देशांतल्या बहुतेक प्रसिद्ध लेखकांचीं नांवें त्यांनां न विचारतां खुशाल दडपलीं होतीं ! पहिल्या अंकांत येणाऱ्या विषयांची अनुक्रमणिकाहि प्रसिद्ध झाली होती. तीं पुढीलप्रमाणें:—

१. **वेद व भौतिक शास्त्रें.**—या निबंधांत अर्वाचीन काळांतल्या सगळ्या भौतिक सुधारणा (आगगाड्या, तारायंत्रें, एक्सकिरण, फोटोग्राफी, विमानें वगैरे) वेदांत आहेत असें दाखविलें आहे.

२. **जगूं द्यावीं कीं मरूं द्यावीं ?**—या निबंधांत हिंदु निराश्रित मुलांनीं जगून ख्रिस्ती होण्यापेक्षां त्यांनां मरूं देणें हेंच सनातन धर्माच्या दृष्टीनें योग्य आहे, असें श्रुतिस्मृतिपुराणादि ग्रंथांच्या आधारानें स्थापित केलें आहे.

३. **सामाजिक सुधारणेचें खूळ.**—( क्रमशः ) या विस्तीर्ण निबंधांत एकंदर सामाजिक सुधारणामतांचें उत्कृष्ट खंडन आणि विधवावपनासारख्या सनातन चालींचें सशास्त्र मंडन केलें आहे.

**४. संगीत फक्कडराव नाटक.**—( क्रमशः ) हें प्रसिद्ध नाट्याचार्य गणपतराव कुळकर्णी 'संगीत वेश्यागमन, संगीत गुल्जारवेणू, संगीत तोंडचे हिशोब' इ० इ० प्रसिद्ध ग्रंथांचे कर्ते यांनीं लिहिलें असल्यामुळें अधिक प्रशंसा करण्याचें कारण नाहीं.

**५. गोदू आणि माधवराव.**—( क्रमशः ) शृंगाररसप्रधान कादंबरी. हीहि एका प्रसिद्ध एम. ए., एल. एल. बी. नें लिहिली आहे.

याप्रमाणें प्रत्येक पत्रांतून जाहिरात फडकतांच आगाऊ वर्गणीदारांकडून मनी-आर्डरींवर मनीआर्डरी येऊं लागल्या. रिकामटेकड्या लेखकांनां गांठून त्यांच्या-कडून लेख लिहवून ते प्रसिद्ध करण्याची हातोटी गणपतरावांनां थोड्या दिवसांच्या प्रयत्नानें साधली. दोनतीन अंक काढल्यावर मासिक पुस्तक अजीबात बंदच केलें व लोकांकडून वर्षाच्या वर्गण्या आल्या होत्या त्या अर्थात् गिळंकृत केल्या. या रोजगारांतहि हजारपांचशें रुपये मिळाले.

याप्रमाणें तीनएक हजार रुपयांची माया जवळ करून गणपतरावांची स्वारी घरीं गेली. सरस्वतीबाई आपले पतीराज एवढी प्रतिज्ञा करून गेले आहेत, पण संध्याकाळीं हात हालवितच येतील अशी अपेक्षा करून बसली होती; पण एक दिवस गेला, दोन गेले, तीन गेले, आठवडा गेला तरी परत आले नाहींत, तेव्हां ती बिचारी भयभीत होऊन माहेरीं गेली व भावाकडून तिनें शोध करविला. तेव्हां स्वारी मुंबईस आपल्या मेव्हण्याच्या घरीं असून पैसे मिळविण्याच्याच खटपटींत आहे असें तिला कळलें, तेव्हां तिचा जीव अंमळ स्वस्थ झाला. आपली बायको माहेरीं भावाजवळ आहे हें गणपतरावांनां कळलें तेव्हां मुद्दाम मोठ्या थाटानें ते सासुरवाडीं गेले, आणि तेथें आपल्या नूतन संपादित वैभवाचें प्रदर्शन करून व सरस्वतीबाईला घेऊन स्वारी घरीं परत आली. आपण कठोरपणानें व धिटाईनें टाकून बोलल्याबद्दल सरस्वतीबाईनीं क्षमा मागितली; पण "तूंच गुरु झालीस. तूं तसें न बोलतीस, तर मी घणघणलों नसतों, आणि येनकेन प्रकारेण हा पैसा मीं मिळवून आणिला तो आणला नसता," असें गणपतरावांनीं ह्मणून तिचें समाधान केलें. जी सरस्वतीबाई नवऱ्याला पूर्वीं झिडकारित असे, तीच आतां त्याच्याशीं मोठ्या प्रेमानें बोलूंचालूं लागली!

## गोष्ट १९ वी.

# जोधबाई.

एका नदीच्या किनाऱ्यावर स्मशानभूमींत जळून भस्म झालेल्या चितेसमोर ती पहा कोणी एक भिकारिणीसारखा वेष घेतलेली, पाठीवर केश मोकळे सोडलेली आणि अत्यंत फिकट चेहऱ्याची स्त्री बसली आहे. ती एखाद्या संन्यासिनी-प्रमाणें दिसत आहे. निर्जीव, प्राणविहीन चितेच्या राखेप्रमाणेंच हुबेहूब तिची स्थिति झाली आहे. तिचें हृदयहि पण आज सुखदुःखविकाररहित आहे असें दिसतें. सर्व शरीरांत धडधड पेट घेणाऱ्या अग्नीचें शमन करण्यांत हृदयांतील सर्व रुधिर आटून गेलें. ती अगदीं निर्जीव झाली आहे. जें अपक्व हृदय नूतन प्रेमानें, नूतन आशेनें, नूतन इच्छेनें नुक्तेंच कोठें प्रफुल्लित झालें होतें, त्याचा असा आकस्मिक दुःखकारक भयंकर परिणाम होईल असें कोणालातरी वाटलें होतें काय? सूर्य अस्तास गेला; रात्र झाली; आणि आतां चक्रवाकी पक्षिणीला आपल्या प्रियसख्याच्या विरहांत होरपळत ही सर्व रात्र कंठावी लागणार! हाय! हाय!! जोधबाई! तुझी चक्रवाकीपेक्षांहि भयंकर स्थिति होय! आतां ही कठोर रात्र या जन्मीं तरी कसची सरते!

जेव्हां जोधबाई विकसित कुसुमाप्रमाणें प्रफुल्लित मुखानें हंसतहंसत आपल्या सख्याचा हात धरून या नदीकिनाऱ्यावर बसून गोष्टी करित असे, जेव्हां नदीच्या पाण्यांत फुलें टाकून आपल्या लहान लहान सुकोमल पायांनीं जलतरंगा-बरोबर त्यांनां इकडे तिकडे करित असे, जेव्हां पाण्यांत शिरून उभयतां एकमेकांवर पाणी उडवित क्रीडत असत, तेव्हां कोणाला तरी वाटलें होतें काय, कीं, या सर्वांचा एखादे दिवशीं अशा प्रकारचा दुःखप्रद परिणाम होईल?

एके दिवशीं या नदीकिनाऱ्यावर बसून कुमार आपल्या भावी स्थितीचें मनोहर वर्णन करित होता; सुखप्रद कल्पनांनीं सुखमय, उज्ज्वल चित्र काढून दाखवित होता; तेव्हां जोधबाईला जागृतपणीं तर काय परंतु स्वप्नांतहि वाटलें नसेल कीं, आपल्याला एखादे दिवशीं आजच्या स्मशानवासिनी संन्यासिनीच्या वेषानें याच नदीकिनाऱ्यावर यावें लागेल. हाय हाय! कर्मांची गति गहन आहे!

[ २ ]

वसंतऋतूंतील प्रभातसमयींची वेळ. नदीच्या पात्रावर रविकिरण तरंगभंगानें कंपायमान होत होते. सुशीतल सुगंधित मंद वायु नदीच्या पृष्ठावरील क्षुद्र लाटांबरोबर खेळत होता. एका मंजिरीयुक्त आम्रवृक्षाखालीं नदीकिनाऱ्यावर

कुमार आणि जोधबाई हीं दोघें बसलीं होतीं. वर कोकिळा सुमधुर पंचम स्वरांत तान घेत होती. जोधबाईचें मुख म्लान झालें होतें. तिच्या चेहऱ्यावर स्मिताची एक लकेरहि दिसत नव्हती. डोळ्यांत अश्रु भरून आले होते. मेवाडचा सेनापति अजयसिंह हा यवन सेनापति मोहबतखान याच्या गतीस प्रतिबंध करण्यासाठीं सरहद्दीवरील पर्वतावर जाणार होता. कुमारहि या वेळीं अजयसिंहाबरोबर लढाईवर जाणार होता. या समाचारानें जोधबाई अत्यंत दिलगीर झाली होती. एका डहाळीवरच्या दोन फुलांप्रमाणें तीं दोघेंहि एकामेकांच्या सहवासांत लहानाचीं मोठीं झालेलीं. कुमार गेल्यावर आपल्या एकटीच्यानें काळ कसा कंठवेल ? जोधबाई विरहव्यथेनें व्याकुळ झाली होती. एकदम तिच्या नेत्रांत अश्रु उभे राहिले. कुमार जोधबाईचे डोळे पुसून म्हणाला "छे: वेडी कुठली ! अशी अधीर कां होतेस ? मी लवकरच परत येईन."

यावर जोधबाईनें कांहींएक उत्तर दिलें नाहीं. मात्र अश्रुपूर्ण लोचनांनीं ती कुमाराच्या मुखाकडे स्तब्धपणें पहात राहिली. कुमार पुनः म्हणाला "जेव्हां शत्रूचा नाश करून महाराजांकडून जयाची माळ मिळवून तुझ्या गळ्यांत घालीन तेव्हां—"

इतकें म्हणतां म्हणतां त्याचें मुख प्रफुल्लित झालें. डोळ्यांत अश्रु उभे राहिले आणि त्यामुळें ते अधिकच तेजस्वी दिसूं लागले. त्याची आशा, भावी सुस्थितीचें मनोहर तेजस्वी चित्र यावेळीं त्याच्या नेत्रांसमोर मूर्तिमंत उभें राहिलें. तो एकवार पुन्हा गहिंवरून म्हणाला "मग जोधबाई, त्यावेळीं कसें ?"

जोधबाई सजल नेत्रांनीं त्याच्याकडे पहात किंचित् हंसली व तिनें झटकन् खालीं मान घातली. कुमाराच्यानेंहि पुढें बोलवलें नाहीं. जोधबाईचा हात आपल्या हातांत घेऊन तो आनंदविकसित नेत्रांनीं तिच्याकडे केवळ मुग्धवत् पहात राहिला. अशा स्थितींत कितीतरीवेळ निघून गेला. इतक्यांत एकाएकीं डोंगराच्या बाजूस सैन्याच्या गडबडीचा, घोड्यांच्या टापांचा आणि रणवाद्यांचा कर्कश ध्वनि त्यांच्या कानीं पडला. त्यासरशी कुमार झोंपेंतून एकदम दचकून जागा झाल्याप्रमाणें करून म्हणाला "राजधानींतून लष्कर येत आहेसें वाटतें. जोधबाई, चल ये, आपण तिकडे जाऊन पाहूं." नंतर दोघेंहि उठलीं व रस्त्यावर येऊन उभीं राहिलीं.

आज रस्त्यावर पुष्कळच गर्दी आहे. कोण गडबड ती! अशी धामधूस या डोंगरी गांवांत पूर्वी कधींहि कोणाच्या पहाण्यांत आली नसेल. राजधानींतून सैन्य आलें आहे. सुसज्जित घोडेस्वार एका रांगेंत चालले आहेत. त्यांच्या भाल्यांवर

सूर्यकिरण पडल्यामुळें ते चकाकत आहेत. गांवांतील सर्व लोक आपआपला उद्योग सोडून हा सैन्याचा भव्य देखावा पहाण्याकरितां एकच गर्दी करून जमले आहेत. जोधबाई हा एकंदर विस्मयजनक अपूर्व देखावा पाहून इतकी कांहीं मुग्ध होऊन गेली कीं, त्या गडबडींत कुमार तिजपासून कधीं दूर झाला तें तिला कांहींच समजलें नाहीं. पण पुढें कुमार जवळ नाहीं असें तिनें पाहिलें तेव्हां तिचे विशाल मुग्ध नेत्र भयभीत हरिणीप्रमाणें चंचल दिसूं लागले. तिचें सडपातळ नाजुक शरीर वेलीप्रमाणें थरथर कांपूं लागलें. तिनें पाहिलें कीं, एक बेफाम झालेला घोडा भरधाव सुटून मिळेल त्याला पायाखालीं तुडवित तिच्याकडेच धावत येत आहे. फक्त एक दोन पळांचाच कायतो अवकाश, ती त्याखालीं चेंगरलीच असती. पण इतक्यांत एक भयंकर किंकाळी फोडून ती तेथेंच मूर्च्छित होऊन पडली. पडतां पडतां निमिषार्धांत एक घोडेस्वार पुढें झाला व त्यानें तिला आपल्या बाहूंत सांवरून धरलें.

कांहीं वेळानें ती सावध झाली. तिनें आपले काळे विशाळ डोळे उघडले तों आपण आपल्याच घरांत पलंगावर निजलों आहों, हें तिनें पाहिलें. आतांतर ती चांगलीच शुद्धीवर आली होती. तिनें पुनः पाहिलें तों एक सुंदर तरुण पुरुष आपल्या शेजारीं बसला आहे आणि औत्सुक्यपूर्ण दृष्टीनें आपणाकडे एकसारखा टक लावून पहात आहे, असें तिला आढळून आलें.

[ ३ ]

कुमार एकटाच बसला होता. नदीकिनाऱ्यावरील बकुल वृक्षाखालची भूमि फुलांनीं पूर्ण आच्छादित झाली होती. परंतु जोधबाई आज हार गुंफावयास आली नव्हती. आतांशा जोधबाई पूर्वींप्रमाणें कुमाराबरोबर येथें खेळावयास येत नसे. आणि यदाकदाचित् एखादे दिवशीं आलीच तर ती आतां कुमाराशीं पूर्वींसारख्या गोष्टी करित नसे. फुलें वेंचून व त्यांचा गजरा गुंफून ती आतां पहिल्यासारखी हंसतहंसत कुमाराच्या गळ्यांत हार घालित नसे. कुमार तिच्या अंबाड्यांत फूल खोवित असतां ती त्याजकडे स्मित करून उत्फुल्ल नयनांनीं पहिल्यासारखें आतां पहात नसे. आतां ती सर्व स्थिति पालटली होती. कुमार तिला हंसविण्याकरितां हजारों प्रयत्न करी परंतु तिच्या मुखावर पहिल्यासारख्या सरळ शुद्ध प्रेमाच्या हास्याची झांक आतां कधींहि दिसत नसे. परंतु अजयसिंहाला पहातांच तिच्या ह्या स्थितींत एकदम विलक्षण फेर होत असे. तिच्या नयनांची स्वाभाविक ज्योति, व ओष्ठावरचें मधुर प्रेमस्मित त्याला पहातांच आपोआप विकसित होत असे.

कुमार आणि जोधबाई हीं परस्परांच्या सहवासांत लहानाचीं मोठीं झालीं होतीं. त्यांचें बाळपण एकमेकांशीं खेळण्यांत गेलें होतें. तीं दोघेंहि आपापसांत निष्कपट रीतीनें वागत असत. एकाच्या प्रेमाबद्दल दुसऱ्यास अविश्वास वाटत नसे. असें होतें तरीपण त्यांचें अद्याप लग्न झालें नव्हतें. जोधबाई उपवर झाली ह्मणजे मग आपण तिच्या बापाजवळ तिजविषयीं मागणी करूं असा कुमाराचा विचार होता. परंतु त्याची ही इच्छा पूर्ण होण्याचे दिवस नजीक आले तोंच अकस्मात् त्याच्यावर वज्रपात झाला. आपण लढाईत जाऊन शत्रूचा संहार करूं, मोठें यश संपादन करूं, मग महाराज आपणास आपल्या पराक्रमाबद्दल चांगलें बक्षिस देतील, त्या विजयचिन्हांनीं युक्त झाल्यावर मग लग्नाकरितां तिची सम्मति विचारूं, आणि मग ती मोठ्या आनंदानें आपल्या गळ्यांत माळ घालील, असें सुखमय आनंदप्रद स्वप्न तो अनुभवित असतां अचानक त्याची निद्रा भंग पावली. तो जागा झाला. जोधबाई आतां आपली राहिली नाहीं, ती अजयसिंहाची झाली, असें त्याला कळून चुकलें.

कुमार एकटा बसल्याबसल्या आपल्याशींच विचार करित होता, आणि जोधबाईची मार्गप्रतीक्षा करित होता. लढाईला जाण्यापूर्वी एक वेळ तिची आपली शेवटली भेट व्हावी अशी त्याची फार इच्छा होती. तो ह्मणाला "जर तिचा विसर पडला तरच आपण देशीं परत येऊं; नाहींतर तिची व आपली ही शेवटचीच भेट. काय, आपणास तिचा विसर पडणार नाहीं? अरेरे! आपल्या जीवनाच्या आशेचा एक दीप विझला! रणांगणावर शत्रूशीं झुंजून यश मिळवावें ही आपली लहानपणापासून आकांक्षा. आईच्या मांडीवर बसून बाल्यकालीं यवनांच्या दुष्टतेच्या आणि अत्याचाराच्या गोष्टी ऐकतांऐकतां आपलें सारें रक्त उष्ण होऊन जाई; शत्रूच्या रुधिरानें तलवार लाल करून आपल्या पित्याप्रमाणें यशस्वी व्हावें आणि प्रख्यात वीरांत आपली गणना व्हावी ही किती दिवसांची आपली इच्छा. जोधबाईचें प्रेमदेखील माझ्या या इच्छेस प्रतिबंध करूं शकलें नाहीं, उलट ती अधिकाधिक वृद्धिंगतच होत गेली. कारण जोधबाईचा लाभ होण्यास एकच मात्र उपाय, आणि तोहि केवळ लढाईत यश संपादणें हाच होय, असें मला वाटत होतें. त्यामुळें एकाच काळीं यश आणि प्रेम यांच्या लालसेनें माझ्या हृदयांत एक अपूर्वमिश्र मनोविकार जागृत केला होता. परंतु हाय! मध्येंच या अजयसिंहानें येऊन आमचा दोघांचा नाश केला. आतां एक यशाची आकांक्षा मात्र उरली आहे, प्रेमाकांक्षा तर कधींहि पूर्ण होणार नाहीं!

जोधबाईची आतां अजयसिंहावर प्रीति बसली आहे. ती आतां त्याची झाली. त्याच्याशीं लग्न करण्याचें तिनें वचन दिलें आहे. लढाई आटोपल्यावर त्या उभयतांचा विवाह होणार आं? आणि मी?—"

हे व अशाच प्रकारचे दुःखद विचार कुमाराच्या मनांत चालले होते. मध्यें मध्यें तो दीर्घ व उष्ण निश्वासहि टाकित होता.

कुमार एकटा बसला होता. नदी पहिल्याप्रमाणेंच आजहि गंभीर पण मंजुळ रव करित वहात होती. अस्तास जात असणाऱ्या दिनमणीनें संध्याकाशास आपल्या रक्तवर्ण किरणांनीं एक अपूर्व शोभा आणिली होती. त्याचें प्रतिबिंब खालीं नदीच्या स्फटिकवत् स्वच्छ पाण्यांत फारच मनोहर दिसत होतें. वडाच्या एका वांकलेल्या डहाळीनें दररोजप्रमाणें आजहि पण त्या सुवर्णस्रोतांत कृष्णवर्णाची दाट छाया पसरून दिली होती. कुमार पाण्यांत पडलेल्या आपल्या छायेकडे पहात होता. सूर्य अस्तास गेला. आकाश फारच लालभडक दिसूं लागलें. नदीच्या पाण्यांत पडलेल्या वटवृक्षाच्या छायेवर आणखी कोणाची छाया त्याला अचानक दिसली. त्याची छाती धडधड उडूं लागली. थोडा वेळपर्यंत त्या छायेचें निरीक्षण केल्यावर तो तेथून उठला; आणि हळूहळू वडाच्या झाडाखालीं जाऊन उभा राहिला. तेथें जोधबाई उभी होती. पश्चिमेकडे आकाशाच्या प्रशांत लालींत जोधबाईचा अश्रुपूर्ण व खिन्न चेहरा उज्वल आणि मनोहर दिसत होता. जोधबाईची दृष्टि वर आकाशाकडे लागली होती व डोळ्यांतून घळघळ अश्रु वहात होते. जोधबाईच्या नेत्रांत अश्रुबिंदु पाहून जणूं काय कोणी आपला हृत्पिंडच ओढून नेत आहे असें कुमाराला होत असे. आजहि त्याला तसेंच झालें. तो स्वतांचें दुःख गिळून अगदीं खिन्नस्वरानें ह्मणाला "जोधबाई, तूं कां बरें रडतेस? मला नाहीं का सांगायचें?"

जोधबाईवर कुमाराचें अत्यंत प्रेम होतें. जोधबाईचेंहि कुमारावर एके समयीं प्रेम होतें. परंतु आतां आपलें प्रेमस्थान दुसरें झालें हें पाहून कुमाराला अतोनात वाईट वाटेल, त्याला अतिशय दुःख होईल असें जोधबाईच्या कधींहि मनांत आलें नाहीं. ती केवळ व्यथित हृदयानें पहिल्याप्रमाणेंच आपल्या सख्याजवळ विश्वासपूर्वक आपलें हृदय उघडें करून रडतरडत ह्मणाली "अजयसिंह लढाईवर जात आहेत. मला वाटतें कीं, त्यांची आतां पुनः भेट होणार नाहीं."

कुमारानें हळुहळू एक दीर्घ व उष्ण असा निश्वास टाकला. आपल्या दु:खाचा तीव्र वेग आंतल्या आंत दावून तो असद्गदित व निश्चयाच्या स्वरानें ह्मणाला "जोधबाई, तूं काळजी करूं नको. त्याची व तुझी पुन्हा भेट होईल यांत तिळमात्र शंका नाहीं."

[ ४ ]

आतां कांहीं आशा राहिली नव्हती. अजयसिंह यवनसैन्याच्या भयंकर लाटेच्या गतीस प्रतिबंध करण्यास अगदींच असमर्थ झाला होता. मेवाडच्या सैन्याला शत्रूच्या प्रचंड लष्करानें टोळाप्रमाणें घेरून टाकिलें होतें. हतबुद्ध, विशृंखल, भयभीत अथवा निराश असे सैन्यांतील शिपाई कोणी उभे राहून भाल्याचा आघात सहन करित आहेत, कोणी तरवार चालवित आहेत, कोणी सेनापतीच्या हुकुमास न जुमानतां पळत आहेत असा हिंदु सैन्याच्या चारी बाजूंस भय, निराशा आणि प्रलय होता. जिकडेतिकडे हाहाकार ऐकूं येत होता. अजयसिंह घाबरला. त्यानें तहाचें बोलणें लावण्याकरितां मनुष्य पाठविला. यवनसैन्यांत गर्वध्वनि उठला. कुमारसिंह हा वेळपर्यंत दुसऱ्या बाजूस दोन हजार मनुष्यांनिशीं शत्रूचें दमन करण्याचा आटोकाट प्रयत्न करित होता. सुदैवानें तिकडे शत्रूंचा निःपात करून मग तो अजयसिंहाच्या बाजूस मदतीस धावत आला. त्याच्या यशस्वी सैन्याच्या रणगर्जनेनें आणि विजयानंदध्वनीनें अजयसिंहाचे भयानें सैरावैरा पळत असलेले लोक उमेदीनें आणि धैर्यानें परत मागें फिरले. कुमारसिंह जयोन्मत्त होऊन सैन्यांतील शिपायांनां समोर उभा राहून हुकुमांवर हुकूम सोडूं लागला. उत्साहभरित होऊन जयध्वनि करित प्रबल प्रतापानें शिपाई आपलीं शस्त्रास्त्रें चालवूं लागले. इतक्यांत भाग्यस्रोत फिरला. यवन सेनापति घाबरला. त्याच्या सैन्यांत मूर्तिमंत भीति दिसूं लागली. सैन्य सैरावैरा पळूं लागलें. भिऊन पळत सुटलेल्या मोहबतखानाच्या मागें कुमारसिंहानें आपला घोडा फेंकला. मोहबतखानाचा जखमी घोडा कांहीं दूरपर्यंत धावत गेला, परंतु नंतर जमिनीवर पडला. कुमारसिंह घोड्यावरून उतरून खानाजवळ जाऊन उभा राहिला. खान बेशुद्ध होऊन पडला होता. आपल्या बरोबरच्या मंडळीस खानास उचलून न्यावयास सांगून कुमार छावणीकडे निघाला. अर्धेरस्त्यावर आला असेल नसेल तों अजयसिंह एका झाडाखालीं पडला आहे असें त्याला दिसलें. लगेच तिकडे त्यानें आपला घोडा वळविला. अजयसिंह घायाळ झाल्यामुळें अगदीं असहाय स्थितींत पडला होता. कुमारसिंह घोड्यावरून खालीं उतरला.

त्याजपासून अजयसिंह दोनच हातांच्या अंतरावर असेल—अकस्मात् एका यवन शिपायानें नेम धरून अजयसिंहावर आपला भाला फेंकला. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच अजयसिंहास आपल्या आड करून कुमारसिंहानें भाल्याचा मारा आपल्या अंगावर घेतला. कुमारसिंह क्षणांत जखमी होऊन भूमीवर आडवा पडला. पडतांपडतां जोधबाईचा निरोप घेतेवेळचें तिचें तें अश्रुयुक्त, दीन, करुण आणि निराशापूर्ण मुख त्याच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें.

लढाईंत जय मिळविल्यावर अजयसिंह आपलें सैन्य घेऊन राजधानीस परत आला. जखमी झालेल्या कुमारसिंहालाहि त्यानें बरोबर आणलें होतें. त्याला फार भयंकर घाव लागला होता. त्याच्या जगण्याची फारच थोडी आशा होती.

[ ५ ]

संसार जादूच्या खेळाप्रमाणें आहे. अदृष्ट जादूगार कोणत्या कौशल्यानें हा खेळ चालवित असतो हें प्रत्यक्ष देवांनांहि समजणें दुष्कर, तेथें आम्हां क्षुद्र कीटकवत् मानवांचा पाड काय? कुमारसिंहाच्या पराक्रमामुळें मेवाडच्या रजपुतांनां अविंधांवर जय मिळाला होता; परंतु सर्व राजधानी अजयसिंहाच्या यशोरवानें दुमदुमत होती. सर्वत्र त्याचेंच नांव, त्याचीच कीर्ति, त्याचीच प्रशंसा! खता कुमारसिंहाच्या सैन्यांतील माणसांनांदेखील अजयसिंहाच्या या फुकटच्या यशा-विरुद्ध एक शब्दहि बोलण्याचें धैर्य होत नव्हतें. कदाचित् तसें केल्यास अजयसिंह आपणावर नाराज होऊन काय शिक्षा करील आणि काय नाहीं, अशी त्यांनां जबरदस्त भीति वाटत होती. प्रथमप्रथम त्यांनीं शहरांतील आपल्या मित्रमंडळीस सर्व खरी हकीगत सांगण्यास कांहींएक कमी केलें नाहीं; परंतु त्यांची ती गोष्ट ऐकून ते हंसून उलट त्यांचीच टर उडवूं लागले. त्यांनां ती गोष्ट तिळभरहि खरी वाटली नाहीं. अजयसिंहाच्या लोकांनांहि या गोष्टीची कुणकुण लागली व त्यांनां बराच संशयहि पण आला. परंतु ते अजयसिंहाची जाहीररीतीनें स्तुतीच करित राहिले. कुमार खाटेवर पडला होता. तो अतिशय अशक्त झाला होता. त्या विचाऱ्याच्या पक्षांत कोणीहि नव्हतें.

राजधानींत खूप धामधूम होऊन राहिली होती. महाराज आज सेनापतींचा योग्य सन्मान करून त्यांनां बक्षिस देणार होते. दिल्लीदिवाणखान्यांत मोठमोठे अमीर, उमराव, सरदार, दरकदार यांनीं अतिशय गर्दी करून सोडली होती. जिकडेतिकडे थाटमाट आणि चकचकाट उडाला होता. शेंकडो शिपाई आणि नागरिकजन सभेंत येऊन उत्सुक चित्तानें उभे होते. इतक्यांत राजा

राजसिंहासनावरून उठला. त्यानें एक हिरेजडित मुठीची तलवार म्यानांतून काढून तो ह्मणाला "अजयसिंह, शत्रूपासून आज तुह्मीं मेवाडचें संरक्षण केलें. तुह्मीं जें महत्कृत्य केलें आहे त्याचें हें योग्य बक्षीस नाहीं, तरी पण—"

राजाचें बोलणें पुरें झालें नाहीं तोंच प्रेक्षकसमुदायाच्या जयध्वनींनें सारा दिवाणखाना थरारून गेला. आणि तो जयध्वनि शांततेंत विलीन होतो न होतो तोंच एक वृद्ध शिपाई झट्कन् पुढें येऊन मोठ्यानें ह्मणाला "महाराणा, राजाधिराज! आपण ज्या महत् कृत्याकरितां अजयसिंहास बक्षिस देत आहां, त्यावर त्याचा तिळमात्र हक्क पोंचत नाहीं. अजयसिंहानें युद्धांत जय मिळविला नाहीं; उलट लढाईत तो पराभव पावून तहाचें बोलणें लावण्यास तयार झाला होता. परंतु इतक्यांत माझ्या प्रभु कुमारासिंहानें येऊन शत्रूस पिटाळून लाविलें. त्यांनीं आपल्या बाहुबळावर जय संपादन केला आहे."

त्यासरशी चोहींकडे विस्मयजनित निस्तब्धता पसरली. अजयसिंहाचें मुख रागानें रक्तवर्ण झालें. महाराजांनीं तलवार परत म्यानांत घालून अजयसिंहास विचारलें "सेनापति, खरें काय आहे तें आधीं सांगा."

अजयसिंहाचें रक्तवर्ण मुख एकदम फिक्कें पडलें. तो घाबरला. आतां काय करावें या विचारांत तो अगदीं मूढाप्रमाणें होऊन बसला. खोटें बोलावें तर आपण क्षत्रिय; आणि खरें सांगावें तर तिकडूनहि पंचाईत. आजपर्यंत आपली जी बडेजाव झाली, आपणास जो मानसन्मान मिळत आला तो एकदम परक्याचा होणार! दुसऱ्याचें यश, गौरव, कीर्ति यांवर आपण निवळ घाला घातला. तें आपण चोराप्रमाणें भोगलें. आतां तें ज्याचें त्यास परत मिळणार, आणि त्याबरोबरच मग आपली या भरसभेंत छीःथू होणार. ज्या मुखांतून आपलें स्तुतिस्तोत्र बाहेर पडलें त्यांतूनच आतां शिव्यांचा वर्षाव होणार. असा विचार करितांकरितां त्याचें सर्व मानसिक धैर्य पार लयास गेलें. तो ह्मणाला "राजाधिराज पृथ्वीपते! जो मला दोषी ठरवित आहे त्यानें आधीं सबळ पुरावा पुढें करावा. पुराव्यावांचून न्याय करूं गेल्यास हटकून अन्याय होणार."

अजयसिंहाच्या या महत्वाच्या गोष्टीस सर्व सभासदांनीं तत्काळ रुकार दिला. महाराज त्या वृद्ध शिपायास ह्मणाले "रणसिंह, तुझ्या धन्यानें जय मिळविला याचा पुरावा काय?"

रणसिंह यत्किंचित्‌हि न डगमगतां शांतपणें आणि धिटाईनें ह्मणाला "महाराज, आणखी दुसरा पुरावा कशाला हवा? मी क्षत्रिय आहें इतकाच पुरावा बस आहे. क्षत्रिय कधींहि खोटें बोलत नाहीं!"

यावर महाराज ह्मणाले "तें खरें. परंतु अजयसिंहदेखील क्षत्रिय आहे. तुझें बोलणें खरें मानलें तर अजयसिंह चोर ठरतो."

रणसिंह आपला राग आवरूं शकला नाहीं. तो मोठ्यानें ह्मणाला "अजयसिंह चोराहि पेक्षां अधम आहे! कुमारसिंहानें स्वताच्या जीवावर उदार होऊन याचे प्राण वांचविले; परंतु हा कृतघ्नापेक्षांहि कृतघ्न आहे!"

यावर महाराज क्रुद्ध होऊन ह्मणाले "रणसिंहा, गप्प रहा. ही राजसभा आहे. शिव्या देण्याची जागा नाहीं. जर कांहीं पुरावा असेल तर तो पुढें आण. नाहींतर इथून चालता हो."

रणसिंह ह्मणाला "पुरावा कुमारसिंहाचीं दोन हजार माणसें आहेत तीं देतील."

महाराज ह्मणाले "दोन हजार माणसांची आह्मांस गरज नाहीं. त्यांतून फक्त दोघांनांच बोलाव."

रणसिंह माणसांनां बोलवावयास जाऊं लागला. तेव्हां महाराज ह्मणाले "तुझे जाण्याची जरूर नाहीं. आणखी कोणी शिपाई बोलावील."

तेथें उभे असणाऱ्या शिपायांपैकीं चारचौघे एकदम पुढें येऊन ओरडून ह्मणाले "कुमारसिंहाच्या शिपायांपैकीं दोघांनीं इकडे यावें. त्यांची साक्ष पाहिजे आहे."

हें ऐकून कुमारसिंहाचे मनुष्य घाबरले. त्यांनां वाटलें, आपण अजयसिंहाविरुद्ध जें कांहीं लपूनछपून बोललों असूं तें सर्व आतां उघडकीस आलें. न्याय अजयसिंहाच्या बाजूस होणार अशी त्यांनां एकप्रकारें खातरी वाटूं लागली, आणि आपली साक्ष घेऊन नंतर आपणांस सुळीं देणार असें त्यांनां पक्कें वाटूं लागलें. यामुळें कोणीहि पुढें आला नाहीं. "महाराज कुमारसिंहाच्या दोन माणसांस बोलावित आहेत, त्यांनीं पुढें यावें," असें ते शिपाई पुनः ओरडले; परंतु कोणीहि पुढें होईना. जिकडेतिकडे शांत व स्तब्ध. "येथें कुमारसिंहाचें कोणी माणूस नाहीं," असें ह्मणून ते शिपाई परत आपल्या जागेवर गेले.

कुमारसिंहाच्या सैन्यांतील एकहि माणूस साक्ष देण्यास पुढें आला नाहीं हें पाहून रणसिंहाचे डोळे क्रोधानें इंगळासारखे लाल झाले. क्रोधातिशयानें त्याच्या तोंडांतून एकहि शब्द फुटेना. त्यावर महाराज ह्मणाले "रणसिंहा, तुझा आणखी कांहीं पुरावा असेल तर तोहि पुढें आण."

रणसिंह ह्मणाला " महाराज, स्वतः कुमारसिंहाचीच जबानी घ्यावी, ह्मणजे खरें काय आहे तें कळून येईल."

तेव्हां अजयसिंह ह्मणाला " महाराज, सध्या कुमारसिंह अगदीं अंथरुणास खिळून राहिला आहे. त्याला इथें आणल्यास कदाचित् अधिकउणा प्रकार होण्याचा संभव आहे."

तेव्हां रणसिंह ह्मणाला "महाराज, क्षत्रियांनां आपल्या प्राणांपेक्षां आपलें नांव, यश, वीर्य, कीर्ति हीं अधिक प्यार आहेत. हीं राखण्याकरितां ते पाहिजे तें करतील. आपण कुमारसिंहास इथें बोलवावाच."

महाराज ह्मणाले "ठीक आहे, त्याला पालखींत घालून आणा."

रणसिंह आपल्याबरोबर दोघां शिपायांस घेऊन कुमारसिंहास आणावयास गेला. शिपायांनां एक पालखी आणण्यास सांगून रणसिंह कुमारसिंहाकडे निघाला. तो कुमाराच्या खोलींत येऊन उभा राहिला तोंच कुमार ह्मणाला " रणसिंहा, बाबा तूं कुठें गेला होतास? अरे, मी तुला केव्हांचा हांका मारित आहें; परंतु एक वेळहि ओ दिली नाहींस."

रणसिंह खिन्नवदनानें ह्मणाला "महाराज, मीं ऐकलें कीं, राजाधिराज महाराणा हे अजयसिंहानें लढाईत जय मिळविल्यामुळें त्यास शिरपाव देणार आहेत. जो खराखरा विजयी आहे तोतर अंथरुणास खिळून पडला आहे. त्यांचें नांव कुणाच्याहि मुखावाटे निघत नाहीं. आणि तो अधम, पापी, भित्रा, पाखंडी अजयसिंह आज खोटा गौरव मिळवित आहे. हें ऐकून मला सहन झालें नाहीं. याकरितां आपणास एकटेंच टाकून मी खरीखरी हकीगत सांगावयास राजसभेंत गेलों होतों."

हें ऐकून कुमार निस्तब्ध झाला. आपलें यश अजयसिंह मनांत लेशमात्र संकोच न ठेवतां आज ग्रहण करित आहे! रणसिंह ह्मणाला " राणाजींचा माझे बोलण्यावर विश्वास बसत नाहीं. त्यांनीं आपल्याला बोलाविलें आहे."

रागानें कुमाराचें सर्व शरीर थरथर कांपूं लागलें. आपली जोधबाई घेऊनच हा दुष्ट अजय स्वस्थ बसला नाहीं. स्वताच्या मनगटाच्या बळावर आपण जें नांव, यश आणि कीर्ति मिळविली तीं सर्व आज हा अधम तस्कराप्रमाणें आपणापासून चोरून नेत आहे असें पाहून तो त्वेषानें बिछान्यावर एकदम उठून बसला. पण छातीवर भाल्याची जखम लागली होती तींतून रक्त वाहूं लागल्यामुळें तो परत

बिछान्यावर आडवा झाला. तो पडल्यापडल्या ह्मणाला "रणसिंहा, म्याना आत्तांच्या आत्तां घेऊन ये. मी सभेंत जाणार."

रणसिंहाचे डोळे अश्रूंनीं भरून आले. तो ह्मणाला "महाराज, म्याना आणण्याकरितां लोक गेले आहेत."

थोड्या वेळानंतर कुमारसिंहाला घेऊन म्याना राजसभेकडे जाऊं लागला. थोड्याच वेळांत तो सभेंत जाऊन पोहोंचला. कुमाराच्या दुर्बळ परंतु उदार वीर मूर्तीच्या चेहऱ्याकडे सर्व पाहूं लागले. कुमारसिंहानें केवळ अजयसिंहाकडे कठोर दृष्टीनें पाहिलें.

कुमाराची पालखी महाराजांच्या अगदीं जवळ नेण्यांत आली. तेव्हां महाराज ह्मणाले "कुमारसिंहा, तूं सध्या मृत्युशय्येवर निजला आहेस. तूं थोड्याच वेळांत जेथें जाणार आहेस तेथें पृथ्वीवरील यश, गौरव, हीं कांहींएक येणार नाहींत. तेथपर्यंत तुजसह जाणारा तुझा सोबती एक काय तें सत्य आहे. असा विचार मनांत करून मला खरीखरी हकीगत सांग. लढाईंत तूं जय मिळविला कीं अजयसिंहानें ?"

उत्तर देण्यापूर्वीं कुमारानें पुन्हा एक वेळ अजयसिंहाच्या फिकट चेहऱ्याकडे पाहिलें. "आपण याच्याकरितां आपल्या अंगावर मरण ओढून घेतलें, आणि यानें तर आपणाशीं इतकें कृतघ्नपणाचें वर्तन केलें. मग आपण याचा सूड कां घेऊं नये? परंतु हा सूड कोणाचा ? अजयाचा कीं जोधबाईचा ? अजयाच्या अपमानाची गोष्ट ऐकून कोणाच्या जन्माचें मातेरें होणार ? आजन्म दुःख कोणास भोगावें लागणार ? स्वास्थ्य कोणाचें नष्ट होणार ? शांति कोणाची भंग पावणार? जोधबाईचा सूड आपण घेणार कीं काय ? तिच्या पित्यानें ही हकीगत ऐकिली ह्मणजे मग तो अजयसिंहास कधींतरी आपला जांवई करील काय ? जोधबाईचें हृदय सर्वदा निराशेनें दग्ध होणार ! अथवा यदाकदाचित् अजयाबरोबर लग्न झाल्यावर तिला ही खबर लागली तरी काय ? आपला पति इतका अधम, नीच, ठक आहे असें तिला कळलें ह्मणजे तिच्या मनाची काय स्थिति होणार ! तिच्या हृदयाचे शतशः तुकडे होतील !" असा विचार कुमाराच्या मनांत चालला आहे तोंच लढाईवर जाते वेळीं पाहिलेलें तें जोधबाईचें अश्रुपूर्ण खिन्न दीनवाणें मुख पुन्हा अकस्मात् त्याच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें. कुमाराला आतां खरें सांगण्याची

इच्छा राहिली नाहीं. कुमार ह्मणाला "राजाधिराज, मला ही हकीगत विचारूं नका. लोभापासून दूर रहाणें मनुष्याला अशक्य आहे."

महाराणा ह्मणाले "पहा बरें, तूं आपल्या मृत्युशय्येवर निजला आहेस."

"होय, माझ्याहि पण तें लक्ष्यांत आहेच."

"तर मग आतां तुला विचारायची गरज नाहीं. अजयसिंहाला शिरपाव द्यावाना ?"

कुमार ह्मणाला "बेलाशक द्यावा !"

तेव्हां महाराणा मोठ्यानें ह्मणाले "ऐका, अजयसिंह विजयी आहे. आतां कांहीं संशय राहिला नाहीं."

अजयसिंहाच्या नांवानें चारी बाजूंला जयध्वनि उठला. कुमारसिंह आपल्या मनाला घट्ट करून तें सर्व ऐकत होता. त्याचा गौरव दुसऱ्याच्या नांवानें ध्वनित झाला ! त्याला कसेंसेंच वाटलें. त्याचा प्राण कासाविस झाला. त्यानें आपणास तेथून लवकर न्यावें ह्मणून रणसिंहास सांगितलें.

पालखी उचलणारांनीं पालखी उचलली. रणसिंह अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्यांजबरोबर चालूं लागला. कुमार अर्ध मूर्च्छित अवस्थेंत जोधबाईचें मनांतल्या मनांत नामोच्चारण करूं लागला.

महाराजांनीं अजयसिंहाच्या कमरेवर भेटीची तलवार बांधून नंतर ते ह्मणाले "अजयसिंह ! आज तुह्मीं जें महत्कार्य बजाविलें आहे त्यास हें सामान्य निर्जीव रत्न योग्य बक्षिस नाहीं. माझ्या गृहांत सर्वश्रेष्ठ असाधारण रत्न—कीं ज्याच्या तेजानें माझें हृदयसुद्धां सुप्रकाशित होतें—आहे तें तुह्मांस अर्पण करून कृतज्ञतेची ओळख देईन !"

त्याच दिवशीं राजकन्या कमळाबाईसह अजयसिंहाचा विवाह झाला !

[ ६ ]

लढाई संपली. अजयसिंहानें महाविजय संपादन केला, ही बातमी खेड्यांत, गांवांत, नगरांत सर्वत्र पसरली. अजयसिंहाची प्रशंसा ऐकून जोधबाईचें मन सुप्रसन्न झालें. गर्वविस्फारित उत्सुक अंतःकरणानें ती अजयसिंहाची मार्गप्रतीक्षा करूं लागली. परंतु दिवसांवर दिवस, आठवड्यांवर आठवडे जाऊं लागले तरी अजयसिंहाच्या येण्याचें कांहींच चिन्ह दिसून आलें नाहीं. जोधबाईचें आनंदानें प्रफुल्लित झालेलें मुखकमल दिवसानुदिवस कोमेजूं लागलें. तिच्या सर्व आशा लयास जाऊं लागल्या. तिजवर निराशेचा पगडा बसूं लागला. ज्या जागीं तिनें अजय-

सिंहाला प्रथमच पाहिलें होतें तेथें रोजरोज एकटी जाऊन एका झाडाखालीं ती चिंतामग्न होऊन बसूं लागली. क्षणोक्षणीं दुरून येणाऱ्या घोड्यांच्या टापांचे आवाज ऐकून दचकून आशापूर्ण नेत्रांनीं ती त्या दिशेकडे पहात असे आणि बिचारी वरचेवर फसत असे. अशाप्रकारें दिवसभर तिष्ठत बसून नंतर शेवटीं निराश होऊन संध्याकाळीं घरीं माघारी जात असे. असा क्रम चालला असतां तिला घोड्यांच्या टापांचा आवाज एके समयीं ऐकूं आला व ती उत्सुकतेनें तिकडे न्याहाळून पाहूं लागली. आज ती फसली नाहीं. घोड्यांच्या टापांचा आवाज क्षणोक्षणीं जवळजवळ ऐकूं येऊं लागला. जोधबाईचे नेत्र आनंदानें विस्तृत झाले. समोर कांहीं घोडेस्वार एका ओळींत येऊन उभे राहिले आहेत व त्यांज-बरोबर एक सुसज्जित पालखीहि आहे, असें तिला दिसलें. पालखींत शूर वीर अजयसिंह असावा, याबद्दल तिला तिळमात्र शंका राहिली नाहीं.

मंडळी आली. पालखी त्या झाडाखालीं ठेविली. जोधबाईचा धीर सुटला. ती आपल्या मनास आवरूं शकली नाहीं. अजयसिंह पालखींतून बाहेर निघेपर्यंत तिला धीर निघाला नाहीं. ती धावतधावत पालखीजवळ जाऊन उभी राहिली. रणसिंह अर्ध खिडकी उघडून बाहेर पहात आहे असें तिला दिसलें. रणसिंह कुमारसिंहाचा चाकर आहे हें तिला पुरतेपणीं ठाऊक होतें. कुमाराचा चाकर असतां हा अजयसिंहाबरोबर कसा आला, हें तिला कांहींच समजलें नाहीं. किंबहुना तो प्रश्नच तिच्या मनांत उद्भवला नाहीं. तिचें मन अनावर झालें. तिनें पालखी जवळ जाऊन खिडकी उघडली आणि आंत डोकावून पाहिलें तों कुमार निजला आहे ! ती कुंठित झाली. पालखींत अजयसिंह नाहीं. कुमार निजला आहे—नव्हे त्याला महानिद्रेनें घेरलें आहे ! ! त्याच्या मुखावर मृत्यूची प्रशांतता विराजत आहे !

जोधबाईला सर्व खरी हकीगत समजली. रणसिंहानें तिला कुमाराच्या जखमेचें कारण सांगितलें. अजयसिंहाची सर्व लबाडी त्यानें तिला निवेदन केली.

* * * * * *

जोधबाई आतां संन्यासिनी आहे. स्मशान हेंच तिचें वसतिस्थान. कुमाराचें चिताभस्म हींच तिची एक मात्र उपभोग्य दर्शनीय वस्तु आहे.

## गोष्ट २० वी.

# हरवलेला खजिना.

अमीर शहाबाज हा दमास्कस येथील बादशाहतीचा एक मोठा सरदार होता. मुसलमान लोकांचा खर्चिक स्वभाव प्रसिद्धच आहे. आणि त्यांतून अमीर शहाबाज हे गर्भश्रीमंत पडले. एक लाखाचें उत्पन्न तर पांच लाखांचा खर्च ! अमीरसाहेबांना हजीर नांवाचा एक मुलगा आणि परीबा नांवाची एक मुलगी अशीं दोन अपत्यें होतीं.

इकडे बगदाद शहरांत हसन नांवाचा एक सौदागर होता. अमीरसाहेबांचा व त्याच्या बापाचा पूर्वापार मित्रसंबंध असल्याकारणानें हसन जेव्हांजेव्हां व्यापारासाठीं म्हणून दमास्कस येथें जाई, तेव्हां तो अमीरसाहेबांच्या टोलेजंगी भव्य वाड्यांत उतरत असे. अमीरसाहेबांची त्याच्यावर बहाल मर्जी असे, व पूर्वापार चालत आलेल्या घरोब्यामुळें हसन याला अमीरसाहेबांच्या येथें वाटेल तिकडे जाण्यास व जनानखान्यांतील स्त्रियांशीं बोलण्याचालण्यासुद्धां पूर्ण परवानगी असे. यामुळें अर्थातच अमीरसाहेबांच्या घरच्या एकूणएक माणसाशीं त्याचा चांगला परिचय झाला होता. त्यांतच अमीरसाहेबांची लाडकी परीबा हिचीहि त्यानें ओळख करून घेतली होती.

हसनचें दमास्कस येथें व्यापारासंबंधानें वरचेवर जाणें घडत असे. एकदा याप्रमाणें तो तेथें गेला असतां व आपल्या नेहमींच्या क्रमाप्रमाणें अमीरसाहेबांच्या वाड्यांत उतरला असतां त्याच्या निजण्याच्या दालनांत भिंतीला टांगलेली एक तसबीर त्याच्या नजरेस पडली. ती तसबीर पाहून हसन प्रथम चपापला. तो ह्मणजे संशयखोर स्वभावाचा होता असें नाहीं; पण काय असेल तें असो, तसबीर पहातांच त्याचें मन संशयित होऊं लागलें. त्या तसबिरींतल्या बाईचे डोळे खरोखरीच्या डोळ्यांप्रमाणें हालचाल करित आहेत असें त्याला वाटलें. ती तसबिरींतली बाई एकदा आपलेकडे पहाते आहे आणि फिरून खालीं जमिनीकडे डोळे करित आहे, असा त्याला भास होऊं लागला. हा काय प्रकार आहे हें हसनला कळेना. हा दृष्टिभ्रमतर नाहींना, ह्मणून त्यानें निरनिराळ्या ठिकाणीं उभें राहून पाहिलें, पण पुनः तेंच ! तेव्हां तो मोठ्या विचारांत पडला.

ही शंका अधिक दृढ होण्याला त्या दिवशीं आणखिहि एक कारण झालें होतें. त्या दिवशीं संध्याकाळीं बागेंत द्राक्षमंडपाखालीं परीबा ही त्याला सहज भेटली होती आणि बोलतांबोलतां तिनें त्याच्याविषयींचें आपलें प्रेम शब्दांनीं सूचित केलें

होतें. हसन त्या वेळीं तिच्यापाशीं कांहीं बोलला नाहीं. पण मागाहून आपल्या मनाशीं विचार करून ह्मणाला "ही पडली मोठ्या उमरावाची मुलगी, आणि मी पडलों गरीब. तेव्हां आपलें इथें कसें जमावें? आतां जास्त दिवस इथें राहणेंहि धोक्याचें आहे." असा विचार करून तो दुसरेच दिवशीं अमीरसाहेबांचा निरोप घेणार होता. पण परीबाचें मोहक सौंदर्य, तिचा मधुर स्वर, आणि तिनें आपण होऊन व्यक्त केलेलें प्रेम या सर्वांचा अनादर करून जाण्यास त्याचा पाय वाहीना; आणि या तसबिरीच्या चमत्कारानंतर त्याच्या मनाची स्थिति अधिकच द्विधा करून सोडली होती.

'तसबिरीचे हालचाल करणारे डोळे आपण नव्हते बुवा कधीं ऐकले' असें तो वारंवार आपल्या मनाशीं ह्मणे आणि या चमत्काराचा उलगडा करण्यासाठीं तो हरएक कल्पना लढवून पाही; पण कोठें कांहीं जुळेना. शेवटीं विचार करतांकरतां निजण्याची वेळ झाली. तो आतां दिव्याला निरोप देऊन पलंगावर जाऊन अंग टाकणार, इतक्यांत त्याच्या डोक्यांत एक कल्पना आली. त्याला वाटलें कीं, या मोठ्या तसबिरीच्या मागें खरोखरीचें कुणी माणूस कदाचित बसलें असेल आणि तसबिरींतल्या चित्राच्या डोळ्यांचे मुद्दाम कातरून ठेवलेल्या भोंकांतून त्या माणसाचे डोळे चमकतांना आपणांस दिसत असतील. ही कल्पना डोक्यांत येतांच त्याला अत्यानंद झाला. एवढा वेळ जें आपणास गूढ असें वाटत होतें त्याचा उलगडा आतां झाला असा तो आपले मनांत हर्ष करित होता. आपली कल्पना खरी आहे याविषयीं आतांचे आतां खात्री करून घेऊं, असें ह्मणून तो उठला आणि हातांत मेणबत्ती घेऊन तसबिरीच्या मागची जागा निरखून पाहूं लागला. पण त्याला वाटलें होतें तसें कांहींएक आढळलें नाहीं, तेव्हां मात्र त्याची फार निराशा आणि नाउमेद झाली. तो स्वताशींच ह्मणाला "काय चमत्कार आहे ! असा प्रकार आपण साऱ्या जन्मांत कधीं पाहिला नव्हता."

कांहींच तर्क चालेना, आणि स्वस्थ झोंपहि लागेना. सगळें लक्ष्य समोरच्या तसबिरीकडे लागे. शेवटीं कंटाळून त्यानें तसबिरीवर एक कपडा टाकून तिला झाकलें आणि आपण तोंडावरून पांघरूण घेऊन निजून राहिला.

दुसरे दिवशीं सकाळीं पुनः परीबाची व त्याची बगीच्यांत गांठ पडली, आणि थोडा वेळ उभयतांचें संभाषण झालें. त्याचा परिणाम त्याच्या मनावर इतका झाला कीं, आदले रात्रींचा त्याचा विचार अगदीं पालटला, आणि परीबाविषयीं अमीर

साहेबांपाशीं मागणी घालावी असा त्याचा निश्चय ठरला. त्या निश्चयाप्रमाणें अमीरसाहेबांचे खुष तब्यतीचा वखत पाहून हसननें परीबाला मागणी घातली.

अमीरसाहेबांचीहि हसनवर मोठी मेहेरबानी होती. ते हसनचें बोलणें ऐकून घेऊन त्याला शांतपणानें ह्मणाले " बेटा हसन ! तुझ्या घराण्याचा व आमच्या वाडवडिलांचा मित्रसंबंध कित्येक पिढ्यांपासून चालत आलेला आहे, आणि तूंहि तो तसाच पुढें चालविला आहेस हें पाहून मला संतोष वाटतो. तुझी चालचलणूक आणि स्वभाव मला फार पसंत आहे. तुझ्याविरुद्ध कोणतीहि गोष्ट सांगतां येणार नाहीं; आणि आमच्या बेटीला तुझ्याहून अधिक लायक असा नवरा शोधून पाहिल्यानेंहि मिळणार नाहीं हें मला पक्कें ठाऊक आहे; पण तूं नुक्ताच व्यापारांत पडला आहेस, आणि तुझ्याजवळ फारशी पुंजीहि पण नाहीं. आमच्या सारख्या उमरावांच्या मुलींनां श्रीमंतांचींच स्थळें पाहिलीं पाहिजेत. कारण मोल मजुरी करून त्यांनां पोट भरावयाचें नाहीं. त्यानें आमच्या कुळाला बट्टा लागेल. समज उद्यां व्यापारांत तुला ठोकर लागली, तर गरीबीच येणार कीं नाहीं ? यासाठीं तूं अगोदर बरेचसे पैसे मिळीव; ह्मणजे मग तुझी मागणी मी कबूल करीन. तूं हुषार आहेस; व्यापारांत चांगलें मन घातलेंस तर पैसे मिळणार नाहींत असें नाहीं. तुला मी परका समजत नाहीं. जसा आमचा हजीर तसाच तूं आह्मांला मुलाचे ठिकाणीं आहेस. आमच्यासारखें खानदानीचें सरदारी घराणें कर्जबाजारी असलें तरी त्याला जी एक प्रकारची मोठी अब्रू असते ती मोठ्या लक्षाधीशांनांहि नसते. ह्मणून आह्मी आमच्या मुली एकतर गरीब पण मोठ्या सरदारी घराण्यांत देतों, नाहींतर निदान श्रीमंतांच्यातरी घरीं देतों. ह्मणजे त्यांनां गरीबांच्या सारखें काबाडकष्ट करून पोट भरण्याचा प्रसंग येऊं नये. बेशक तूं व्यापारांत पैसे मिळवून गबर झालास कीं परीबाचें तुझ्याशीं लग्न लावण्यास माझेकडून तयारी आहे असें समज. पण आजच तें जमणार नाहीं. "

यावर हसनलाहि अधिक कांहीं बोलतां येईना. तो जाण्यासाठीं निरोप मागूं लागला. तेव्हां अमीरसाहेबांनीं मेजवानीकरितां त्याला एक दिवस आग्रहपूर्वक ठेवून घेतलें.

इकडे झालेला प्रकार परीबाला कळला तेव्हां तिचीहि थोडीशी निराशा झाली. तथापि हसन याला व्यापारांत लवकरच मोठी संपत्ति मिळेल, आणि मग आपल्या मनाप्रमाणें सगळें घडून येईल या आशेवर दिवस कंठण्यास तिच्या मनाची तयारी झाली. हसन यालाहि व्यापारांत लवकर पैसे मिळविण्याची ईर्षा उत्पन्न झाली.

दुसरे दिवशीं रात्रीं हसन याला अमीरसाहेबांच्याकडची थाटाची मेजवानी झाली; आणि प्रातःकाळीं बगदादला जाण्यासाठीं निघण्याचा त्याचा विचार नक्की होऊन सर्व तयारी झाली. सामानसुमान बांधणें झाल्यावर हसन पलंगावर जाऊन पडला. पण जाण्याची हुरहुर मनाला लागल्यामुळें त्याचा डोळा लागेना. तितक्यांत समोरच्या तसबिरीकडे त्याची पुनः नजर गेली. शेवटीं एकदा पुनः त्या तसबिरीचें दर्शन घ्यावें ह्मणून त्यानें तिच्यावरचें झांकण काढलें आणि त्या बाईच्या दृष्टीशीं रोंख मिळविला. तों पुनः आदले रात्रीचाच प्रकार. बाईचे डोळे एकदा त्याच्याशीं रोंख मिळवितात व लागलीच खालीं जमिनीकडे वळतात असें त्यानें पाहिलें. तो जिकडेजिकडे जाई तिकडेतिकडे त्या बाईची नजर फिरे, पण खालीं पहातांना मात्र तिची नजर कांहीं एका विशिष्ट स्थलावरच असे, ही त्यांतली खुबी लवकरच त्याच्या ध्यानांत आली; आणि ज्या जागीं तिची दृष्टि स्थिर रहाते त्या जागीं कांहीं गौडबंगाल असलें पाहिजे असें त्याला वाटूं लागलें. तो त्या जागीं बारकाईनें पाहूं लागला; पण एक जुना गालिचा अंथरलेला होता त्या पलीकडे त्याला कांहीं दिसलें नाहीं. या गालिचावर इतकी धूळ सांचली होती कीं पांच पन्नास वर्षांत तो गालिचा कोणीं उचललेला दिसत नव्हता. फरासानें नुसती वरून केरसुणी फिरवावी, पण तो गालिचा उचलून त्या खालचा केर काढूं नये. या गोष्टीकडे हसनची दृष्टि जातांच त्यानें प्रथम तो गालिचा काढून दूर फेंकला, आणि सांचलेली धूळ सारून बारीक नजरेनें खालच्या भुईकडे पाहिलें, तेव्हां त्या जमिनींत एक चोर फरताळ त्याला दिसलें. या फरताळाचें झांकण अशा खुबीनें जमिनींत बसविलें होतें कीं, त्याचा सांधा बारीक नजरेनें पहाणारा-सच दिसे. एरवीं पहाणाराला ती जमीनच आहे असें वाटे. हसन बारकाईनें पहात होता ह्मणूनच त्याला तरी तें दिसलें. या चोर फरताळांत कांहींतरी गुप्त धन अगर दुसरी कांहीं अजब चीज ठेवलेली असेल अशी हसनची साहजिक कल्पना होऊन आपणास त्या ठेवीचा अनायासें लाभ होणार या विचारानेंच त्याच्या पोटांत आनंदानें गुदगुल्या होऊं लागल्या. तथापि वरून तो हर्ष न दाखवितां त्यानें शांतपणानें आणि नेटानें तें झांकण वर उचलण्याची खटपट चालविली. आज कित्येक वर्षें लागलेलें दार घट्ट बसलें होतें यामुळें लवकर उघडेना; तथापि हसन यानें हरप्रयत्न करून तें एकदाचें उघडलें, आणि पहातो तों त्याच्या अपेक्षेप्रमाणें खरोखरच खोल अशा खांचेमध्यें एक लोखंडाची मजबूत तिजोरी त्याला आढळली. शेंपन्नास वर्षें ती त्या स्थितींत तशीच पडली

असावी असें दिसत होतें. ती एकट्यानें उचलून वर आणणें अशक्य होतें. तेव्हां अर्थात् येथें त्याचा उपाय हरला. आतां दुसऱ्याला ही गोष्ट कळविल्या-शिवाय आपणांस लाभ व्हावयाचा नाहीं हें निश्चित झालें. ह्मणून त्यानें पुनः तें फरताळाचें झांकण लावून त्यावर पूर्वीप्रमाणें गालिचा अंथरला, आणि पुनः एकवार त्या तसबिरींतल्या चित्राकडे पाहिलें. पण चमत्कार काय कीं, पूर्वींची ती डोळ्यांची हालचाल आतां बंद झालेली दिसली! त्यानें पूर्वीप्रमाणें चारी दिशेनें फिरून तेथून तसबिरीकडे पाहिलें, पण ती पूर्वींची डोळ्यांतली खुबी, ती पूर्वींची जादू गेली ती गेलीच!

हें पाहून हसन ह्मणाला "हा काय चमत्कार आहे! मघांशीं या चित्रांतल्या बाईची दृष्टि एकदा माझ्याकडे आणि एकदा या फरताळाकडे फिरतेशी दिसत होती, आणि तीच आतां मीं फरताळ उघडल्याबरोबर एकदम स्थिर झाली आहे. तेव्हां या फरताळांतल्या तिजोरीशीं या चमत्काराचा संबंध खास असला पाहिजे. पण आपण एकटे, आतां ही तिजोरी वर आणून उघडणार कशी? आतां उद्यां उठल्याबरोबर अमीरसाहेबांनां झालेली हकीगत कळवून तिजोरी वर काढण्याची खटपट केली पाहिजे." असें ह्मणून हसननें पुनः पलंगावर अंग टाकिलें. हातीं घेतलेल्या कामांत एवढेंतरी यश आपणांस आलें या समाधान-कारक विचारामुळें त्याचें भणाणलेलें डोकें आतां अंमळ शांत झालें होतें आणि रात्रहि बरीच झाली होती, यामुळें त्याला लवकरच चांगली झोंप लागली.

दुसरे दिवशीं सकाळीं बगीच्यांत अमीराच्या मुलीची व हसनची पुनः गांठ पडली. तेव्हां तिचा निस्तेज चेहरा आणि रडूनरडून लाल झालेले डोळे त्याच्या दृष्टीस पडले. आपल्या इच्छेप्रमाणें हसनशीं आपलें लग्न घडून येण्यास बापाची प्रतिकूलता आहे असें पाहून परीबानें ती रात्र रडण्यांत घालविली होती. हें जेव्हां हसनला कळलें, तेव्हां मी लवकरच पैसे मिळवून आणीन आणि तुझ्याशीं शादी लावीन; तूं घाबरूं नकोस, असें त्यानें तिलाहि आश्वासन दिलें, आणि विश्वास यावा ह्मणून त्यानें आदल्या रात्रीं घडलेली गोष्ट तिला सांगितली. तिला ती गोष्ट ऐकून आश्चर्य वाटलें. पण ती तसबिरींतली बाई कोण, कोठली, तें तिला मुळींच ठाऊक नव्हतें, आणि तिजोरी बाहेर काढण्यांत तिच्या हातून कांहीं मदत होण्यासारखीहि नव्हती. तथापि ही हकीगत ऐकून तिच्या जिवाला थोडासा धीर आला एवढें खचीत. परीबाच्या सल्ल्यानें हसन यानें शेवटीं अमीरसाहेबांची गांठ घेतली, आणि "मी निजतों त्या दालनांत एक फार जुनी अशी तसबीर

टांगलेली आहे ती कुणाची आहे? त्या बाईची कांहीं हकीगत तुह्मांला ठाऊक आहे काय?" असा त्यानें प्रश्न केला. अमीरसाहेबांनां असा प्रश्न आजपर्यंत कोणीं केला नव्हता, आणि तसा प्रश्न करण्यासारखें त्या जुन्या तसबिरींत विशेष कांहीं नव्हतेंहि; ह्मणून अमीरसाहेबांनां विशेषच नवल वाटलें. ते ह्मणाले "तुह्मी फारच बुवा चौकस दिसतां. अहो, आमच्या याच दालनांत शेंकडो पाहुणे आजपर्यंत उतरून परत गेले असतील. पण एकानेंसुद्धां त्या तसबिरीबद्दल कधीं विचारलें नाहीं. तुह्मांलाच एवढी चौकशी कां करावीशी वाटली कुणास ठाऊक? आमचे पणजोबा अमीर शरीफशहा यांनीं पहिलें कुटुंब निवर्तल्यावर दुसरें कुटुंब केलें, तें हें. ह्मणजे ही बाई आमची पणजी लागते. हें दुसरें कुटुंब केल्यावर आमचे पणजे लागलेच वारले; तेव्हां त्यांची अपार धनदौलत या बाईचे हातीं आली. आपल्या सवतीच्या लेकरांचे हातीं आपल्या नवऱ्याची संपत्ति लागूं नये ह्मणून हिनें जडजवाहिर, मोहोरा वगैरे सर्व जमा करून आपल्या बिछान्याच्या खालीं खांच खणून त्यांत पुरून ठेविल्या होत्या असें वृद्ध लोक आह्मांस लहानपणीं सांगत असत. या बाईच्या मनांत ती सगळी संपत्ति माहेरीं न्यावयाची होती. पण वाड्याभोंवतीं कडेकोट पहारे लागले असल्यामुळें तें तिला साधलें नाहीं. शेवटीं ती तशीच मरून गेली. आमच्या आजांनीं तिच्या पश्चात् तिच्या संपत्तीचा पुष्कळ शोध करून पाहिला, पण कुठें पत्ता लागला नाहीं. ती शोधून काढणारास अर्धा हिस्सा देऊं केला तरी व्यर्थ. शेवटीं तो नाद सोडला. आतां या बाईची आठवण देणारी तिची तसबीर तेवढी राहिली आहे. तुह्मी निजतां तेंच तिचें बसण्या-उठण्याचें दालन असे. त्यांत तिची तसबीर ठेविली आहे झालें. पण आम्ही कुणी उभ्या वर्षांत तिकडे कधीं ढुंकूनसुद्धां पहात नाहीं."

"बरें, पण तिचें माहेर कुठें होतें तेंतरी तुह्मांला कांहीं माहित आहे?"

"हो, तुमच्या बगदाद शहरांत ख्वाजा हबूब नांवाचे कुणी मोठे सावकार होते ते या बाईचे बंधू होते. त्यांनांच सगळी संपत्ति देऊन टाकावी असें बाईच्या मनांत होतें."

"कोण? ख्वाजा हबूब! तेतर आमचे पणजे. आतां सगळें जुळलें. आमची आजी ही आह्मांला लहानपणीं सांगत असे कीं, आमच्या घराण्याचा दमास्कस येथील एका मोठ्या उमरावाच्या घराण्याशीं शरीरसंबंध झालेला आहे. तो हाच संबंध असेल."

याप्रमाणें मागलापुढला कुलाचा संबंध दाखविणाऱ्या गोष्टी झाल्यानंतर अमीरसाहेबांनां हसननें घडलेला एकंदर प्रकार सांगितला. तेव्हां अमीरानेंहि आपले विश्वासू नोकर बोलावून त्यांचेकडून ती तिजोरी मोठ्या प्रयासानें वर आणवून तिचें झांकण उघडून पाहिलें तों जडजवाहीर आणि मोहोरा वगैरे बरीच रकम निघाली. त्याबरोबरच त्या बाईच्या खदस्तुरची फारशी भाषेंत लिहिलेली एक चिठ्ठी होती, आणि त्या चिठ्ठींत लिहिलें होतें कीं "बगदादचा सावकार आणि माझा प्रिय बंधु ख्वाजा हबूब याला किंवा याच्या वंशांतल्या पुरुषाला ही संपत्ति मिळावी. इतर जे कोणी हिचा अभिलाष करतील त्यांनां पैगंबराची शपथ आहे." ही चिठ्ठी अमीराचे हातीं लागली आणि त्यांनीं ती वाचून पहाण्याबरोबर त्यांची मुद्रा पालटली. त्यांनां या संपत्तीचा अर्धा वांटा मिळण्याची फार आशा वाटत होती. पण पैगंबराची शपथ घातल्यावर तिचा अभिलाष करण्याइतका दुष्ट तो गृहस्थ नव्हता. तो खानदानीचा आणि त्यांतहि धर्मनिष्ठ असल्यामुळें त्यांनीं ती सगळी संपत्ति हसन याचें स्वाधीन केली. वास्तविक ही संपत्ति अमीर साहेबांच्या पणजांची, तेव्हां त्यांनांच ती मिळावयास पाहिजे. फारतर हिचा शोध लाविल्याबद्दल अर्ध्या वांट्यावर आपणास हक्क सांगतां येईल असा विचार करून हसननें त्या संपत्तीचा अर्धा वांटा आपल्या खुषीनें उचलून अमीरसाहेबांनां दिला. अमीर तो घेत नव्हते, पण मी खुषीनें देत आहें तेव्हां तो घेण्यास शपथ आड येत नाहीं असें समाधान करून त्यानें अमीरसाहेबांकडून तो घेण्यास लाविला.

अमीरांनींहि खुष होऊन आपली मुलगी परीबा हिची हसनशीं शादी लावून दिली. या अकल्पित घडलेल्या द्रव्यलाभानें अमीर, हसन व परीबा या तिघांनांहि आनंद झाला, तसा ख्वाजा हबूब याच्याच वंशांत अखेर सगळा द्रव्यसंचय गेला याबद्दल त्या तसबिरींतल्या बाईच्या आत्म्यालाहि संतोष वाटला असला पाहिजे.

गोष्ट २१ वी.

## सुगृहिणी.

अकल्पित, अतर्कित, प्रतिरवि, प्रभेचे धणी,
जरी अमित सांठले त्वदुदरीं पयोधे ! मणी;
तरी न तुलतील ते क्षणहि त्या सुखासंगतीं
जयास पति लाभुनी निजसतीहृदीं रंगती ! १

श्रमत्रसित मी यदा परततों गृहासन्निधीं
गमे उवडले जणों सरसवैभवाचे निधी !
विकास वरिती त्वरें सुखसुमें प्रसन्नान्तरीं,
तयांत मम वावरे सुगृहिणी रमा सुंदरी ! २

सुरव्रततिला नसे खचित अल्पही किंमत!
न कामकपिला असे कविगणेश्वरा संमत;
प्रसूनशयनादि हे विपय काय आवश्यक ?
जरी विलसते गृहीं सुगृहिणी सुखा पोषक. ३

मोठमोठे प्रसंग गुदरले असतांना, अवदशेचा फेरा आला असतांना, स्त्रियांनीं विलक्षण धैर्य दाखविल्याचीं बरींच उदाहरणें आपल्या पहाण्यांत व ऐकण्यांत आलीं आहेत. ज्या संकटांच्या योगानें मी मी ह्मणणाऱ्या मर्दांची कंवर खचून ते जमीनदोस्त होतात, त्याच संकटांत मार्दव व नाजुकपणा यांसंबंधानें जगजाहीर असलेल्या अबलांनीं प्रसंगीं जो दमदारपणा, धैर्य, मनोनिग्रह व उत्तानता हीं दाखविलीं आहेत, त्यांचा विचार केला असतां प्रत्येक पुरुष आश्चर्यानें तोंडांत बोट घालील व ‘ धन्य ! धन्य ! त्यांची ’ असे उद्गार आपोआप त्याच्या मुखांतून निघतील ! टक्केटोणपे खाऊन राकट बनलेल्या पुरुषांनांहि जे दुर्दैवाचे आघात सहन होऊं नयेत, तेच कोमल स्त्रियांनीं मोठ्या धीरानें सोसावे, हें केवढेंतरी नवल ! ज्यांच्या अंगीं केवळ जाईच्या फुलांचा नाजूकपणा, ज्यांचें जीवित प्रायः बलहीन व परस्वाधीन व एवढ्यातेवढ्या गोष्टीनेंहि ज्यांच्या डोळ्यांतून गंगा-यमुनांचे ओघ वहावयाचे, त्याच स्त्रियांनीं डोक्यावर आकाश कोसळलें असतां विलक्षण धैर्यावलंब करून निराशेनें दुर्मुखलेल्या आपल्या पतीचें अमृततुल्य गोड वचनांनीं शांतवन करावें, त्यास धीर द्यावा व उत्तेजन आणावें, यासारखी मनाला चटका लावणारी दुसरी गोष्टच जगांत नाहीं !

एखाद्या मोठ्या प्रचंड वृक्षाला बिलगून त्याच्याच आश्रयानें एखादी लता वाढते. तो तिला मोठ्या प्रेमानें संभाळून व कवटाळून सांवरून धरितो व सुखकर रविप्रकाशाची जोड तिला मिळवून देतो. तीहि त्याला अनन्य प्रणयानें कवटाळिते व आपल्या सुंदर व कोमल पल्लवांनीं त्याच्या विशाल शाखांनां अप्रतिम शोभा आणिते. पुढें एक दिवस भयंकर वावटळ सुरू होते व त्या प्रचंड वृक्षाचीं संधिबंधनें खिळखिळीं होऊन त्याचें खोड विशीर्ण होतें व शाखा जमिनीवर लोटांगण घालण्याच्या पंथास लागतात. पण अशा बिकट प्रसंगीं ती त्याच्याच आसऱ्यानें वाढलेली वेल त्याच्या साह्यार्थ मोठ्या धाडसानें पुढें होते. ती आपल्या नाजूक तंतूंचे त्याच्याभोंवतीं वेढे देते व त्याच्या विलग होऊं पहाणाऱ्या शाखांनां एकत्र सांवरून धरिते. ईश्वराच्या अगम्य लीलेनें स्त्रीजनांची हुबेहुब अशीच व्यवस्था केली आहे. चालत्या काळांत, भरभराटीच्या दिवसांत स्त्रिया सर्वस्वीं पुरुषांवर अवलंबून असतात. त्या त्यांचीं खेळणीं व भूषणेंच बनतात. परंतु एकाएकीं हवामान बदलून दुर्दशेचें वारें सुटलें ह्मणजे त्याच स्त्रिया पुरुषांचे आश्रयस्तंभ, विश्रामस्थान व उत्तेजनाचे उद्गम होतात. त्या आपल्या पतींच्या स्वभावांतील सर्व खाणाखुणा जाणून त्यांची मर्जी संभाळतात, निराशेनें विगलित झालेल्या त्यांच्या गात्रांस टेंका देतात व त्यांच्या हृदयांतील दुःखाचीं क्षतें भरून काढण्यासाठीं अत्यंत प्रेमळपणानें आटोकाट मेहनत करितात.

आपल्या पहाण्यांत वारंवार येत असतें कीं, कोणत्याहि कठिण प्रसंगांतून अविवाहितापेक्षां विवाहित मनुष्यच धडपणें निभावून जाण्याचा अधिक संभव असतो. याचीं कारणें अनेक आहेत. पहिलें कारण असें कीं, आपलीं बायकापोरें आपल्यावर अवलंबून आहेत, आपण सक्त मेहनत केली नाहीं व निराश होऊन हातपाय गाळून बसलों तर तीं सर्व अगदीं उघडीं—निराश्रित—पडणार, ह्या विचार मनांत येऊन विवाहित मनुष्य संकटाला मोठ्या नेटानें तोंड देण्यास तयार होतो. परंतु दुसरें आणि विशेष महत्वाचें कारण हें कीं, घरच्या मनुष्यांच्या प्रेमळ वर्तनानें त्याच्या मनावरील निराशेचें पडळ दूर होतें; सर्व जगानें जरी आपल्यास हिडिसफिडिस केलें, घराबाहेर दाही दिशांनां जरी दुर्दैवविलसिताचा गर्द अंधार पसरलेला असला, तरी आपलें घर केवळ प्रीतीनें मुसमुसलेलें आहे, तेथें आदर व स्नेह यांचा परिमळ अखंड घुमघुमलेला आहे व आपण तेथील अधिष्ठित देवता आहों, ह्या विचारानें त्याच्या अंगांत स्वाभिमानाचें वारें व उत्साहाचें तेज यांचा प्रवेश होतो; परंतु अविवाहिताची स्थिति याच्या अगदीं

उलट होते. तो एखाद्या घोर प्रसंगांत सांपडला ह्मणजे अगदीं निराश्रित व केंविलवाणा होतो; आपलें असें या जगांत कोणी नाहीं असें त्याला वाटतें; प्रेमसंबंध व स्नेहसंबंध यांचा त्यास खरा अनुभव येत नाहीं; त्याची निराशा बेताल होऊन तो निष्काळजी, विषण्ण व सुखासमाधानाला पारखा होतो.

सुगृहिणीविषयीं विचार करित असतांना, आह्मांला आमचे परम स्नेही गणपतराव व त्यांचें कुटुंब सरस्वतीबाई यांची आठवण झाली नाहीं, असें कधींच झालें नाहीं. तेव्हां आजच्या विषयानुरोधानें आह्मी आमच्या वाचकांस या कुटुंबाची त्रोटक हकीगत सांगतों. ती बोधप्रद होईल अशी आह्मांला उमेद आहे.

सरस्वतीबाई या एका गरीब पण कुलीन व लौकिकवान् घराण्यांतील होत्या. त्या रूपानें हजारजणींत शोभण्यासारख्या होत्या, पण त्यांच्या गुणांची कडी तर सौंदर्यावरहि होती. सरस्वतीबाईचें माहेर जरी श्रीमंत नव्हतें, तरी त्या श्रीमंतांकडे पडल्या होत्या. गणपतरावांचे वडील धनाढ्य सावकार होते व वडिलांमागें गणपतरावांनींहि तोच धंदा मोठ्या हिंमतीनें चालविला असून त्यांत त्यांची चांगलीच भरभराट झाली होती. गणपतरावांचें आपल्या गृहिणीवर अकृत्रिम प्रेम असे व ते पत्नीचा प्रत्येक शब्द झेलण्यास नेहमीं तत्पर असत; किंबहुना आपल्या पत्नीला सर्व परीनें सुखी करावयाची, तिला अणुरेणु इतकेंहि कमी पडूं द्यावयाचें नाहीं, हीच गणपतरावांची मोठी महत्वाकांक्षा होती. गणपतराव मनाचे सरळ, वचनाचे धड व अंतःकरणाचे कोमळ होते. ते प्रेमळ व रसिक होते आणि जरी त्यांनां बोलावयास फारसें नको असे तरी त्यांची कल्पनाशक्ति बरीच जाज्वल होती. सरस्वतीबाई सुशील, सद्गुणी व प्रेमळ होत्या. त्यांची पतीवर अभंग भक्ति व भरंवसा होता व त्याची आज्ञा पाळणें, त्याची सेवा करणें, हीच त्या आपली इतिकर्तव्यता समजत. आपल्या कुटुंबाची ही भक्ति, हा भरंवसा, ही एकनिष्ठा पाहून गणपतरावांचें मन अगदीं तल्लीन होई व कित्येकवेळां "दुर्दैवानें जर आपल्यावर आग पाखडली, तर या निर्मळ, सुगंधि व कोमळ कुसुममंजरीची काय अवस्था होईल ?" ही भयंकर कल्पना मनांत येऊन त्यांचें अंतःकरण कांपत असे.

एकदा गणपतरावांनां भाविबळानें बुद्धि सुचून त्यांनीं आपलें सर्व भांडवल एका व्यापारांत घातलें; परंतु या कामीं त्यांचें धोरण चुकून सर्वच व्यापार अंगाशीं आला व ते बहुतेक कफल्लक होण्याच्याच पंथाला लागले. कांहीं दिवस त्यांनीं ही स्थिति अगदीं गुप्त ठेविली; परंतु आंत त्यांचें अंतःकरण अगदीं शतधा

झालें होतें व त्यांच्या चेहऱ्यावरहि एक प्रकारची हृद्रोगदर्शक कळा दृग्गोचर होऊं लागली होती. त्यांचें जीवित अगदीं कष्टमय झालें होतें. त्यांतल्या त्यांत आपली स्थिति आपल्या पत्नीस कळून तिला दुःखाचा धक्का बसूं नये ह्मणून त्यांनां घरीं जी उल्हासवृत्तीची बतावणी करणें भाग पडत होतें, तेंतर अगदींच असह्य झालें होतें. परंतु आपल्या गरीब बिचाऱ्या पत्नीला दुःख होऊं नये ह्मणून गणपतराव हें सर्व मुकाट्यानें कसेंबसें सहन करित होते. पण बायकांची नजर ह्मणजे काय तीक्ष्ण, आणि त्यांची बुद्धि किती चाणाक्ष! विशेषतः पतीसंबंधींतर त्यांची दृष्टि फारच सूक्ष्म असते. तिच्या तडाख्यांतून एक रेंसहि सुटावयाचा नाहीं. गणपतरावांच्या चेहऱ्यांतील बदल व त्यांचे ते निश्वास हे सरस्वतीबाईच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहिले नाहींत. गणपतरावांच्या आनंदाच्या बतावणीनें सरस्वतीबाई मुळींच फसल्या गेल्या नाहींत. आपल्या नवऱ्याला कसलीतरी काळजी लागली आहे, त्याला कांहींतरी अंतःस्थ आंच आहे, हें त्यांनीं तेव्हांच ताडलें. गणपतरावांची वृत्ति पूर्वीप्रमाणें ताळ्यावर येऊन आनंदी व्हावी ह्मणून सरस्वतीबाईंनीं पराकाष्ठा केल्या, निरनिराळ्या युक्त्या योजिल्या, पण याचा परिणाम इतकाच झाला कीं, गणपतरावांच्या हृदयांत शल्याची टोंचणी अधिकाधिक वाढूं लागली. आपली स्त्री किती सद्गुणी, किती प्रेमळ व ह्मणून किती प्रेमपात्र व सुखपात्र आहे, हें जसजसें त्यांच्या अधिकाधिक अनुभवास येऊं लागलें, तसतसें आपला गुप्त स्फोट करण्याचें त्यांच्या अधिकाधिकच जीवावर येत चाललें! आपण आपल्या स्थितीसंबंधीं एक अक्षर काढूं, तर हिची काय अवस्था होईल? हें स्मित गालांतल्या गालांत जेथल्यातेथेंच जिरेल; हे टवटवीत तांबडे ओंठ क्षणांत पांढरे फटफटीत पडतील; तें डोळ्यांचें पाणी तेव्हांच आटून जाईल; आणि तें प्रफुल्ल हृदयकमल लागलेंच कोमेजेल! हे विचार मनांत येऊन गणपतरावांनीं आपलें अंतःकरण कठिण केलें व आपल्या तोंडास कुलुप घातलें, यांत आश्चर्य तें काय?

एक दिवस गणपतराव आमचेकडे आले व त्यांनीं अगदीं मोकळ्या मनानें आपल्या व्यवहारधंद्याची इत्थंभूत हकीगत सांगितली. त्यावर आम्हीं त्यांनां विचारलें "पण, तुम्हीं ही गोष्ट सरस्वतीवहिनींनां कळविली आहे का?"

हें ऐकतांच त्या गृहस्थाला अगदीं हुंदका आला व तो डोळ्यांत पाणी आणून म्हणाला "छे छे! भाऊसाहेब! ही दुष्ट वार्ता तिला सांगून तिचा दुःखांत कडेलोट करण्याइतका मी अधम आहें, असें का तुम्हांला वाटतें? ही गोष्ट तिच्यापासून लपवून कशी ठेवितां येईल, याच काळजीनेंतर मी एकसारखा झुरणीस लागलों आहें!"

तेव्हां आम्हीं उलट उत्तर केलें "गणपतराव, तुमचें हें करणें आह्मांला तर मुळींच पसंत नाहीं. तुम्हीं ही गोष्ट आपल्या अर्धांगीपासून लपवून ठेविली, हें फारच गैरशिस्त केलेंत. अहो, आज नाहीं उद्यां, केव्हां तरी ही गोष्ट त्यांच्या कानीं गेल्याशिवाय का रहाणार आहे? केव्हांना केव्हां तरी जर ही गोष्ट त्यांनां कळाय-चीच आहे, तर ती अकस्मात् कोणातरी परक्याच्या तोंडून कळण्यापेक्षां तुम्हींच आपण होऊन सांगितलीत तर त्यांनां कमी धक्का बसणार नाहीं का? तुमच्या इतका कळवळा, कळकळ व प्रेमळपणा इतरांच्या ठिकाणीं असणें शक्यतरी आहे का? आणि हें पहा गणपतराव, स्त्रियांची सानुभूती म्हणजे सुखसमाधानाचा अखंड झराच आहे. अशा प्रकारच्या लपवाछपवीनें तुम्हीं त्या झऱ्याच्या अमृतोपम स्वादिष्ट उदकाला मात्र मुकलां आहां! तुम्ही कांहींतरी आपल्यापासून लपवित आहां, हें सरस्वतीवहिनींच्या लक्ष्यांत आल्यावांचून खास रहाणार नाहीं; आणि ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत आली ह्मणजे त्यांच्या प्रेमळ मनाला हा केवढा बरें धक्का बसेल? निष्कपट प्रेमाला बेभरंवसा क्षणभरहि सोसत नसतो. पतिपत्नींमध्यें आड पडदा मुळींच कामाचा नाहीं. पतीनें आपल्या सुखदुःखांची पत्नीपासून लपंडावी करावी, हें सत्पत्नीला कधींहि खपावयाचें नाहीं; त्यांत तिला आपल्या प्रेमाची, सद्गुणांची व निष्ठेची योग्य बूज झाली नाहीं, असेंच वाटतें."

यावर गणपतराव मोठ्या आवेशानें पण गहिंवरून ह्मणाले "भाऊसाहेब, ही गोष्ट तिच्याजवळ फोडणें ह्मणजे तिच्या आशा, उर्म्या व उत्साह यांनां केवढा जबरदस्त हिसका देऊन धुळींत लोळविणें आहे, याचा तुम्हीं विचार केलात काय? मी आतां अगदीं कवडीलाहि महाग झालों आहें, ही बातमी तिला सांगून तिच्या मृदु हृदयावर वज्राघात करायला माझें मन कसें बरें धजेल? आजपासून हे सर्व ऐषआराम, हे सुखसोहाळे, हा थाटमाट, हा मोठेपणा हें सारें बाजूला ठेवून तुला आतां या निष्कांचन दरिद्र्याबरोबर अज्ञातवासांत आयुष्याचे दिवस मोजित राहिलें पाहिजे, हें मीं तिला कोणत्या तोंडानें सांगूं? हाय! हाय! हा दारिद्र्यताप त्या सुकुमार कलिकेनें कसा सहन करावा? मऊ गालिच्यावर वावरणारा पाय, कांटांच्या पेरावर कसा बरें तग धरील? हर हर! या कुवार्तेनें तिचा तत्काळ हृदयस्फोट होईल, यांत मलातर मुळींच संदेह नाहीं."

एकंदरींत दुःखावेगानें गणपतरावांनां वक्तृत्वाचें व काव्यस्फूर्तीचें बरेंच भरतें आलेंसें दिसलें! परंतु आह्मीं त्यांनां बराच वेळ असेंच बोलूं दिलें. कारण दुःखाला पाट फोडूं दिल्याशिवाय त्याचा निरासच होत नसतो. पुढें ते जरासे शांत व

समाहित झाल्यावर, आह्मीं त्यांच्याशीं पुन्हा बुद्धिवाद सुरू केला व सरस्वतीबाईंनां सर्व प्रकार सांगावा ह्मणून त्यांचें मन वळवूं लागलों. "पण, गणपतराव, तुह्मी ह्मणतां त्या सर्व गोष्टी अगदीं निर्भेळ खऱ्या असल्या, तरी ही तुमची स्थिति वहिनींनां कळल्यावांचून रहाणें शक्यतरी आहे का? तुमच्या बदललेल्या सांपत्तिक स्थितीप्रमाणें तुमची रहाणीहि बदलणें अगदीं जरूर आहे; मग हें वहिनींनां कळल्याशिवाय कसें जुळणार? तुमची रहाणी बदललीच पाहिजे; आह्मी स्पष्ट बोलतों ह्मणून राग मात्र आणूं नका, किंवा वाईटहि वाटून घेऊं नका. बाह्य देखाव्यांतच सर्व सुख भरलें आहे अशी वेडी कल्पना तुमच्या मनानें घेतली नाहींना? तुमची संपत्ती गेली, तरी तुमचे स्नेही—जिवाला जीव देणारे स्नेही तर—अद्याप आहेत ना? तुमच्यावर अढळ प्रेम करणारी सुगृहिणी आहेना? ही संपत्ती काय लहानसहान आहे?"

पण माझें भाषण पुरें होण्यापूर्वींच गणपतराव आवेशानें ह्मणाले "हो, हो! संपत्तीची काय पर्वा आहे? माझी हंसतमुख, प्रेमळ पत्नी बरोबर असेल, तर एखाद्या भिकार झोंपड्यांतहि मी नंदनवनांतील इंद्राप्रमाणें सुखांत राहीन! ती तर माझा प्राण, माझा कलिजा आहे!"

तेव्हां आह्मी गणपतरावांजवळ जाऊन त्यांच्या खांद्यावर हात टाकिला व अत्यंत मृदुस्वरानें ह्मणालों "गणपतराव, आह्मीहि खात्रीनें सांगतों कीं, सरस्वतीवहिनीहि तुमच्याबरोबर त्याच भिकार झोंपड्यांत तितक्याच आनंदानें व सुखानें रहातील. इतकेंच नाहीं, पण उलट संकटप्रसंगीं तुम्हांला बिलगून रहाण्यांत, तुह्मांला धीर देण्यांत, तुमच्या संगतींत दुःखाशीं झगडण्यांत त्यांनां एक प्रकारचा अभिमान व उत्साहच वाटेल! सुखाच्या वांटेकरी मात्र स्त्रिया, पण दुःखाच्या नाहींत, ही तुमची कल्पना केवळ भ्रामक आहे. संकटांतच स्त्रियांचे सद्गुण प्रकाशित होतात. दुःख हीच त्यांच्या प्रेमाची कसोटी. सुखप्रकाशांत लुप्त झालेलें स्त्रियांच्या अंगचें दिव्य तेज दुःखाच्या अंधकारांतच चमकूं लागतें व तें पुरुषांनां योग्य मार्गदर्शक होतें. संकटांत पडल्याशिवाय पुरुषांनां आपल्या पत्नींच्या निष्काम प्रेमाची, त्यांच्या दैवी स्वरूपाची, त्यांच्या निर्मळ एकनिष्ठ भावनेची खरी पारख होण्याचा प्रसंगच येत नाहीं!"

आमच्या गंभीर स्वभावाचा, अलंकारिक भाषणाचा व निःसीम कळवळ्याचा गणपतरावांच्या मनावर चांगलाच ठसा उमटलेला दिसला. गणपतरावांचा स्वभाव आह्मांला चांगला ठाऊक होता व त्यांच्या क्षुब्ध झालेल्या कल्पनाशक्तीला चांगलाच

चेव आणून त्यांना मोकळ्या अंतःकरणानें सर्व गोष्टी वहिनींना सांगण्याची आह्मीं विलक्षणच गळ घातली व अखेर त्यांनीं तें कबूलहि केलें.

गणपतराव निघून गेल्यावर आमचें मन जरा अस्वस्थ झालें; आणि तसें होणें अगदीं साहजिकच होतें. गणपतरावांना भर घालून आपण जी गोष्ट करण्याला त्यांना उद्युक्त केलें, तिचा अपेक्षित सुखावह शेवट लागला तर नीटच; पण जर का उलटेंच्या सुलटेंच झालें, तर आपल्या परम स्नेह्याला भलतीसलती गळ घातल्याचा दोष पदरीं यावयाचा! पुढील कष्टमय मार्ग पाहून सरस्वतीवहिनींनीं धडकी घेतली व सुखाला संवकलेल्या नाजूक मनानें दुःखदर्शनानें उलट खाल्ली तर आपल्या मित्राचा आपल्यावर केवढा बरें ठपका राहील? या काळजीनें आह्मांला त्या रात्रीं चांगलीशी झोंप आली नाहीं व दुसऱ्या दिवशींच सकाळीं ससंदेहांतःकरणानें व उत्कंठेनें आह्मी गणपतरावांची वाट पहात होतों. गणपतराव येतांक्षणींच "कसें काय बोवा! काय झालें?" असा प्रश्न आह्मीं मोठ्या उत्सुकतेनें केला.

तेव्हां गणपतरावांनीं मोठ्या अभिमानानें उत्तर केलें "भाऊसाहेब! माझी पत्नी ह्मणजे केवळ दुसरी सावित्रीच आहे! अहाहा! काय तिचें प्रेम, केवढा निश्चय, किती मनोनिग्रह! मीं आपली सर्व स्थिति तिला सांगितली तेव्हां जीव जरा खालीं पडलासें तिला झालें; तिची काळजी, संदेह, तळमळ सारीं एका क्षणांत पळालीं व ती हंसतहंसत अत्यंत मृदुस्वरानें ह्मणाली 'हात्‌तिच्या! हेंच का माझ्याजवळून इतक्या दिवस लपवून ठेवायचं तें! आपलं सुख मावळण्याला एवढंच का कायतें कारण होतं? संपत्ती काय, जशी जाते तशी पुन्हा मिळतेहि! पण बाई, दुःखाच्या गोष्टी जर आम्हांला कळवायच्या नाहींत, तर आम्ही केवळ सुखांत खायच्याच का कामाच्या!' असें बोलून तिनें माझें कितीतरी समाधान केलें! पण हाय हाय! विचारीला दारिद्र्याची ज्वाळा किती कठीण आहे, याची अजून नीटशी कल्पनाच नाहीं, असें दिसतें. तिनें सावित्री, द्रौपदी, दमयंती यांच्या गोष्टी नुसत्या वाचल्या किंवा ऐकिल्या आहेत; परंतु दुःखाचा व दारिद्र्याचा प्रत्यक्ष अनुभव तिला अद्यापि आला नाहीं; आणि ह्मणूनच ती असें बोलली असावी. नाहींतर ज्या गोष्टीनें माझे इतके हातपाय गळले आहेत, ती गोष्ट तिनें इतक्या धीरानें खास ऐकून घेतली नसती."

"गणपतराव, तें कांहीं असो. तुम्हीं आतां एक मोठें अवजड काम पार पाडलें आहां. आतां ही बातमी फुटली तर आपल्या प्रिय पत्नीचा हृदयस्फोट

होईल, ही तुमची एक मोठी भीति नाहींशी झाली आहे. तेव्हां आतां आपली स्थिति होतां होईल तों लवकर लोकांत प्रसिद्ध करणें हें चांगलें. हें काम तुह्मीं जितक्या लवकर कराल, तितकें अधिक श्रेयस्कर. आपली हीन स्थिति प्रसिद्ध करणें प्रत्येक अब्रूदार व्यापाऱ्याच्या मोठें जीवावर येईल हें खरें, पण तें केव्हांतरी होणारच, त्याला उपाय नाहीं. मग त्याची एवढी चोरी कशाला? ह्मणून तें जेवढ्या लवकर होईल, तेवढें अधिक हितकर. एकदा काय ती कळ लागेल, पण पुढें कटकट नाहीं. मनतरी स्वस्थ होईल व काळजीचा लकडा चुकेल. आपलें दारिद्र्य लपवून न ठेवण्याइतका धीर दाखविला, ह्मणजे दारिद्र्याची निम्मे टोंचणी ओसरली, ह्मणून समजावें."

आमचें हें उपदेशबीज सुक्षेत्रांतच पडलें. कारण गणपतरावांनीं आपला सर्व मान व मोठेपणा बाजूला ठेवला व आपल्या नव्या स्थितीला साजेल अशी रहाणी पत्करली. त्यांनीं आपला शहरांतील टोलेजंग बंगला सोडून जवळच्या एका गांवांत लहानसें घर घेतलें. त्यांनीं चैनीचें ऐटदार व दिखाऊ पण निरुपयोगी सर्व सामान विकून टाकिलें, व आवश्यक पण टिकाऊ अशा सामानाचाच त्या नव्या घरांत समावेश केला. हें जोडपें लवकरच तेथें रहावयाला गेलें. चाकर माणसांनां रजा दिल्यामुळें या नव्या घरांतील सामानाची व्यवस्था, ठाकठिकी, टापटीप वगैरे सर्व सरस्वतीबाईनीं स्वताच केली; परंतु त्यांनीं या नव्या स्थितींत कधीं दुर्मुखता किंवा असंतोष किंवा त्रासिकपणा काडीमात्रहि दाखविला नाहीं. किंबहुना या नीच दुःस्थितींतच त्यांच्या अंगीं विशेष उत्साह, विशेष उल्हास, विशेष कर्तव्यदक्षता, विशेष प्रेमळपणा व समाधान हीं स्पष्ट दिसूं लागलीं. गणपतरावांनांतर या आपल्या स्त्रीरत्नाला कोणत्या कोंदणांत बसवूं आणि काय करूं असेंच होऊन गेलें! अर्थात् त्यांनां तें कोंदण शोधावयाला स्वताच्या अंतःकरणाशिवाय इतरत्र जाण्याचें प्रयोजनच पडलें नाहीं!

एक दिवस तिसऱ्या प्रहरीं गणपतराव आपला शहरांतील उद्योगधंदा आटोपून आमच्याकडे आले व त्यांनीं आपल्या नव्या घरीं येण्याचा आह्मांला फारच आग्रह केला. आम्हीं त्यांच्या आमंत्रणाचा स्वीकार केला व लागलेंच शहर सोडून त्यांच्या गांवचा रस्ता धरला. शहरांत रहाणाऱ्या लोकांनां आसपासची खेड्यांतील निर्मळ, शांत, साधी नैसर्गिक सृष्टिमुद्रा अगदीं मोहवून टाकते! गणपतरावांचें घर गांवाच्या एका टोंकाला व इतर घरांपासून बरेंच अलग होतें. घर अगदीं साधें, कुडटारूच होतें, परंतु त्याच्याभोंवती असणारा एक टुमदार बाग; केळी,

नारळी, पोफळी यांचीं टवटवीत व उंच झाडें; भाजीपाल्याचा मळा व वेलींचे मांडव; एका बाजूला पसरलेलें हिरवें गार कुरण, त्यांतून वावरणारीं गुरें व त्याच्या पलीकडची वनतरूंनीं शृंगारलेली टेंकडी; त्या कुरणांतून वहाणारी ती लहानशी नागमोडी नदी; तिच्याजवळ इतस्ततः फिरणारे पक्षी इत्यादि अकृत्रिम गोष्टींनीं त्या घराला जी दिव्य शोभा आली होती, ती पाहून सृष्टिदेवीच्या रसिक भक्ताला काव्यस्फूर्ती झाल्याशिवाय खास राहिली नसती !

आह्मी घराजवळ गेलों, तों आंतून एक मधुर स्वर ऐकूं आला. वाचक हो ! हा सरस्वतीवहिनींचा गाण्याचा सूर होता. त्या आपल्या बाळाला निजवित होत्या व एकीकडे 'द्रौपदीचा धांवा' ह्मणत होत्या. त्या गाण्यांत करुणरस, भक्ति व प्रेम हीं अगदीं ओथंबून गेलेलीं होतीं व त्यांचा सरस्वतीवहिनींच्या गोड, मृदु व मंजुळ आवाजाशीं संयोग होऊन केवळ बहार उडाली होती ! हीन स्थितींतहि असा भक्तीचा, प्रेमाचा, रसिकतेचा व समाधानाचा ठेवा मनांत नांदला, तर त्यापेक्षां कुबेराची संपत्ती ती अधिक काय आहे ? अशी सुगृहिणी ज्याला लाभली त्याला इंद्रसुखाची ती काय पर्वा ?

असो. इतक्यांत आमची चाहूल लागल्यामुळें सरस्वतीबाईचें गाणें बंद झालें. घरांत पाय ठेवितां क्षणींच ती ठाकठिकी व साफसुफी पाहूनच आमचा श्रम परिहार झाला; मग अशा गृहाचा स्वामी जो आमचा स्नेही गणपतराव त्यांला आपल्या सर्व दुःखांचा विसर पडला असेल यांत काय संदेह ? त्या रात्रीं गणपतरावांच्या घरच्या मीठ भातानेंच आमचें जें समाधान झालें, तें पंच पक्वान्नांनींहि होणार नाहीं ! सरस्वतीवहिनींच्या साध्या आदरदर्शक शब्दांनीं जें कौतुक व सुख अनुभवास आणिलें, तें अप्सरांच्या संगीतानेंहि आणवणार नाहीं ! एकंदरींत हेंच खरें कीं:—

प्रेमसमृद्धी हीच असे या थोर जगीं श्रीमन्ती;
विश्वाचें तें जीवन ! तत्सम न कनक, वाजी, दन्ती !

## गोष्ट २२ वी.
## सारजंट ब्रिगोर.

माझें वय त्यावेळीं फक्त सोळा वर्षांचें होतें. हल्लीं माझ्या वयाला शंभरांवर वर्षें लोटलीं आहेत; परंतु जी गोष्ट आतां मी आपल्याला सांगणार आहें, ती इतकी कांहीं माझ्या डोळयांसमोर आहे कीं, जणूं काय ती कालच घडली, असें मला वाटतें! सन १८१४ च्या जानेवारी महिन्यांतील गोष्ट. साल्सबर्ग शहराभोंवतीं शत्रूंचा वेढा सुमारें दोनअडीच महिने पडला होता. शहरांत आमच्या सैन्याच्या एकदोन टोळ्या होत्या; त्या, जसा एखादा वाघ त्याच्या बिळांत अडकावून धरावा त्याप्रमाणें कोंडल्या होत्या. त्यावर्षी हिंवाळाहि फार कडक होता. थंडी मी ह्मणत होती. सर्व शहरभर वर्फाचे ढीगच्या ढीग पडले होते. शहराबाहेरच्या शत्रूंपेक्षां भूक व थंडी यांच्या तडाक्यांतून आमचा निभाव कसा लागतो, ही निराळीच काळजी आह्मांस पडली होती. शत्रूंच्या बंदुकींच्या माऱ्यापेक्षां शहरांत तापाची सांथ सुरू झाल्याकारणानें आमच्या लोकांत जास्त कत्तल उडाली होती.

मनाला कांहींतरी करमणूक करण्याकरितां आमचे लोक वेळोवेळीं शत्रूच्या एखाद्या तुकडीवर छापे घालित असत; परंतु शत्रूची तयारी अगदीं जय्यत असल्याकारणानें आमच्या अशा चोरट्या छाप्यांचा परिणाम पुष्कळ वेळां असा होत असे कीं, त्यांचा पाडाव करण्याच्याऐवजीं आह्मांसच मार खाऊन माघार घ्यावी लागत असे. वेळ इतकी बिकट आली होती कीं, जो मरतो तो मोठा नशीबवान् असें आह्मांस वाटूं लागलें. कारण, त्याचे कपाळाचे हाल कायमचे चुकले; परंतु जे मागें जिवंत राहिले त्यांनां आपणांस कधीतरीं सुख मिळेल या पोकळ आशेवर अन्नावांचून थंडींत कुडकुडत दिवस काढण्याचा प्रसंग आला होता. शहरांत आमचें घर होतें, त्यांत मी व माझी आई इतकींच कायतीं फक्त माणसें होतों. शत्रूचा वेढा आमचे शहराभोंवतीं पडल्यानंतर आमचे शहरच्या लोकांच्या सैन्याच्या ज्या दोन तुकड्या तयार झाल्या होत्या त्यांत माझे बापास सारजंट नेमिलें असून ध्वजसंरक्षकांचे टोळीचे मुख्याचे जागीं त्याची योजना करण्यांत आली होती. यामुळें तो बहुधा लष्करांतच रहात असे.

एके दिवशीं सकाळीं तो घरीं आला. आदल्या रात्रीं सर्व रात्रभर लढाई चालली असल्याकारणानें तो अगदीं दमून गेला होता व त्याचें तोंड अगदीं निस्तेज दिसत होतें. मी त्यावेळीं घरीं नसून आमच्या शहरांत शिपाई तयार करण्याची कसरतशाळा होती त्या शाळेंत नित्याप्रमाणें गेलों होतों. माझ्या

बापानें घरीं आल्याबरोबर "जॅक कुठें आहे" ह्मणून माझ्या आईला विचारिलें. माझें नांव जॅक व माझ्या बापाचें नांव जीन बिगोर असें होतें. माझ्या बापाचें व आईचें वरील बोलणें चाललें आहे, इतक्यांत पाठीवर ढोलकें टाकून व ढोलकें वाजविण्याच्या काठ्या कमरेंतील पट्ट्यांत अडकावून एकादा स्वच्छंदी पांखराप्रमाणें नाचतबागडत मी शाळेंतून घरीं आलों व धावतधावत जाऊन बाबांच्या गळ्यास मिठी मारिली. बाबांनीं मला पोटाशीं धरून माझा मुका घेतला व माझ्या केंसांवरून हात फिरवितफिरवित मला विचारिलें "कायरे बाळ, शाळेंत तुझें बरेंच शिक्षण झालें असेल, नाहीं रे ?"

बाबांचा हा प्रश्न ऐकून मला मोठा अभिमान वाटून मीं उत्तर दिलें "होय बाबा, तुतारी वाजविण्याचा व नगारखान्याकडील माझा सर्व अभ्यास पुरा होऊन हल्लीं फक्त कवाईत व नेम धरणें याचा अभ्यास सुरू आहे."

बाबा ह्मणाले "तर मग हें ढोलकें घे व सैन्याची पुढें चाल करण्याची एक गत वाजवून दाखिव पाहूं!"

मीं पाठीवरील ढोलकें पुढें केलें व कमरेंतील काठ्या काढून अशी एक छानदार गत वाजविली कीं, त्या आवाजाच्या नादांत मी एखादी फौजच्या फौज अगदीं तुटक्या कड्यावरूनसुद्धां घेऊन जाईन, असें माझें मलाच वाटूं लागलें!

बाबांनीं माझी पाठ थोपटली व ह्मटलें "वाहवारे बहादुर! फारच छान वाजविलेंस!"

इतक्यांत माझी आई तेथून उठून दुसरे खोलींत कांहीं कामाकरितां गेली. ती संधी पाहून बाबांनीं मला एकदम पोटाशीं कवटाळून व तोंडावरून हात फिरवून ह्मटलें "बाळ, मी आतां काय सांगतों इकडे चांगलें लक्ष्य दे. शत्रूंनीं आपले लेफ्टेनंट रेनर्ड यांस मारल्याचें तुला माहित असेलच. त्याशिवाय त्यांच्या बंदुकींच्या माऱ्याखालीं आपले बरेच शिपायांचे प्राण बळी पडले आहेत, व हल्लीं सुमारें शंभर शिपाई जखमी होऊन पडले आहेत. आपला नगारखान्यावरचा नाईक बिचारा छातीवर दोन गोळ्या लागल्याकारणानें अगदीं हैराण होऊन पडला आहे, त्यामुळें नगारखान्याचें काम अगदीं पडून राहिलें आहे. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं प्रत्येकानें होईलतितकी मदत करण्यास तयार असलें पाहिजे."

याप्रमाणें मला हुरूप यावी असें थोडा वेळपर्यंत बोलून बाबा क्षणभर स्तब्ध बसले, व जरा विचार केल्यासारखें करून माझ्या पाठीवरून हात फिरवित ह्मणाले "कायरे बाळा, लेजोचें काम तूं पत्करतोस का?"

बाबांचा हा प्रश्न ऐकतांच माझा कंठ इतका भरून आला कीं, माझ्यानें कांहींच बोलवेना. आतां आपल्याला लष्करांत जाण्यास सांपडेल, या आनंदानें माझा गळा भरून आला किंवा त्याला दुसरें कांहीं कारण झालें, हें यावेळीं माझ्यानें खात्रीनें सांगतां येणार नाहीं; पण इतकें मात्र खास कीं, मला त्यावेळीं भयमात्र बिलकूल वाटलें नाहीं! माझा बाप त्या दिवशीं घरींच राहिला होता: परंतु त्या सकाळच्या प्रश्नासंबंधानें बाबांचें व माझें कांहींच बोलणें झालें नाहीं. रात्रीं आह्मी सर्वजण जेवणखाण आटोपून निजल्यावर बाबा उठून हळूच माझे बिछान्याजवळ आले व मला हलकेंच उठवून त्यांनीं कानांत कांहीं गोष्ट सांगितली. त्याबरोबर मीं माझे आईस न समजूं देतां माझ्या पाठीवर आपलें ढोलकें टाकलें व बाबांनीं खांद्यावर बंदूक घेतली व आह्मी दोघेहि लष्कराकडे जाण्यास निघालों. माझ्या शिपाईगिरीचा याप्रमाणें आरंभ झाला.

[ २ ]

एक महिना सुरळीतपणें गेला. रोजच्या कवाइतीशिवाय ढोलक्याचा उपयोग करण्याचा प्रसंग मला मुळींच न आल्याकारणानें वेळ जाण्यासाठीं मी 'बाबांची बंदुक खांद्यावर टाकून शहरच्या तटावरून मौजेनें फिरत असें व शत्रूकडील एखाददुसरा शिपाई माझ्या आटोक्यांत आल्यास त्याला हाणून पाडित असें. माझा नेम अचुक असल्याकारणानें माझ्या गोळीच्या तडाक्यांतून शिपाई क्वचितच निसटून जात असे.

एके दिवशीं सकाळीं आमच्या जनरलनें सर्व लोकांस कवाइतीचे मैदानांत गोळा केलें व माझे बाबा तेथें जवळच आपल्या तुकडींतील लोकांस कवाईत देत होते त्यांस हांक मारून ह्मटलें "सारजंट बिगोर! तुह्मी पहातच आहां कीं, शत्रु आपल्यास दिवसेंदिवस जास्त चेपित चालले आहेत, व याप्रमाणें त्यांनीं अजून आठ दिवस क्रम चालू ठेविल्यास ते शहरचे तटाचे आंत खास येतील. असें होणें चांगलें नाहीं. ह्मणून गेल्या रात्रीं सेनापतिसाहेबांनीं असें फर्माविलें आहे कीं, शहरच्या दक्षिण बाजूला शत्रूचें सैन्य कमी आहे, तेव्हां आज रात्र पडतांक्षणींच त्या बाजूनें आपण जाऊन वेढ्याच्या बाहेर सुमारें दोन मैलांवर आपल्या कुमके-करितां एकदोन तुकड्या आल्या आहेत अशी बातमी आहे त्यांस जाऊन मिळावें. सारजंट! तुमची तुकडी सर्वांच्या आघाडीस असली पाहिजे, समजलां? प्रसंग जिवावरचा आहे. शत्रूची फळी फोडूनतरी जाऊं किंवा मरूनतरी जाऊं!"

माझ्या बापानें "बरें आहे, आह्मी तयार आहों," इतकेंच उत्तर दिलें.

आमचा तो दिवस मोठ्या धांदलींत गेला. संध्याकाळ झाली व आह्मीं तटाबाहेर पडण्यास सुरुवात केली. परंतु आमच्या त्या बेताची शत्रूला पूर्वींच बातमी लागली असावी असें दिसलें; कारण आह्मी तटाबाहेर पडतों न पडतों इतक्यांत आमचेवर चोहोंकडून एकदम गोळ्यांचा वर्षाव सुरू झाला. आमचीसुद्धां तयारी चांगली असल्यामुळें एकदोन तासपर्यंत आह्मीं शत्रूंनां दाद लागूं दिली नाहीं. परंतु अंधार जास्त पडल्यावर शत्रूंनीं चोहोंकडून आह्मांस मुळीं घेरूनच टाकिलें. त्यांतून बाहेर पडण्याची मुळींच आशा दिसेना. मलातर त्यावेळीं असें वाटलें कीं, त्या शत्रूच्या शिपायांच्या अंगांत राक्षसांचें बळ आलें होतें; कारण, आमच्याकडील गोळीनें जर त्यांचा एखादा शिपाई पडला तर ते लागलेच त्याच्याबद्दल आमचेकडील तीनचार शिपायी मारित असत. माझ्या स्वतांचे रांगेपैकीं फक्त मी व दुसरा एक शिपाई असे दोघेजण जिवंत राहिलों होतों. मी कसा जिवंत राहिलों असेन याबद्दल माझा तर्क असा आहे कीं, कदाचित् शत्रूंनीं मजवर गोळ्या सोडल्या नसतील, किंवा मी अगदीं बारीक असल्याकारणानें त्या गोळ्यांतून निसटून गेलों असेन. माझ्या बापाला खांद्यावर तरवारीचे दोनतीन वार लागले होते. परंतु तो अद्यापिहि आमचें निशाण राखित आमच्यापासून थोड्या अंतरावर उभा असलेला दिसत होता.

आतां आमचा दारूगोळा संपत आला. शहरांतून जास्त मागविण्यास मार्ग नव्हता. आमचेकडील गोळीचा मारा कमीकमी होत चालला, व आह्मांस शत्रूंच्या स्वाधीन होणें भाग पडलें. शत्रूंनीं आह्मांस कैद करून जवळच एका शेतकऱ्याचे झोंपड्यांत अडकावून ठेविलें. थोड्या वेळानें एक आस्ट्रियन सेनापती आपल्या हाताखालच्या एका अमलदारासह तेथें दौडत आला व सोबत आणलेल्या मशालीचे उजेडांत त्यानें सर्व कैदी लोकांस निरखून पाहिलें, व इतके कैदी एकदम पकडल्याबद्दल त्यास अतिशय आनंद झाला असावा असें त्याच्या मुद्रेवरून मला दिसलें. त्यानें जखमी लोकांची चांगली काळजी घेण्याबद्दल आपले लोकांस हुकूम केला व फिरतफिरत माझा बाप उभा होता तेथें आला व निशाण स्वाधीन करण्यास हुकूम केला. माझे बापाचे हातांत त्यावेळीं कांहींसुद्धां नव्हतें. त्या सेनापतीच्या प्रश्नास कांहींएक उत्तर न देतां माझा बाप त्याजकडे तिरस्कारानें पहात स्तब्ध उभा राहिला होता. माझ्या बापाच्या अशा वर्तणुकीनें त्या सेनापतीस राग येऊन "सारजंट, मी काय बोललों तें तुह्मीं ऐकिलें नाहीं काय ?" असें त्यानें जरा ठांसून विचारिलें.

माझ्या बापानें "तें कुठें आहे हें मला माहीत नाहीं," असा त्याला तितक्याच जोरानें जबाब दिला. सेनापती रागानें लाल झाला व मागें वळून ह्मणाला "बरें आहे! हवालदार, उद्यां सकाळपर्यंत जर याचें हेंच उत्तर येईल तर, सारजंट विगोर यास गोळी घालून ठार करा." असा हुकूम करून तो निघून गेला.

[ ३ ]

आह्मांस निःशस्त्र करून व आमचेवर दोन शिपायांचा पहारा ठेवून बाकी सर्व इसम निघून गेल्यावर, पहाऱ्यावरील शिपाई जरा दूर आहेत अशी संधी पाहून माझा बाप किंचित् पुढें झाला व अगदीं हलक्या आवाजानें ह्मणाला "दोस्तहो, आपला मोड होत आहे असें पाहून आपल्या परमप्रिय गरुडचिन्हांकित ध्वजस्तंभाचें रेशमी निशाण मीं स्तंभापासून फाडून काढलें व टोंकावरील गरुड तेथेंच एका खंदकांत टाकून देऊन ध्वजाची काठी तेथेंच फेंकून शत्रूच्या गोळ्यांनीं छिन्नविछिन्न झालेलें आपलें अमोल्य निशाण मीं आपल्या अंगरख्याच्या आंतल्या बाजूस छातीजवळ लपवून ठेविलें आहे."

इतकें बोलून पुन्हा एकदा पहारेकऱ्याचें आपणाकडे लक्ष्य आहे किंवा नाहीं हें पाहून माझा बाप पुढें ह्मणाला "गडेहो! थोड्याशा विचारानें तुह्मांस असें सहज कळून येईल कीं, हें रेशमाचें फडकें शत्रूच्या गोळ्यांनीं अगदीं फाटून गेलें आहे तरी तें आपल्यास परम पूज्य आहे. हें वाऱ्यानें फडकत असतां याच्या प्रत्येक रंध्रांतून जो वायु वहातो, तो साधारण वायु नसून आपल्या राष्ट्रदेवीचा तो श्वासोच्छ्वास आहे, व आपण चाल करून जात असतां आपल्या राष्ट्रदेवीची मूर्ती जणूंकाय आपणांस प्रोत्साहन देण्याकरितां आपल्यास पुढें पाठवित आहे, असें हें आपलें आवडतें निशाण आज शत्रूंच्या स्वाधीन करणें ह्मणजे आपल्या राष्ट्रमातेचा गळा त्या खाटकांच्या हातीं देण्यासारखें आहे याकडे लक्ष्य असूंद्या, व होतां होईं तोंपर्यंत तें शत्रूंच्या हातीं लागूं द्यावयाचें नाहीं, अशी आपल्या स्वताच्या प्राणापलीकडे खबरदारी ठेवा."

माझा बाप ह्मणजे मोठा राजकार्यधुरंधर मुत्सद्दी किंवा एखादा लढवय्या शूर सरदार होता, अशांतील गोष्ट नाहीं. तो एखाद्या साधारण शेतकऱ्याप्रमाणें असून स्वभावानें अगदीं साधाभोळा माणूस होता; परंतु हा वरील उपदेश करतांना त्याच्या चेहेऱ्यावर इतकी कांहीं वीरश्री आलेली दिसत होती कीं, जणूं काय एखादा मोठा सरदार आपल्या लोकांस आवेश आणण्याकरितां एखाद्या मोठ्या

दरबारांत वीरश्रीनें व देशभक्तीनें ओतप्रोत भरलेलें व्याख्यान देत आहे, असें आह्मां सर्वांस वाटलें.

कांहीं वेळानें तो हळूच मजजवळ आला व आपल्या अंगरख्यांत लपवून ठेविलेलें तें रेशमी फडकें माझ्या कोटाच्या आंतल्या बाजूस खुपसून मला पोटाशीं धरून माझा मुका घेऊन ह्मणाला "बाळ, आतां त्या आस्ट्रियन सेनापतीनें काय सांगितलें तें तूं ऐकिलें आहेसच. त्याप्रमाणें ते मला उद्यां मारण्यासाठीं घेऊन जातील; तेव्हां हें आपलें आवडतें निशाण माझेजवळच राहिलें तर तें त्यांचे आयतेंच स्वाधीन होईल, तेव्हां हें तूं आपल्याजवळ ठेव व याची प्राणापलीकडे जतन कर!"

बाबांचे वरील शब्द ऐकून माझे स्वाधीन आमचे शहरचें निशाण असून मी त्याचा आतां रक्षक झालों, याबद्दल मला मोठा अभिमान वाटून त्या आनंदाचे भरांत आपला बाप उद्यां मरणार या दुःखाचा अगदींच विसर पडल्यासारखा झाला.

[ ४ ]

दुसरा दिवस उजाडला. गेले रात्रीं कत्तल केलेल्या शिपायांचे प्रेतांची व्यवस्था लावण्याकरितां त्या दिवशीं कोणीं एकमेकांवर हल्ला करूं नये, असें तहाचें निशाण शत्रूंच्या छावणींतून सालसवर्ग येथें पोंचविण्याचा आमचे शत्रूंचा बेत झाल्याकारणानें माझ्या बापाची शिक्षा त्या दिवशीं तहकूब राहिली, व इकडील तहाचें निशाण घेऊन जाणाऱ्या शिपायास आमचे शहरांतील छावणीपर्यंत वाट दाखविण्याकरितां कैद केलेल्या आमचे लोकांपैकीं एका ह्मातारे शिपायाची नेमणूक झाली. दोघेहि जाण्यास निघाले, तेव्हां तहाचें निशाण घेऊन जाणाऱ्या शत्रूच्या शिपायानें आमचे लष्कराची व्यवस्था पाहूं नये ह्मणून त्याचे डोळे बांधून त्यास न्यावें, असें ठरलें; पण डोळे बांधण्याकरितां फडकें कोणाजवळहि मिळेना. एकाएकीं माझे मनांत एक विलक्षण कल्पना आली व एक धाडस करण्याचा मीं निश्चय केला. मी आमच्या शिपाई लोकांस ह्मणालों "माझ्याजवळ एक रुमाल आहे त्यानें या शिपायाचे आपण डोळे बांधूं."

दिवस थंडीचे असून जिकडेतिकडे धुकें पसरलें होतें. त्यांतून वेळ अगदीं सकाळची असल्यामुळें सूर्यप्रकाशहि मुळींच पडला नव्हता. तशा अंधुक उजेडांत मीं तें निशाणाचें फडकें बाहेर काढिलें. व कोणास न समजूं देतां त्याची घडी करतांकरतां त्या फडक्यांतील तांबड्या व निळ्या रंगाचे तुकडे आंतल्या अंगास करून बाहेर स्वच्छ पांढरी घडी आणून ती मीं त्या शिपायाच्या डोळ्यांवरून

बांधली. माझ्या युक्तीचा माझें वागास संशय घेऊन त्यांनीं आमच्या आंतील त्या म्हाताऱ्या वाटाड्या शिपायास "शत्रूचा शिपाई आमचे छावणींत गेल्यावर तो तहाबद्दलचा निरोप सांगण्याच्या गडबडींत आहे इतक्यांत तें फडकें आमच्या लोकांच्या हवालीं कर," असें सांगितलें.

परमेश्वराची आमचेवर मोठी खैर कीं, त्यावेळीं हें कोणाच्या लक्ष्यांत न येतां आम्हीं त्या शिपायाचे डोळे बांधिल्यावर तो घोड्यावर बसला आणि आमचा म्हातारा वाटाड्या व तो शिपाई असे दोघेहि शत्रूच्या छावणींतून निर्विघ्नपणें बाहेर पडले. आमचें निशाण आमचा शत्रूच आमच्या छावणींत पोंचविणार या कल्पनेच्या आनंदाचे भरांत आमचा बराच वेळ गेला. दोनप्रहर उलटून गेली. शेजारच्या देवळांतील घड्याळांतला एकाचा ठोका पडून गेला. थोड्या वेळानें बाहेरचा दरवाजा कोणीं उघडला व आमचा म्हातारा वाटाड्या शिपाई परत आलेला मला दिसला. मीं लागलीच त्याचेकडे धावत जाऊन त्याचे कमरेस मिठी मारिली व त्याला विचारिलें "निशाण सुरक्षितपणें गेलेंना?"

त्या म्हाताऱ्यानें मला एकदम उचलून पोटाशीं धरिलें व डोळ्यांत पाणी आणून म्हटलें "होय. परंतु आपला मात्र घात झाला!"

नंतर त्यानें सर्व कची हकीगत सांगितली. ती अशी कीं, आमचे छावणींत जाईपर्यंत सर्व गोष्टी यथास्थित जुळून आल्या. कोणासमुद्धां कांहीं शंका आली नाहीं. तेथें गेल्यावर त्याच्या डोळ्यांवरचें फडकें सोडल्यावर त्या फडक्याच्या आंतल्या घडींत तांबडेनिळे पट्टे असल्याबद्दल त्याचे नजरेस पडलें, व आमची लबाडी त्याचे लक्ष्यांत तावडतोब आली, व त्यामुळें तो फारच रागावून परभारा आपल्या सेनापतीकडे गेला आहे. हें आमचें भाषण चाललें आहे इतक्यांत सेनापतीची स्वारी त्या शिपायासह तेथें आली. आल्याबरोबर त्या शिपायानें आमच्या वाटाड्या शिपायाकडे बोट करून त्यानें आपणांस नेलें असल्याबद्दल सेनापतिसाहेबांस सांगितलें.

"या मनुष्यास आतांचे आतां गोळी घालून ठार केला पाहिजे! याला मारण्याचा हुकुम तयार करून तावडतोब लिहून सहीसाठीं घेऊन ये," असें सेनापतिसाहेब मोठ्या रागाचा आवेश आणून आपल्याबरोबरच्या शिपायाकडे वळून म्हणाले.

इतक्यांत मी पुढें होऊन म्हणालों "सेनापतिसाहेब! हें कृत्य त्याचें नव्हे. ही युक्ति फक्त माझी एकट्याचीच आहे."

हें माझें बोलणें पुरें होतें न होतें इतक्यांत माझा बाप मोठ्या ऐटीनें पुढें येऊन ह्मणाला "बस्स! हें कांहीं कामाचें नाहीं. तुह्मी सर्व गप रहा." नंतर त्या अमलदाराकडे वळून बाबा आवेशानें ह्मणाले. "माफ करा साहेब! आपल्या हाताखालच्या तुकडींतील प्रत्येक मनुष्याच्या कृत्याबद्दल त्या तुकडीचा नाईक जबाबदार असतो, ही गोष्ट खरी नव्हे काय? तर मग निशाण नेण्याबद्दलचा हुकूम मीं सोडलेला होता, तो त्यानें पाळला आहे."

"तुझें नांव काय?"

"सारजंट बिगोर."

"बरें आहे. सारजंट, तुह्मांला आतांचे आतां गोळी घातली जाईल!"

"बेहेत्तर! मला कबूल! मला फक्त इतकीच विनंति करावयाची आहे कीं, माझ्या दोस्तांच्या हातानें मला मरण येऊंद्या. माझ्या लोकांचीं हत्यारें त्यांस परत द्या; त्यांचेबद्दल मी आपल्यास जबाबदार आहें."

सेनापती जरा उतार वयाचा होता. तो माझ्या बापाचें हें भाषण ऐकून व त्याची ती गंभीरमुद्रा पाहून क्षणभर स्तब्ध झाला व ह्मणाला "बरें आहे."

[ ५ ]

माझ्या बापाचें वरील भाषण ऐकून मी भीतीनें अगदीं गांगरून गेलों. बापाची समजूत घालावी ह्मणून त्याचेजवळ बोलण्याकरितां त्याचा अंगरखा मागून ओढून त्यास एके बाजूस नेण्याचा मीं बराच प्रयत्न केला, परंतु माझा बाप तिकडे लक्ष्य देईना. शिपाई लोकांच्या बंदुका परत देतांना त्यानें आपली बंदूक उचलून ती घेऊन तो मजजवळ आला, व मला एकदा कडकडून भेटून व कांहीं न बोलतां ती बंदूक माझे हातांत देऊन त्यानें मला शिपायांच्या रांगेत नेऊन उभें केलें व ह्मटलें "चूप रहा! कवाइतीच्याजागीं तुला बोलतां येणार नाहीं. शत्रूच्यासमक्ष तूं माझा मुलगा आहेस ही गोष्ट विसर. यावेळीं तूं एक शिपाई व मी तुझा नाईक! मी सांगेन तसा वाग."

माझ्या मनांत एकदम भयंकर विचाराचें काहूर माजलें. माझ्या हातांत बंदूक देऊन माझे गोळीनें बापास मरण यावें, असा त्याचा हेतु होता काय? मला कांहीं सुचेना. बापाजवळ एकदातरी बोलण्यास कसें सांपडतें, या विचारांत मी गढून गेलों. इतक्यांत एका शिपायानें आह्मांपैकीं प्रत्येकास एकेक काडतुस आणून दिलें. माझा बाप त्या तुरुंगवजा घराच्या भिंतीजवळ पाठ करून उभा राहिला व त्यानें कवाइतीस सुरुवात केली. कवाइत करतांकरतां आह्मांस त्यानें त्याचे

उभे रहाण्याचे जागेपासून सुमारें पंधरा पावलें मागें सरण्यास सांगून त्याचेकडे तोंडें करून उभें करविलें व नंतर मोठ्या गंभीर आवाजानें आपले हात उंच उभारून एकदम नेम धरण्यास हुकूम केला.

सर्वांनीं माझे बापावर नेम धरिला. माझे हातांतून बंदूक गळून खालीं पडली व मीं एकदम धावत जाऊन रडतरडत बापाचे गळ्यास मिठी मारिली. बापानें मला पोटाशीं कवटाळून धरून पाठीवर हात फिरवित ह्मटलें "बाळ! हे सर्व शिपायी अगदीं नवशिके आहेत. त्यांनां अचूक नेम मारतां येणार नाहीं. तुझा नेम अगदीं बरोबर आहे, तेव्हां माझा सर्व भरंवसा तुझ्यावर आहे. तूं नाहींना चुकणार?"

मला कांहीं उत्तर देववेना. मीं तसाच रडतरडत आमच्या घराकडे नजर फेंकली. बापानें माझ्या मनांतला हेतू जाणला व दोन्हीं हातांनीं माझें डोकें धरून आपल्या तोंडाशीं नेऊन माझा मुका घेऊन ह्मटलें "बाळ, आपल्या आईला संभाळ बरें!"

त्यानें एकदम मला खालीं सोडून शिपायांच्या रांगेंत नेऊन उभें केलें व आपण प्रथमप्रमाणें भिंतीशीं पाठ टेंकून उभा राहिला. शत्रूच्या सैन्यांतील अमलदार आश्चर्यचकित मुद्रेनें पहात स्तब्ध उभे राहिले.

"हुश्शार!" माझा बाप मोठ्यानें ओरडला. मग त्यानें हळूहळू आमचेकडून सर्व तऱ्हेची कवाईत इतक्या शांतपणें करवून घेतली कीं, जणूंकाय तो रोजच्या-प्रमाणें परेडीच्या मैदानांतच उभा आहे. कवाईत चालतांचालतां त्यानें एकदम बंदुका सोडण्यास हुकूम केला. मीं बंदूक सोडली व धाडकन् मागें पडलों!



## गोष्ट २३ वी.

## स्वप्नें खरीं कीं खोटीं.

लक्ष्मीप्रसाद नांवाची आमची एक फतेमारी आहे. दोन वर्षांमागें त्या फतेमारीवर रामजी येसु पाटील नांवाचा तांडेल होता. तो देवाचें गोठणें येथील रहाणारा. देवाचें गोठणें हा गांव श्रीभार्गवरामास इनाम आहे. रामनवमीस आणि परशुरामजयंतीस तेथें मोठा उत्सव होत असतो. त्या गांवांत ब्राह्मण व कुणबी लोकांची वस्ती मोठी आहे. गोठणें गांवांत जोशी हें आडनांव ब्राह्मण, भंडारी, कुणबी, महार या जातींमध्यें आहे. त्यांपैकीं जोशी ब्राह्मण सर्व जातींचीं व जोशी महार आपल्या महार जातीचीं लग्नें लावितात. कुणबी व भंडारी यांनीं तीं कामें ब्राह्मणांकडे सोंपविलीं असावीं असें वाटतें.

रामजी लहानपणीं फतेमारीवर स्वयंपाकी होता. तीनचार वर्षांनीं रामजी खलासी झाला. तें काम त्यानें चांगलें बजाविलें. वेळच्यावेळीं आपल्या कामावर हजर राहून वाऱ्यातान्यांत अवेळीअखेरीस हुषारीनें राहून पुष्कळ अनुभव आणि समुद्राची, खाडीची वगैरे माहिती करून घेतल्यावर तो तांडेलकी करूं लागला. रामजी हा मनुष्य मोठा हुषार, उद्योगी व प्रामाणिक असल्यामुळें व्यापारी, सावकार व दलाल लोकांकडे त्याची चांगली पत असून तो भल्या लोकांत गणला जातो.

रामजी लहान असतां त्याचा बाप मरण पावला. तेव्हां रामजी व त्याचा धाकटा भाऊ लक्ष्मण हे दोघे पोरके झाले. रामजीस आपल्या कुटुंबाचे पोषणाची नेहमीं काळजी असे. रामजी हा देवभोळा असून त्याची श्रीभार्गवरामावर पूर्ण श्रद्धा आहे. एकदा रामजी रामनवमीचे दिवशीं दोनप्रहरीं श्रीभार्गवरामाचें दर्शन घेऊन घरीं येत असतां वाटेंत मराठ्याचें पडकें घरबंद आहे त्या ठिकाणीं रातांबे (कोकम) चांगले लालभडक पिकलेले त्याचे दृष्टीस पडले, ते पहातपहात व दगड मारून पाडित असतां ठेंच लागून जमिनीवर पडला आणि त्याचे पायाचा आंगठा फुटून त्यांतून रक्त वाहूं लागलें. तेव्हां त्यावर तेथील तांबडमाती बसवून एका कुड्याच्या पानानें त्यानें आंगठा गुंडाळिला व नदी उतरून लंगडतलंगडत रामजी घरीं आला. आणि मग त्या फुटलेल्या आंगठ्यावरील बसविलेली तांबड-माती ऊन पाण्यानें धुऊन काढली आणि तो चांगला पुसून त्यावर रामबाणा-वरील भूस लावून पुनः घट्ट बांधून ठेविला.

त्या रात्रीं रामजीस झोंप लागेना. कारण आंगठ्यास भयंकर ठुसठुस लागून सर्व पाय ठणकत होता. चित्तास स्वस्थपणा नव्हता. आपल्यास चांगल्या सरळ

जागीं ठेंच कशी लागली आणि आपण खालीं जमिनीवर सपसेल कसे पडलों, याचा त्यास राहूनराहून चमत्कार वाटत असे. पहांटेच्या प्रहरीं हवेमध्यें किंचित् गारवठा आला तेव्हां रामजीचा डोळा लागला. त्यांत त्याला पुढीलप्रमाणें स्वप्न पडलें. रामजीच्याच शब्दांनीं तें येथें देतोंः—

" एक ब्राह्मण शुचिर्भूत असलेला माझेपुढें येऊन उभा राहिला. त्याचे कपाळास, दंडावर आणि मणगटावर भस्माचे आडवे पट्टे होते. मस्तकावर तांबडे लाल गंधाचा उभा नाम होता. खांद्यावर शुभ्र निऱ्या काढलेली धोतराची घडी होती. उजव्या हातांत पळीपंचपात्री असून डावे हातांत एक लहान रुमाल होता. तोंडानें नामस्मरण चाललें होतें. मला पाहून तो ह्मणाला ' रामा, चल माझे बरोबर.' मला वाटलें, भटजी सकाळींच बोलावित आहेत तर आपण त्यांचे बरोबर जावें. मी त्याचे संगतीं जाण्यास निघालों. तों थेट नदी उतरून पलीकडे ज्या मराठ्याच्या घरवंदावर मी दोन प्रहरीं ठेंच लागून पडलों होतों त्या ठिकाणीं त्यानें मला नेऊन उभें केलें, आणि पडक्या घराच्या पायाच्या दक्षिण बाजूच्या कोंपऱ्यावर गेल्यावर बोटानें दाखवून ह्मटलें 'तें पहा!' मी पाहूं लागलों, तों सुमारें कंबरभर खोल खळगा आहे. त्यांत एक तांब्याचा गडु, त्याचे तोंडावर एक द्रोण बसविलेला, त्या ब्राह्मणानें उचलून एकीकडे केला. तेव्हां मला त्यांत वीसवीस पुतळ्यांचीं दोन गांठलीं, गळ्यांतील सोन्याच्या दोन सऱ्या, पायांतील चांदीचे तोडे आणखी एक कायसें मला त्याचें नांव माहित नाहीं, पण तो हातांत घालण्याचा सोन्याचा दागिना होता. त्या सर्व दागिन्यांची किंमत सुमारें हजारबाराशें रुपयांची असावी. इतके दागिने मला दिसले. ब्राह्मण ह्मणाला ' रामा, हे दागिने पाहिलेसना ? हे तूं घे. उचल.' ते दागिने पाहून आणि ब्राह्मणाच्या तोंडून ' हे तूं घे' असे शब्द ऐकून मी घाबरलों आणि जागा झालों. पुढें मला झोंप लागली नाहीं. कोंबडा आरवला. उजाडल्यावर सकाळीं मी उठून आपले कामास लागलों.

"पुढें चारपांच दिवसांनीं पाय चांगला बरा झाला. आठवे दिवशीं पुन्हा शुक्रवारीं स्वप्नांत तो ब्राह्मण आला, आणि मला ह्मणाला 'रामा, निजलास ? ऊठ, चल, येतोसना ? तूं भिऊं नको. बरोबर एक नारळ घे, पानाचा विडा घे, एक उदबत्ती लावून घे. नारळ तेथें त्या जागेवर नेऊन फोड, पानाचा विडा त्या ठिकाणीं ठेव, आणि परवां दाखविलेले दागिने तूं घेऊन ये. आणून आपल्या देवापाशीं ठेव व तेथें दिवा लाव. तुला कांहीं श्रम पडणार नाहींत; अगदीं बर

आणून मीं ठेविले आहेत. खणावयासहि फार नको.' मला ते दागिने चांगले स्पष्ट दिसत होते. जसे काय कालच मीं ते दागिने पाहिले आहेत असें वाटलें.

"तिसरे शुक्रवारीं रात्रीं स्वप्नांत तोच ब्राह्मण पुनः आला. आणि बोलूं लागला 'रामा, तूं माझें ऐकत नाहींस?' मी त्याला ह्मणालों 'मला तुमची भीति वाटते.' त्यावर तो ह्मणाला 'मला तूं भितोस तो मी काय ब्रह्मराक्षस आहें? तुला जर माझी भीति वाटते तर आणखी दुसरा इसम मी तुझे सोबतीस देतों. तो पहा.' मला त्याचे बाजूस उभा असलेला दुसरा इसम दिसला. त्याला पाहिल्यावर मला धीर आला, आणि तोहि मला ह्मणाला. 'रामा, तूं भिऊं नको. तुझा रखवाली मी आहें.' त्या दोघांच्या बरोबर मी पुन्हा तेथें गेलों. दोघांच्यामध्यें मी चालत होतों. दुसरा तोहि भट होता. त्यानें मला धीर दिल्यावर मी गेलों तो पूर्वींच्या मराठ्याच्या घरवंदावर. त्यांनीं मला उभें करून तो गड्डू काढला, आणि त्यांतील प्रत्येक दागिना बाहेर काढून दाखविला. तें पाहून पुतळ्या, सऱ्या, तोडे, दुसरा एक दागिना होता तो मिळून सर्व सोन्याचेच आहेत खरे, यांत कांहीं अंदेशा नाहीं, अशी माझी खात्री झाली; परंतु हा भटजी मला हे दागिने कां देतो? त्याचें कारण समजेना. मला तेव्हां वाटलें कीं, हा कोणी महापुरुष असावा. माझा बळी घेण्याच्या हेतूनें मला येथें आणून हे दागिने दाखवून मीं त्या आशेनें ते दागिने घेतले ह्मणजे हे दोघे माझा जीव घेणार नाहींतना? असें मनांत येऊन मी घाबरून गेलों आणि भीति वाटून मोठ्यानें निजेंत ओरडलों. माझे शेजारीं माझी आई आणि भाऊ निजलेलीं होतीं तींहि त्यामुळें जागीं झालीं व 'काय झालें? काय झालें? रामा झालें काय? ओरडलास कां?' ह्मणून मला विचारूं लागलीं. आईनें उठून लगेच दिवा लावला. मी जागा होऊन चांगला शुद्धीवर आल्यावर आईला सांगितलें 'मला स्वप्न पडलें. स्वप्नांत मी भ्यालों.' सकाळीं उठल्यावर आईला मीं रात्रीचें स्वप्न सांगितलें. 'आज तीन शुक्रवारीं मला स्वप्न पडत आहे. पहिल्यानें रामनवमीचे दिवशीं पडलें!' आई ह्मणाली 'स्वप्नें काय खरीं असतात?' मी ह्मणालों 'छे. स्वप्न पडून इतके दिवस झालेना? परंतु मला वाटतें कीं आज रात्रींच प्रत्यक्ष मीं ते दागिने पाहिले आहेत.'

"चवथा शुक्रवार आला. मला स्वप्न पडेल अशी अगोदरच धुगधुग होती. नित्याप्रमाणें तो ब्राह्मण आला आणि आमच्या ओटीवरच्या चौरंगावर बसला आणि मला ह्मणाला 'रामा, मूर्खा भितोस काय? मी महापुरुष नव्हें किंवा समंध नव्हें, समजलास. मी तुझा रखवाली आहें. हें तुला सांगितलें असतां

समजत नाहीं कांय ? अरे, माझें आतां कुणी राहिलें नाहीं. हे माझ्या बायकोचे दागिने, चोरपोर कुणीतरी खाऊन जाईल, याकरितां मी आपल्या खुषीनें तुला देतों. आतां उद्यां तूं पांच ब्राह्मणांची समाराधना घाल, आणि परवां दाखविल्याप्रमाणें व सांगितल्याप्रमाणें नारळ विडा ठेव आणि तो गड्डू घेऊन जा. हें कुणास सांगूं मात्र नको. त्याची परिस्फुटता करूं नको. हें तुला सांगून ठेवतों आहें, तें लक्ष्यांत असूं दे.' असें सांगून तो ब्राह्मण निघून गेला. सकाळीं उजाडल्यावर मी उठलों. काय करावें तें सुचेना. त्या दिवशीं दोन प्रहरीं माझी आते आंबोळगडाहून आली. तिला स्वप्नांतील सर्व हकीगत मीं सांगितली. त्यावर आते ह्मणाली 'असें जर आहे, आज एक महिना कोण तुझा हितचिंतक तुझ्या पाठीस लागला आहे, तर त्याप्रमाणें पांच ब्राह्मणांचीं जोडपीं जेवावयास घाल आणि तो सांगतो आहे त्याप्रमाणें कर. परंतु बाबा स्वप्न आहे तें, तें काय खरें असतें ? अशींच कुणाकुणास स्वप्नें पडतात. स्वप्नांत द्रव्यहि दिसतें. खरें खोटें देवास ठाऊक! पण आधीं ती जागा खणून त्यांत कांहीं आहे कीं काय तें पहा, आणि नंतर ब्राह्मण घालण्याचें व नारळ विडा तेथें ठेवण्याचें जें काय त्यानें सांगितलें असेल तें कर. ब्राह्मण जेऊन जातील व तूं गरीब खर्चांत पडशील!'

"याप्रमाणें आतेनें सांगितल्यावर मला पुष्कळ धीर आला आणि त्याप्रमाणें खास करावयाचें असें मीं ठरविलें. दोन दिवस राहून आते आपल्या गांवीं आंबोळगड येथें गेली. जातेवेळीं तिनें मला बजावून सांगितलें कीं 'रामा, तूं जें काय करणार तें सांभाळून कर हो.' पुन्हा शुक्रवारीं तो ब्राह्मण स्वप्नांत आला व मला हालवून जागें करूं लागला. त्यानें दोनतीन हांका मारल्या, तेव्हां मी जागा झालों. पहातों तों समोर तो भटजी उभा आहे. मी त्याचे पायां पडलों. तेव्हां तो बोलला रामा, तुला सांगितलें कीं तूं हें कोणास सांगूं नको. फार जपून कर ह्मणून. तुला स्वतः अक्कल नाहीं व दुसऱ्यानें सांगितलेलें ऐकत नाहींस. आपलें शहाणपण खर्च करितोस. गड्डू काढून नेण्याची हिम्मत मात्र धरिली आहेस, परंतु आधीं ब्राह्मणभोजन घाल आणि नंतर सांगितल्याप्रमाणें व्यवस्था करण्याच्या कामास लाग. भिऊं नको. पाहिजे तर दुसरा माणूस नदीपावेतों सोबतीस घे. त्या ठिकाणापर्यंत मात्र कुणास नेऊं नको. मी तेथें तुझ्या सोबतीस आहेंच. हें कृत्य शनिवारीं रात्रीं कर. आणि गड्डू घेऊन गेलास ह्मणजे आपल्या देवापाशीं नेऊन ठेव व त्या ठिकाणीं रात्रभर दिवा लावलेला असावा. हें विसरूं नको.' असें

त्यानें मला सांगितलें, आणि मग मी जागा झालों. मला यावेळीं पूर्वीप्रमाणें भीति वाटली नाहीं.

" या कामीं मी त्रासलों. मला त्या कामाची मग जास्त भीति वाटूं लागली. अन्न गोड लागेना. आधीं ब्राह्मणभोजन घालण्यास दहावीस रुपये पाहिजेत ते कुठून आणावे ? तसेंच रात्रीं काळोखांतून एकटा एक कोस लांब जाऊन ही कामगिरी बजवावयाची, ही गोष्ट लक्ष्यांत आली ह्मणजे पोटांत धस्स होई. शेवटीं शेंडी तुटो कीं बोंडी तुटो, हें काम करावयाचें असा निश्चय करून त्याच दिवशीं दोनप्रहरीं खांद्यावर पहार घेतली आणि निघालों. नदीच्या डोहांत जोशी, करगुटकर, फोडकर यांचे मुलगे आंघोळ करित खेळत होते. त्यांस हांक मारून ह्मटलें 'चला, यारे तुह्मांला गम्मत दाखवितों.' तेव्हां तेहि आले व माझे मागें चालले. आह्मी सर्व त्या मराठ्याच्या घरवंदाकडे निघालों. त्या पोरांस वाटलें कीं, मी कांहींतरी औषधें खणण्यास जात आहें. परंतु डोंगराची बाजू सोडून मी जेव्हां मैदानांत शेतांतून जाऊं लागलों, तेव्हां ते मला विचारूं लागले कीं 'रामदादा, आह्मांला कुठें नेतोस तेंतरी सांग ?' मी त्यांस ह्मणालों 'तुह्मांला ठेवणें दाखवितों चला.' आठदहा मिनिटांनीं आह्मी सर्व त्या घरवंदावर गेलों. स्वप्नांतील जागा मला प्रत्यक्ष पाहिल्यासारखी दिसत होती. जशी कांहीं पूर्वीं ती मीं पाहिलीच होती. तेथें जाऊन मी उभा राहिलों, आणि खणण्यास आरंभ केला. ढोपरभर खणल्यावर एक वाटोळा दगड लागला, तो बाहेर काढिला आणि पुन्हा खणण्यास लागलों. तेव्हां तेथें कावळे जमले. ते सुमारें चाळीसपन्नास असावे. त्यांतील दोन कावळे आमची भीति न धरितां पुढेंपुढें येत व कावकाव ह्मणून सर्वच ओरडत व कावळ्याच्या लहान पोरास मारतांना किंवा त्यांचीं अंडीं त्यांच्या घरट्यांतून काढतांना जसे कावळे झडप घालतात, धिटाईनें पुढें येतात तसे ते दोन कावळे झडप घालीत. सुमारें कंबरेइतका खोल खाडा खणल्यावर पहार मारली तों पहारेच्या टोंकास कांहींतरी भांडें खालीं जमिनींत लागत आहे असा भास झाला. तेव्हां बरोबरीचे पोर ह्मणूं लागले 'आहे रे आहे ! बाजूनें खणा.' त्यांनीं मला खणण्यास व माती बाहेर काढण्यास मदत केली. आम्हांला तांब्याचा एक भाग दिसूं लागला. त्याचेसभोंवारची माती काढून तांब्या मोकळा झाल्यावर मीं तो बाहेर काढून घेतला. त्याचे तोंडावर एक वाटी बसविलेली होती ती फार उत्सुकतेनें वरची माती व गंज काढून मोकळी केली आणि मोठ्या जोरानें ती वाटी वर ओढून काढिली. परंतु आंत पाहतों तों

लोखंडाचें किटण! मला स्वप्नांत जो तांब्या व त्यावरची वाटी दिसत होती ती तीच. पण त्यावेळीं आंत सोन्याचे दागिने पिवळे धमक दिसत होते ते मात्र नाहींत! त्यांचेऐवजीं कोळशासारखें किटण दिसलें. मला अत्यंत चमत्कार वाटला आणि फार वाईटहि वाटलें. कारण त्या ब्राह्मणानें सांगितल्याप्रमाणें केलें असतें तर तें सोन्याचें डबोलें खचित मला मिळालें असतें, अशी माझी बालंबाल खात्री झाली. तो तांब्या व वाटी बरोबर घेऊन मी घरीं यावयास निघालों. पोरांनीं माझी टर उडविली. मी शरमिंदा झालों. घरीं आल्यावर शेजाऱ्या-पाजाऱ्यांस झालेली हकीगत सांगितली तेव्हां कांहीं वृद्ध ह्मणूं लागले कीं 'असें द्रव्य पुष्कळांच्या स्वप्नांत दिसतें; परंतु शेवटीं पाहूं गेलें तर त्याचे कोळसे होतात.' कांहीं ह्मणूं लागले 'तूं सांगितल्यासारखें वर्तन केलें नाहींस ही तुझी चुकी आहे.' मीं ती कबूल केली. त्या दिवशीं मला अत्यंत वाईट वाटत होतें. माझे हातचा लाभ विनाकारण गेला, असें मला झालें. त्यादिवशीं मला अन्नहि गोड लागलें नाहीं. आणि असे वाटे कीं, तेथें खाडा खणतांना कावळे कां जमले? जे दोन कावळे आह्मांला खावयास येत ते ते स्वप्नांतील ब्राह्मण तर नव्हत ना? रात्रीं झोंपेंत स्वप्न पडलें तेव्हां पुन्हा ते भटजी आले आणि ह्मणाले 'राम्या, तूं कपाळकरंटा आहेस. सांगितल्याप्रमाणें व्यवस्था केली नाहींस. दुसऱ्याचें ऐकून आपला लाभ दवडिलास. तो तुझाच होता. देव देतो आणि कर्म नेतें तें हें बरें!' असें सांगून तो ब्राह्मण रागारागानें निघून गेला. तेव्हां मीं आपलें तोंड बडवून घेतलें. स्वप्नांत मीं प्रत्यक्ष त्या ब्राह्मणाबरोबर बोलत असें, असें मला वाटे. तो तांब्याचा गडू व त्यावरची वाटी अपवित्र आहे असें लोकांनीं सुचविल्यावरून तीं मीं नदीच्या डोहांत फेकून दिलीं. तेव्हांपासून आपला स्वप्नावर पूर्ण विश्वास आहे."

स्वप्नें पडतात त्यांत पुष्कळ गोष्टी खऱ्या असतात, असें रामजी तांडेल याचें मत झालेलें आहे. स्वप्नें खरीं कीं खोटीं, याचा निवाडा कोणी करील काय?

## गोष्ट २४ वी.

# दोन बहिणी.

अहमदनगरापासून कांहीं अंतरावर एक सुंदर कबरस्थान आहे. ही इमारत तांबड्या दगडांची असून ताजमहालाप्रमाणें हिच्यांत कारागिरीची कुशलता थोडीबहुत दृष्टीस पडते. लांबून ह्या कबरीकडे पाहिलें असतां ही एकच इमारत आहे असें वाटतें खरें, परंतु जवळ जाऊन पाहिलें ह्मणजे ह्या दोन इमारती आहेत अशी खात्री होते. या इमारतीचा इतिहास मोठा रहस्यपूर्ण असल्यामुळें **मनोरंजनाच्या** वाचकांसाठीं तो थोडक्यांत येथें देतों.

दक्षिणेंत मराठ्यांचें प्राबल्य झालेलें पाहून त्यांचें शासन करण्यासाठीं औरंगजेब बादशहा स्वतः दिल्ली सोडून निघाला व त्यानें दक्षिणेंत येऊन अहमदनगर हें शहर वसवून तेथें आपला तळ दिला. तेथेंच त्याचा अंत झाला व त्याची कबर तेथें अजून दृष्टीस पडते. औरंगजेब व त्याचा पुत्र बहादुरशहा ह्यांच्यामध्यें त्यावेळीं बेबनाव झालेला होता, हें इतिहासवाचकांस सांगावयास नकोच. बहादुरशहा आपल्या बापाला सोडून आपल्या सैन्यानिशीं मराठ्यांस जाऊन मिळाला होता. बादशहाच्या पदरच्या मोंगल सरदारांपैकीं व त्याचप्रमाणें रजपूत कुमारांपैकीं कोणाचीहि त्याचेबरोबर जाण्याची हिंमत झाली नाहीं. त्याच्या पक्षाला जाऊन मिळावें असें पुष्कळांनां मनांतल्या मनांत वाटत होतें खरें, तथापि बादशहाच्या भीतीमुळें तसें उघडउघड करण्याची कोणाची छाती होईना. फक्त एक मोंगल मुलगा त्याच्याबरोबर गेला व पुढें सुखदुःखाच्या सर्व प्रसंगांत तो त्याच्या बरोबर होता. ह्या मुलाला दिलखुष असें ह्मणत. त्याचें खरें नांव जलालुद्दिन होतें. परंतु त्याच्या सुंदर चेहेऱ्याकडे पाहिलें ह्मणजे सर्वांचें दिल(मन) खुष होऊन जाई, ह्मणून त्याला दिलखुष हें नांव मिळालें होतें. बहादुरशहाच्या थोरल्या बेगमेची कलमा नांवाची एक दासी होती, तिचा हा पुत्र. परंतु त्यावर बहादुरशहाचें प्रेम पाहून व त्या दोघांच्या चेहेऱ्यांतील साम्य पाहून लोक त्याला बहादुरशहाचा मुलगाच समजत व मोठमोठे सरदारसुद्धां त्याचा तसाच मान राखीत. बहादुर-शहाच्याबरोबर जाण्याची कोणाची हिंमत झाली नाहीं तेव्हां हा केवळ पंधरा वर्षांचा बालवयी दिलखुष हिंमत धरून कोणाचें न ऐकतां हिय्या करून निघाला.

ज्या दिवशीं रात्रीं अंधारांत बहादुरशहा लपूनछपून बादशहाची छावणी सोडून निघाला त्या दिवशीं घडलेली एक गोष्ट येथें सांगितली पाहिजे. दिलखुषनें बहादुरशहाची परवानगी आधींच घेऊन ठेविली होती आणि असें नक्की ठरलें होतें कीं, त्यानें, रात्रीं अंधारांत छावणीच्या पिछाडीच्या दरवाजाबाहेर बहादुरशहाला

येऊन मिळावें. तेथेंच त्यांच्याकरितां चपळ घोडे तयार ठेवण्याची तजवीज केली होती. ज्या दारानें छावणीच्या बाहेर पडावयाचें, त्या दारावरील पहारेकऱ्याला बहादुरशहानें लांच देऊन आपलासा करून ठेविला होता, व हें काम बेमालूम उरकण्याचें काम दिलखुषवर सोंपविलें होतें. त्यानें तें काम राजपुत्राच्या आज्ञेप्रमाणें चोख करून ठेविलें होतें खरें, परंतु त्याच्या हुकुमावांचून आणखी एक गोष्ट जास्त करून ठेविली होती. छावणी सोडून दोघेच जावयाचे, परंतु दिलखुषनें तीन माणसांनां सोडण्याबद्दल पहारेकऱ्याशीं करार करून ठेविला होता. बहादुरशहाला ह्या तिसऱ्या माणसाबद्दल कांहींच बातमी नव्हती. ह्या कामांत बहादुरशहाचें व पहारेकऱ्याचें बोलणें झालें होतें, त्यावेळीं फक्त बहादुरशहा व दिलखुष असे दोघेच जाणार, असें ठरलें होतें. त्यामुळें तिसऱ्या माणसाचें नांव निघतांच पहारेकऱ्यानें दिलखुषला ह्मटलें "हें आणखी कोण? ह्याच्याविषयीं सुलतानसाहेबांनीं मला कांहीं फर्माविलें नाहीं!"

दिलखुषनें जरा हंसून उत्तर केलें "प्रथम हा माणूस जाण्याचें ठरलें नव्हतें; परंतु त्याला बरोबर नेण्याचा सुलतानसाहेबांचा आतां नक्की विचार झाला आहे च ह्याबद्दल तुला पंचवीस मोहोरा अधिक देण्याबद्दलहि मला सांगितलें आहे!"

ह्या त्याच्या बोलण्यावर पहारेकऱ्याचा विश्वास न बसून त्यानें पुनः विचारिलें "पण हा तिसरा माणूस कोण?"

दिलखुषनें सांगितलें "सैन्यांतील सरदारांपैकीं कुणी नाहीं. एक मुलगी आहे. सुलतानसाहेबांच्या ती विशेष मर्जींतली आहे."

"तुह्मी तिघेंजण बरोबरच जाणार का?"

"नाहीं. तसें करतांना कदाचित् कुणी पाहील. ह्मणून प्रथम मी जाईन; माझ्या मागून अर्ध्या तासानें सुलतानसाहेब येतील व त्यांच्यामागून अर्ध्यातासानें ती मुलगी येईल."

"पहा, मी आपल्या स्वताच्या मानेवर तरवार ठेवून तुमचें हें काम करतों आहें. सुलतानसाहेब बादशहा झाले ह्मणजे मला सरदारी द्यावी लागेल, असें त्यांनां आपण सांगा."

दिलखुष त्या यःकश्चित् पहारेकऱ्याची मोठी हांव पाहून मनांतल्या मनांत थोडा हंसला आणि ह्मणाला "हें काय सांगायला पाहिजे? तेंतर होणारच! बरें तर सर्व ठीक जुळलें?"

पहारेकऱ्यानें निश्चयाच्या स्वरानें ह्मटलें "हो, जुळलें. किती वाजतां जाणार?"

दिलखुष ह्मणाला "बारा वाजल्यानंतर! पण पहा, सावध रहा हो. कुणाला कळतां उपयोगीं नाहीं."

"माझ्या जिवाची मला कांहीं काळजी नाहीं का?"

"बरेंतर, मी आतां जातों."

असें बोलून दिलखुष तेथून निघून बहादुरशहाच्या तंबूत आला. त्यानें पहारेकऱ्याशीं केलेल्या सर्व बंदोबस्ताची हकीगत बहादुरशहाला सांगितली; परंतु त्यांत त्या तिसऱ्या माणसाचें नांव काढलें नाहीं. राजपुत्रानें नेमलेल्या वेळीं छावणीच्या पिछाडीच्या दरवाजावर हजर असण्याबद्दल दिलखुषला बजावलें व तो दुसऱ्या व्यवस्थेला लागला.

[ २ ]

अमावास्येची अंधेरी रात्र; काळाकुट्ट अंधार पडला आहे; आकाश ढगांनीं व्याप्त झालें आहे; मधूनमधून वीज चमकत आहे; वारा सोसाट्याचा सुटला आहे; ह्याप्रमाणें चहूंकडून प्रलयकालची तयारी होत असल्याचा भास होत आहे. अशी संधी सांपडल्यावर मराठेबहादुर बादशहाचे छावणीवर हल्ला करावयास चुकावयाचे नाहींत, ह्मणून छावणींत बादशहाचे हुकुमावरून सक्त पहारा चालला होता. पंचहत्यारांनीं सज्ज होऊन शिपायांच्या टोळ्या रस्तोरस्तीं गस्त घालित होत्या. ह्याप्रमाणें जिकडेतिकडे कडेकोट बंदोबस्त होता.

छावणीच्या घड्याळावर रात्रीच्या बारांचा ठोका पडला. छावणीच्या पिछाडीच्या दरवाजावरचा पहारेकरी दाराला टेंकून किंचित् डुकली घेत होता, इतक्यांत घड्याळाचा आवाज कानीं पडून तो खडबडून उठला. एक–दोन–तीन असे बारा ठोके त्यानें मोजले. घड्याळाचा आवाज जोरानें वहाणाऱ्या वाऱ्यांत मिळून जात होता. इतक्यांत त्यानें पाहिलें कीं, कोणी एकजण आपल्या सर्व अंगावर पांघरूण गुरफटून घेऊन वेशींतून बाहेर गेला. तो दिलखुष गेला, असें त्याला वाटून तो कांहीं बोलला नाहीं.

ह्यानंतर बराच वेळ गेला. बहुधा अर्धातास होऊन गेला असेल. आणखी एक मनुष्य अंगावर पांघरूण घेऊन दरवाजाकडे येत आहे, असें पहारेकऱ्याला दिसलें. हा खुद्द बहादुरशहा असावा असें त्याला वाटलें. येणारा मनुष्य दरवाजाजवळ आला, लागलीच पहारेकऱ्यानें त्याला तरवारीची सलामी दिली, पण तो मनुष्य कांहींएक न बोलतां झटकन् दरवाज्यांतून बाहेर गेला. तो गेल्यानंतर पहारेकरी तिसरें माणूस येणार होतें त्याची वाट पहात बसला. बराच वेळ झाला तरी कोणी

येत नाहीं हें पाहून तो कंटाळला व जराशी डुलकी घ्यावी ह्मणून त्यानें आपलें डोकें भिंतीला टेंकिलें. त्याच्या डोळ्यांवर झोंप आली. झोंपेंत त्याला असा भास झाला कीं एक मुलगी अगर मुलगा सर्वांगावर पांघरूण घेऊन दरवाजाबाहेर गेला. तें माणूस गेल्यावर तो चांगला जागा झाला. इतक्यांत त्याला आणखी एक लहान मुलगी दरवाज्यांतून बाहेर जातांना दिसली. तीन मनुष्यें जावयाचीं असें ठरलें होतें, चार नव्हेत; अशी तितक्यांत त्याला आठवण होऊन त्यानें झटकन् जाऊन त्या मुलीचा हात धरला. मुलीनें आपला हात सोडवून घेण्याचा प्रयत्न केला, परंतु व्यर्थ. इतक्यांत वीज चमकली व त्या प्रकाशांत त्याला असें दिसलें कीं मुलगी अतिशय सुस्वरूप असून वय बारातेरा वर्षांचें असावें. तिला आपण कोठेंतरी पूर्वी पाहिलें असावें, असा संशय येऊन तो आठवण करूं लागला; परंतु कांहीं ध्यानांत येईना. तो जात्या कठोर मनाचा होता खरा, परंतु मुलीचें तें सुंदर स्वरूप पाहून विरघळला. तिला तो आदबीनें ह्मणाला "तीन माणसें जाऊं द्यावयाचीं असा करार आहे. आपण कोण आहां?"

मुलगी हंसून ह्मणाली "मी त्या तिघांपैकींच एक आहें."

"तीन माणसेंतर गेलीं हें मीं खासच पाहिलें. तुह्मी तिघांपैकीं नाहीं आहांत."

मुलीनें आपल्या गळ्यांतून एक मौल्यवान हार काढून पहारेकऱ्याचे हातांत टाकला आणि ह्मणाली "मला जाऊं दे."

पहारेकऱ्यानें हार परत देऊन ह्मटलें "हार घेऊन मला काय करायचें आहे? माझें शीर सलामत राहील तर हार घालायचा कीं नाहीं?"

पहारेकऱ्याचें हें भाषण ऐकून मुलगी जराशी अस्थिर होऊन ह्मणाली "पहा, मीतर जाणारच. तुला मला अटकाव करतां यावयाचा नाहीं. जर तूं मला जाऊं देणार नाहींस तर मी आतां आरडाओरड करून माणसं जमा करीन आणि त्यांनां सांगेन कीं तूं आतांच लांच घेऊन बहादुरशहाला छावणींतून निघून जाऊं दिलंस."

मुलीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच पहारेकरी घाबरून थरथर कांपूं लागला. मुलीचा हात चटकन् सोडून देऊन तो दोनतीन पावलें मागें सरकून उभा राहिला. मुलगी क्षणांत दिसेनाशी झाली!

मुलगी गेल्यावर पहारेकरी एकदम दचकला. ती मुलगी कोण तें त्याला आतां आठवलें. तो विस्मयानें स्वताशीं ह्मणाला "ही छोकरी तर बेगम खासमहालची मुलगी सुलताना जुमेला!"

त्या रात्रीं छावणींतून तीन माणसें बाहेर निघून गेलीं हें पहारेकऱ्याशिवाय दुसऱ्या कोणाला कळलें नव्हतें. ह्या तीन माणसांशिवाय आणखी एक माणूस कोण गेलें तें पहारेकऱ्यालाहि समजलें नाहीं. त्यानें सर्व रात्र तें माणूस कोण असावें ह्मणून विचार केला; परंतु त्याला नक्की कांहीं कल्पना बांधतां येईना. शेवटीं त्यानें आपल्या मनाची अशी समजूत केली कीं, तीनच माणसें गेलीं. चवथ्याचा निवळ भास झाला असेल.

दिवस उजाडतांच बहादुरशहा पळाल्याचें समजल्यावर छावणींत मोठी गडबड उडाली. औरंगजेब मनस्वी संतापला. मुसलमान लष्कर चारी दिशांनां तपासास निघालें. पुष्कळ शिकस्त केली, परंतु बहादुरशहाचा पत्ता लागला नाहीं.

[ ३ ]

खासमहाल औरंगजेबाची सर्वांत आवडती बेगम होती. तो आपल्या स्त्रियांनां निष्ठुरतेनें वागवित असे; परंतु अति रूपवान अशा खासमहाल बेगमच्या प्रेमांत मात्र तो पूर्णपणें सांपडला होता. खासमहाल जें कांहीं ह्मणेल त्याला ना ह्मणण्याची त्याची प्राज्ञा नव्हती. खासमहालला दोन जुळ्या मुली होत्या. एकीचें नांव जुमेला आणि दुसरीचें रुमेला. ह्या मुलींसारख्या सुंदर मुली त्यावेळीं साऱ्या जनानखान्यांत नव्हत्या, अशी ख्याती होती. शिवाय त्या दोघी दिसण्यांत इतक्या एकसारख्या होत्या कीं, खुद्द खासमहाल बेगमलासुद्धां ओळखण्यास पंचाईत पडत असे. ही रुमेला कीं जुमेला हें तिला नक्की सांगतां येऊं नये, ह्यामुळें जनानखान्यांत नेहमीं ह्या गोष्टीसंबंधानें हंशा पिकत असे. बादशहा ह्या मुलींनां प्राणाच्या पलीकडे प्यार मानित होता व त्यांच्या सुखाकरितां काय वाटेल तें करण्यास तयार असे.

बहादुरशहा छावणी सोडून गेल्यामुळें बादशहाला फार दुःख झालें. त्याच्यावर बादशहाची सगळी भिस्त होती. त्याच्या हातांत सर्व हिंदुस्थानचें राज्य देऊन आपण मक्केच्या यात्रेला जावें, असा त्याचा मानस होता. तें सर्व जागच्याजागीं राहून तो आपणाला सोडून गेला, इतकेंच नव्हे, तर आज तो मूर्तिमंत शत्रूच उत्पन्न झाला, हें पाहून औरंगजेबाच्या अंतःकरणाचें पाणी पाणी झालें. परंतु हें सर्व दुःख तो मुकाट्यानें सोशित होता. त्याच्या अंतःकरणांत पुत्राच्या दुराचरणामुळें खळबळ उडून गेली होती, परंतु त्याचें चिन्ह त्यानें बाहेर दिसूं दिलें नाहीं. परंतु जेव्हां त्यानें ऐकिलें कीं, आपल्या प्राणाहून प्रिय मुली रुमेला व जुमेला ह्याहि छावणी सोडून गेल्या, तेव्हां त्याला दुःख सहन न होऊन तो निपचित

पडला. त्यानें बिछाना धरिला. ह्या शोकामुळें त्याचें पाषाणासारखें कठोर हृदय विदीर्ण झालें. तीन दिवस त्याच्यासमोर जाण्याची कोणाला हिंमत झाली नाहीं.

कन्याशोकामुळें वेडी झालेली खासमहाल बेगम धावतधावत बादशहाच्या पायांजवळ येऊन बसली आणि "माझ्या मुली मला आणून द्या," असें शोकपूर्ण करुणस्वरानें बादशहाला विनवूं लागली. परंतु बादशहाचा कांहीं इलाज चालेना. मुलींच्या शोधाकरितां कांहींएक करण्याची ह्मणून औरंगजेबानें बाकी ठेविली नव्हती. मोंगल लष्कर छावणीच्या चारी दिशांस लांबवर जाऊन अनेक तऱ्हांनीं तपास करून आलें, परंतु पत्ता लागला नाहीं.

तीन दिवसांनीं बादशहानें बिछाना सोडला. तेवढ्या अवधींत रुमेला व जुमेला यांची कांहीं खबर लागून त्या परतहि आल्या होत्या! त्या आल्या ह्मणण्यापेक्षां त्यांचीं मृत शरीरें आणलीं, असें ह्मणणें युक्त दिसतें. मुसलमान शिपायी पहाडांतून, जंगलांतून त्यांच्या तपासाकरितां हिंडत असतां त्यांनां त्या मुलींचे मृतदेह सांपडले, ते त्यांनीं छावणींत आणले. जुमेलेच्या उरांत एक कट्यार भोंसकलेली होती व रुमेलेच्या अंगावर हत्याराचा वार लागल्याचें कांहीं चिन्ह नव्हतें. जुमेलेच्या गळ्याला मिठी मारून रुमेला तिच्या अंगावर पडली होती व दोघींचे ओंठ एकमेकींच्या ओंठांनां मिळाले होते. अशा स्थितींत त्यांचीं प्रेतें शिपायांनां दिसलीं व त्यांनीं तीं जशींच्यातशींच बादशहाकडे आणिलीं. औरंगजेब तो हृदयद्रावक देखावा पाहून जागच्याजागीं थिजला. कांहीं वेळानें जवळच्या माणसांनीं पाहिलें तों तो मूर्छित पडला होता!

[ ४ ]

दिलखुषचें एकट्या जुमेलेवरच प्रेम होतें; परंतु दिलखुषवर रुमेला आणि जुमेला या दोघींचें प्रेम होतें. हें त्यांचें प्रेम निर्मळ, शुद्ध, निष्पाप असें होतें. दिलखुष आणि जुमेला हीं उभयतां एकमेकांशीं गुजगोष्टी करीत, हंसतखेळत. रुमेला हें सर्व पाही व तिच्या कोंवळ्या मनाला फार दुःख होई. पण हें दुःख तिनें पोटांतच ठेविलें, दुसऱ्या कोणाला कळूं दिलें नाहीं. दिलखुषनें छावणी सोडून जाण्याबद्दल झालेला आपला निश्चय जुमेलेला सांगितला होता. पोरबुद्धीला अनुरूप अशा चंचल विचारानें जुमेलेनें दिलखुषबरोबर येण्याची इच्छा प्रदर्शित केली. "मी तुला सोडून एक पळभरहि रहाणार नाहीं," असें ती ह्मणाली. दिलखुष पोरवयच होता. त्यालाहि पोक्त विचार सुचला नाहीं व त्यानें बहादुरशहाला आधीं न कळवितां जुमेलेला छावणींतून घेऊन जाण्याचा विचार नक्की केला होता.

रुमेलेनें दिलखुष व जुमेला यांची ही मसलत आडून ऐकिली होती. त्या दोघांच्या गोष्टी काय चालतात त्या आडून ऐकण्याचा तिचा नेहमींचा क्रम असे. त्या दोघांचा एकमेकांबद्दल आदर, त्यांच्या जिवाभावाच्या गोष्टी, त्यांचें एकमेकांवरील निष्कपट, पूर्ण प्रेम हीं तिच्या हृदयांत जणूं विषाच्या कांट्यासारखीं सलत होतीं. शेवटीं त्या दोघांचें सुख तिला पहावेना. त्यांच्या सुखांत अंतर पडेल असें कांहींतरी करावें, अशी उत्कट इच्छा तिला झाली. ह्याच वेळेस तिनें दिलखुष व जुमेला यांची पळून जाण्याची मसलत ऐकिली. या दोघांनीं बरोबर जाऊन सुख भोगावें व आपण मात्र दुःखांतच आयुष्य कंठावें, हें तिला रुचेना. आपणहि त्यांच्या मागोमाग जावें, असा तिनें बेत केला.

त्या दोघी बहिणी एकाच दिवाणखान्यांत निजत असत. रुमेलेला गाढ झोंप लागली आहे असें वाटून जुमेला हलकेच बिछान्यावरून खालीं उतरली व तिनें पळून जाण्याची तयारी चालविली. ती गेल्यावर थोड्या वेळानें रुमेलाहि उठली व अंधारांत जुमेलेच्या मागून कांहीं अंतरावर चालूं लागली. छावणीच्या दरवाज्यांतून ती कशा रीतीनें बाहेर पडली, तें वर सांगितलेंच आहे.

छावणीच्या मागच्या बाजूस डोंगरांची एक रांग होती व दोन टेंकड्यांचेमधें हिरव्याचार गवतानें भरलेली एक खिंड होती. दिलखुषनें त्या खिंडींत आपली वाट पहाण्यास जुमेलेला सांगितलें होतें. त्या ठिकाणीं त्या दोघांची गांठ पडावयाची होती. दिलखुषनें जुमेलेला त्या खिंडीचा रस्ता चांगला सांगून ठेविला होता. जुमेला छावणींतून बाहेर पडली ती तडक त्या खिंडीकडे चालली. रुमेलाहि अंधारांत तिच्या मागोमाग चालली. दोघींच्याहि मनांत आपआपले विचार सारखे चालू होते. नाहींतर तशा अंधारांत खिंडीकडे जाण्याची त्यांनां साहजिक भीति वाटली असती. त्यांच्या हृदयांत त्यावेळीं भीतीला जागाच नव्हती !

नेमलेल्या जागेवर पोहोंचतांच जुमेला खालीं बसली. रुमेलेला अंधेरांत स्पष्ट न दिसल्यामुळें तिनें जुमेलेला खालीं बसतांना पाहिलें नव्हतें, ह्मणून ती तशीच सरळ चालली होती. चालतांचालतां अंधारांत जुमेलेला अडखळून ती पडली. दोघीहि घाबरून ओरडल्या. इतक्यांत आकाशांत वीज चमकली. दोघी बहिणींनीं एकमेकींनां ओळखलें. जुमेला प्रथम ह्मणाली "कोण रुमेला! तूं इथं कां आलीस?"

रुमेला हंसून उलट ह्मणाली "जुमेला, तूं इथं कां आलीस ?"

"तुजजवळून कशाला लपवून ठेवूं ! दिलखुषला भेटण्याकरितां मी सर्वांनां सोडून इथं आल्यें."

"त्याची तुझी भेट होऊं नये एवढ्याकरितां मी सर्वांनां सोडून इथं आल्यें."

"रुमेला ! काय ह्मणालीस?"

"कांहीं नाहीं !"

"तें काय ?"

"मी तुझा जीव घेणार! ही पहा मीं कट्यार आणिली आहे." असें ह्मणून तिनें आपल्या कंबरपट्यांतून तीक्ष्ण कट्यार बाहेर काढली. कट्यार पाहून जुमेला घाबरून गेली आणि ह्मणाली "रुमेला ! तूं काय वेडी झालीस? तुझं मजवर कितीतरी प्रेम आहे !"

रुमेला पुन्हा हंसून ह्मणाली "मला तूं आवडतेस ह्मणूनच मी तुला मारणार. जुळ्या भावंडांपैकीं एक मेलं असतां दुसरं जगत नाहीं हें तूं कधीं ऐकिलं नाहींस काय? तुला मारून मी तुझ्या अंगावर पडेन आणि तुझ्या गळ्यांत मिठी मारून इथंच मरून जाईन. तूं सुख भोगावंस आणि मीं दुःखांत दिवस काढावे हें कसं होईल ? तुलातरी हें चांगलं दिसतं का ?"

"तर मग, तूं मला खरोखरच मारणार काय? "

"तसं नसतं तर मी इथं कशाला आल्यें असत्यें?"

"असंच असलं तर आतां उशीर करूं नकोस. रुमेला, दिलखुष आल्यावर तुला मला मारतां येणार नाहीं. तुला दुःखांत राहूं देऊन मी सुखांत राहूं इच्छित नाहीं."

उन्मत्त झालेल्या रुमेलेनें जुमेलेच्या हृदयांत एकदम कट्यार भोंसकली ! जुमेलेनें शांतपणानें प्राण सोडला. रुमेलेनें आपल्या बहिणीचें शरीर गवतावर ठेविलें. तिच्या ओंठांचें चुंबन घेतलें आणि तिच्या अंगावर मान टाकून दिली. घरच्या मऊ बिछान्यावर ज्याप्रमाणें त्या सुखानें झोंप घेत असत, त्याचप्रमाणें त्या निर्जन खिंडींत पाषाणाच्या शिलेवर अक्षय्य निद्रासुख घेत पडल्या !

या मुलींच्या स्मरणार्थच औरंगजेब बादशहानें वरील जोड कबर बांधिली.

* * * * *

पुढें पुष्कळ दिवसपर्यंत एक फकीर ह्या कबरीवर रात्रीं फुलें वहात असे. आसपासच्या गांवच्या लोकांनीं हा त्याचा क्रम कित्येक वर्षेपर्यंत अव्याहत चाललेला पाहिला होता. दोन्ही कबरी फुलांनीं झांकून गेलेल्या लोकांनां दिसत; परंतु फकीर कधीं कोणाच्या दृष्टीस पडला नाहीं !

हा फकीर कोण असावा, तें चतुर वाचकांस सांगावयास नको !



## गोष्ट २५ वी.

## रुसवा कीं प्रेम.

विष्णुपंत आणि लक्ष्मीबाई या दाम्पत्याचें परस्पर विलक्षण प्रेम असे; परंतु दोघांचा स्वभाव बराच मानी असल्यामुळें अगदीं क्षुल्लक कारणावरूनहि कित्येक वे गोष्टी विकोपाला जावयाच्या. त्यामुळें त्यांच्यांत आठचार दिवसांत कधीं रुसव रुसवी झाली नाहीं व उभयतांनीं अबोला धरला नाहीं, असें क्वचित्च होई. कित्ये वेळां हा अबोला महिनामहिना दोनदोन महिने तसाच चालू रहावयाचा; परं पुढें तशाच कांहीं क्षुल्लक कारणानें तो दूर होऊन पुन्हा त्यांचें मेतकूट जमावयाचें अशा रुसवारुसवींत व अबोल्यांतच त्या दाम्पत्याला एक प्रकारची मौज वाटे त्या रुसवारुसवीला कधीं विष्णुपंतांकडून प्रारंभ होई तर कधीं लक्ष्मीबाईकडून होई. कधींकधीं निव्वळ थट्टेनें सुरु झालेल्या गोष्टीची अखेर रुसव्यांत व्हावयाची परंतु त्यामुळें त्या नवरावायकोंत कधीं वितुष्ट किंवा गैरसमजूत झाली, अशांतल मुळींच प्रकार नाहीं. उभयतांनांहि हा परस्परांचा स्वभाव कळला असल्यामुळें समजीचा जो दिवस येईल त्या दिवशीं एकमेकांनीं जणुं काय सर्व उखाळय पाखाळ्या काढावयाच्या व "इकडून असं ह्मणायचं झालं, अन् ती गोष्ट अशी केली. मेलं तें माझ्या मनांतच नव्हतं!" अशा रीतीनें एकीकडून बाजू पुरी होऊ "सहज मीं आपलें तें थट्टेनें ह्मटलें, तें न समजतां तूं मला तसें कां बोललीस मीं तें तुला करायला सांगितलें असतांना तूं माझें ऐकलेंच नाहींस, आपलाच पुरा केलास!" अशा रीतीनें दुसरीकडून बाजू संभाळली जाई; आणि ही र समजी अगदीं पूर्ण झाली, ह्मणजे "आतां पुनः असें करायचें नाहीं बरेंका. र होऊन इतके दिवस झाले, तरी या गोष्टींचा तुला अजून कंटाळा नाहीं ये एखाद्या अल्लड पोरीप्रमाणेंच अजून तुला वागायला हवें?" असें बजावून, पुनः कधींहि करावयाचें नाहीं असा दृढ निश्चय व्हावयाचा व तो अधिकतर दोन दिवस टिकावयाचा. परंतु यामुळें त्या प्रेमळ दाम्पत्याच्या प्रेमांत कधीं अंतर पडलें नाहीं. उलट अशा रीतीनें रुसवा झाला व उभयतांत मुक्याचा खेळ सुरू झाल ह्मणजे एकमेकांच्या नडीकडे व गरजेकडे तीं उभयतां जास्तच लक्ष्य पुरवीत व अगदीं क्षुल्लक बाबीपासून एकमेकांनां काय हवें, काय नको तें पहात. परंतु या वेळीं "आधीं कोण बोलतें?" याचा उभयतांमधें जणुंकाय एक चुरसीचा सामनाच होत असे, व त्यांत त्या विलक्षण दाम्पत्याला मोठी मौज वाटत असावी, असें त्यांच्या वर्तनावरूनतरी दिसत असे. हें त्यांचें प्रेम अशाच रीतीनें अखंड रहावयाचें

रेंहि एक कारण होतें. तें हें कीं, एकमेकांचा स्वभाव एकमेकांस पक्का ळला असून एकमेकांची योग्यताहि पण एकमेकांस अवगत होती. त्यांतच यांचाहि स्वभाव अगदींच खुला असल्यामुळें त्यांच्यांत रुसवा व्हावयाला जसा ; लागत नसे तशीच समजी व्हावयाला पण फारसा वेळ लागत नसे, व न्हींचा शेवट होण्याला एखादें क्षुल्लक कारण पुरत असे. असो.

वर सांगितलेल्या विचित्र रुसव्यांपैकींच एक रुसवा हल्लीं या दाम्पत्यांत झाला ता; परंतु त्याची अवधि मात्र नेहमींच्यापेक्षां जास्त जाहली होती. लक्ष्मीबाई ळंतपणाकरितां ह्मणून माहेरीं जावयाला निघाल्या, तेव्हां त्यांनीं "पत्र टाकायचं रं का? अगदीं चारचार दिवसांनीं! नाहींतर मी असेन तश्शी निघून यायला मी करायची नाहीं!" असें ह्मणून अश्रुपूर्णनेत्रांनीं व कंपित स्वरानें विष्णुपंतांला जाविलें होतें. विष्णुपंतांनींहि पण "खास, खास, पाठवीन. पण तुझेंहि मात्र स्सेंच आलें पाहिजे," ह्मणून त्याच रीतीनें लक्ष्मीबाईंनां हुकूम केला होता व ो पाळण्याचें लक्ष्मीबाईंनीं कबूलहि केलें होतें; परंतु अव्याहत रीतीनें हा क्रम ालण्याचें त्यांच्या नशिबीं नव्हतें.

वर सांगितल्याप्रमाणें जरी या दाम्पत्यांत पत्रें पाठविण्याबद्दल परस्पर कररामदार ले होते, तरीपण जावयाच्या दिवशींच्या पूर्व रात्रींच "पहिल्यानें पत्र कुणीं ठवायचें?" याबद्दल मोठा खडाजंगी वाद चालला होता; परंतु पुष्कळ ाति न भवति झाल्यावर शेवटीं एकमतानें असा निर्णय ठरला कीं, ज्याअर्थी मीबाई माहेरीं जाणार, त्याअर्थीं पोंचल्याचें पत्र प्रथम त्यांच्याकडूनच आलें हेजे व तें आलें ह्मणजे विष्णुपंतांनीं पत्र पाठवावयाचें व मग पुढें एकमेकांच्या रीं एकमेकांनीं उत्तरें पाठवावयाचीं.

अ्मीबाई माहेरीं गेल्यानंतर त्यांचेकडून ठरल्याप्रमाणें पत्र प्रथम आलें. ष्पंतांचेंहि उत्तर गेलें व याप्रमाणें हा क्रम दोन महिनेपर्यंत अव्याहत रीतीनें ालला. पुढें योग्य काळीं लक्ष्मीबाई प्रसूत झाल्या व त्यांस कन्यारत्न झालें. म्पत्याच्या परस्पर प्रेमाला दृढतर करणारें हें एक सूक्ष्म बंधनच असतें, त्याप्रमाणें यांनांहिपण वाटून दोघांनीं थट्टेचीं, मोठीं मौजेचीं पत्रें पाठवून कमेकांचा दुस्तर वियोग मृदुतर करण्याची खटपट चालविली होती. असो.

विष्णुपंतांनीं मुद्दाम नोकरीवरून रजा काढून आपलें नूतन प्रथम बालक हाण्याच्या उत्सुकतेनें पत्नीच्या माहेरची वाट धरली. विष्णुपंत आले, त्यावेळीं मीबाईंच्या आनंदाला अगदीं पारावार नाहींसा झाला, व त्यांनीं त्या उत्सवाच्या

निमित्ताकरितां ह्मणून मुलीचें नांव आनंदी असें ठेविलें! दुसरे दिवशीं विष्णुपंतांस पुण्यास रहातां येण्यासारखें नसल्यामुळें ते तेथून निघून गेले. जातांना लक्ष्मीबाईनीं सर्वांदेखत बोलतां येणार नाहीं ह्मणून आपल्या धाकट्या बहिणीकडून एक पत्र विष्णुपंतांच्या खिशांत टाकविलें. त्यांत "पोंचल्याचं उलट टपालीं पत्र टाकायचं, मी अगदीं वाट पहात राहीन," इ० इ० गोष्टी लिहिल्या होत्या. ही गोष्ट विष्णुपंतांस ठाऊक नसल्यामुळें त्यांच्या तें वाचण्यांत आलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर गडबडींत तें कोठें पडलें हेंसुद्धां त्यांनां ठाऊक नव्हतें. आणि या पत्रानेंच पुढील सर्व घोटाळा केला.

[ २ ]

वरील गोष्टीस सातआठ दिवस झाले. लक्ष्मीबाई विष्णुपंतांच्या पत्राची एकसारखी मार्गप्रतीक्षा करित होत्या. परंतु त्यांच्याकडून एक बोटभरहि चिठ्ठी नाहीं. "गेल्याला आज आठ दिवस झाले नि खुशालपणीं पोंचल्याबद्दलहि कळवायचं नाहीं! पुरुषांचा स्वभावच गेला निष्काळजी!" लक्ष्मीबाईंची आपल्या स्वताशींच कुरकुर सुरू झाली. "तशांत, जातांना पत्र पाठवायचं ह्मणून मुद्दाम चिठी पाठवून कळविलं असतांहि पत्र नाहीं, तेव्हां हें मुद्दामच असलं पाहिजे! आपल्या स्नेहीमंडळीच्या संगतींत इकडच्या माणसांची कशाला आठवण होते. आह्मीं पोंचल्याबद्दलचं मात्र प्रथम पत्र हवं. पण आपण पोंचल्याबद्दलचं इतके दिवस झाले तरी पाठवायाचं होतंय् का? या खेपेला तिकडचं पत्र यायची पाळी आहे. मी इकडे आल्यावेळीं माझं जसं पोंचल्यावद्दलचं प्रथम पत्र मागविलं होतं, तसं आतां तिकडूनहि प्रथम पत्र पाठवायला नको का? मी काय ह्मणून अगोदर पाठवीन? नि शिवाय जातांना चिठ्ठींत तीनतीनदा बजावलं होतं. मी मुळींच हा अपमान सहन करणार नाहीं! नाहीं आलं तिकडून पत्र, तर मीहि मुळींच पाठवायची नाहीं!"

इकडे विष्णुपंतांचीहि पण तीच स्थिति झाली होती. ते परत येऊन आपल्या कामावर रुजु होतात तोंच त्यांस कांहीं जरूरीच्या सरकारी कामाकरितां बाहेर जावें लागलें. अर्थात् त्या गडबडींत पत्नीला पोंचल्याचें पत्र टाकावयाचें ते विसरले. परत कामावरून घरीं यावयाला त्यांनां चांगले पंधरा दिवस लागले. या मुदतींत आपल्या पत्नीकडून निदान चारपांचतरी पत्रें आलीं असतील, असें त्यांनां वाटलें होतें. त्याप्रमाणें घरीं येतांच उत्सुकतेनें ते चवकशी करितात तों काय! एकहि पत्र नाहीं! मानी विष्णुपंतांच्या मनाची स्थिति यावेळीं काय झाली असेल त्याची कल्पनाच केली पाहिजे. ते रागाच्या भरांत आपल्याशीं ह्मणाले "आतां कशाला

तिला आमची आठवण व्हायला! मुलगी झाली आहे, तिच्याच आनंदांत दंग असेल. बायकांनां मूल झालें नाहीं तोंपर्यंतच नवऱ्यावर त्यांचें प्रेम असतें ह्मणतात तें कांहीं खोटं नव्हे. मूल झालें कीं निम्मेतरी प्रेम मुलाकडे गेलेंच. आणि तशांत मुलीवरतर बायकांचें प्रेम विशेषच असावयाचें. तेव्हां आतां ती कशाला आमची काळजी करील! आह्मांला पुण्याहून आल्याला आज पंधरा दिवस झाले पण तेवढ्यांत एकतरी पत्र! आमच्याकडून पत्र कां आलें नाहीं, प्रकृती कशी आहे, आह्मी इकडे जीवंत आहों कीं मेलों, याबद्दल जरातरी आहे का कांहीं काळजी! उगीच आपण धडपड करावी आणि पत्रें पाठवावीं. इतक्या दिवसांत आमच्याकडून पत्र गेलें नाहीं त्याबद्दल चवकशीसुद्धां नाहीं! हिचा हा निष्काळजीपणा मला आज कित्ती दिवसांपासून ठाऊक आहे, पण मी ह्मणतों, कशाला थोडक्याकरितां उगीच रागवा. क्षुल्लक बाब आहे, द्या सोडून. पण आमच्या त्या भलाईचा हा असा परिणाम! ठीक आहे. मी आतां पक्का निश्चय केला आहे कीं, इतःपर ह्मणून तिचें पत्र आल्याशिवाय पत्रच पाठवावयाचें नाहीं. आपणच कां नेहमीं नेहमीं मूग गिळा?"

विष्णुपंतांनीं याप्रमाणें स्वताशीं ठरवून पत्नीला पत्रें लिहिण्याचें साफ बंद ठेविलें. परंतु त्या मूकवृत्तीमुळें त्यांच्या अंतःकरणाची काय स्थिति होत होती, ती त्यांची त्यांनांच ठाऊक! त्यांनीं आज पत्र येईल, उद्यां येईल, ह्मणून टपालाच्या शिपायाची सारखी वाट पहावी; परंतु त्यानें दुसऱ्या कोणाकडून आलेलें एखादेंदुसरेंच पत्र दिलें किंवा एखादेवेळीं कांहींच न देतां तो आपल्या दारावरून गेला ह्मणजे निराश होऊन बसावें. त्यांनीं टपालवाल्याला पुन्हापुन्हा "माझें पत्र नाहीं का?" ह्मणून मुद्दाम हांक मारून वरचेवर विचारावें. विष्णुपंतांच्या ह्या त्रासानें बिचारा तो टपालवालाहि कंटाळून गेला होता. त्यानें एक दिवस खडसून जबाब दिला "रावसाहेब! आपल्याला कोणीं पत्रच जर पाठविलें नाहीं, तर मी स्वताच लिहून आणून का देऊं? आपण चांगले शिकलेसवरलेले लोक अन् वेड्यासारखा मला वरचेवर कां त्रास देतां! मी तुमचीं पत्रें फाडून टाकतों कीं काय?" टपालवाल्याच्या या सणसणीत उत्तरानें विष्णुपंत बिचारे खजील झाले. परंतु या शिपुरड्याचें असें उद्दामपणाचें उत्तर ऐकून घ्यावें लागून आपला अपमान होण्यास कारणीभूत झालेल्या आपल्या पत्नीचा त्यांनां फारच राग आला.

मध्यंतरीं त्यांनां लक्ष्मीबाईंची प्रकृति जरा बिघडली आहे असें त्यांच्या एका स्नेह्याकडून कळलें, तेव्हां त्यांनीं आपल्या कुटुंबाची प्रकृति कशी आहे

हें निदान एकदोन दिवसांनींतरी कळविण्याबद्दल आपल्या त्या स्नेह्याला लिहिलें होतें. इतकेंच नव्हे, तर एक दिवस त्याच्याकडून पत्र यावयाला उशीर झाला; तेव्हां विष्णुपंतांस इकडे कांहींच्याबाहींच होऊन त्यांनीं त्याला तारहिपण केली होती. विष्णुपंतांचें व लक्ष्मीबाईचें हें विलक्षण प्रेम ह्या स्नेह्याला पूर्णपणें ठाऊक असल्यामुळें व लक्ष्मीबाईची प्रकृतिहि चांगली असल्याचें त्यानें प्रत्यक्ष पाहिल्यामुळें मुद्दामच त्यानें मौनव्रत स्वीकारलें होतें. विष्णुपंतांकडून आलेली ती अर्जंट तार घेऊन तो स्नेही लक्ष्मीबाईकडे गेला व त्यांस ती दाखवून विनोदानें ह्मणाला "वहिनी, तुह्मी हा काय बुवा नसता त्रास आमच्यामागें लावून दिला आहे! आपण पत्र पाठवायचें नाहीं तें नाहीं नि उगीच आजारी असल्याची कंडी पिकवितां व त्याचा त्रास आह्मांला निस्तरावा लागतो. तुह्मी त्यांनां पत्र पाठवूं नका पाहिजेतर; पण आमच्या मागचा हा त्रास चुकवा. आपण इतःपर ही गोष्ट करणार नाहीं, असें साफ विष्णुपंतांनां कळवितों. खर्चापरी खर्च आणि त्रासापरी त्रास! हा कोणीं रोजरोज सोसावा? महिन्यांत निदान कार्डांपाकिटांला दोन रुपयेतरी खर्च येतो. आणि अशी तार आली ह्मणजे भरावा लागणारा भूर्दंड वर!" अशा प्रकारचें लांबलचक लेक्चर त्यांनीं लक्ष्मीबाईजवळ दिलें. त्यावर लक्ष्मीबाई बिचाऱ्या काय बोलणार? आपल्या संसारांतील हें छिद्र त्यांनां पूर्णपणें ठाऊक होतेंच. नारायणरावांच्या बोलण्याचा रोंख ओळखून त्याहि पण जरा रागाचा उसना आवेश आणून ह्मणाल्या "खरंच मेलं! आपल्याकरितां लोकांनां कशाला उगाच त्रास! इतकी काळजी होती तर एक बोटभर चिठ्ठी खरडायची होती! पण तें कशाला करायला हवं! वरवर प्रेम दाखवायचे हे प्रकार बरं. काय होईल तो खर्च मी आपल्याला देईन बरंका भावजी, आपल्याला फार त्रास होत असला तर कळवावं तिकडे आपण तसं." याप्रमाणें लक्ष्मीबाईनीं भावोजींची समजूत करण्याचा प्रयत्न केला खरा, परंतु लक्ष्मीबाईचें अंतःकरण या अकारण मूकवृत्तीबद्दल किती हळहळत होतें, हें त्यांचेशिवाय कोणाला कळणार? या एका महिन्याभराच्या अवधींत गोष्टी इतक्या थराला आल्या होत्या कीं, दोघांकडूनहि एक फट् ह्मणून आवाज झाला असता तरी एकमेकांनीं एकदम "काय आहे?" ह्मणून विचारलें असतें; परंतु हा प्रारंभ कोणीं करावा, हाच मोठा महत्त्वाचा प्रश्न होता!

[ ३ ]

आनंदाचे असोत, विरहाचे असोत अथवा दुःखाचे असोत, दिवस कांहीं थांबत नसतात. आनंदाच्या दिवसांत आपला वेळ कसा गेला तें आपल्याला कळत

नाहीं. घटका पळाप्रमाणें, प्रहर घटकेप्रमाणें व महिना दिवसाप्रमाणें अल्प भासतो. परंतु विरहाचे वेळीं, अगर दुःखाचे प्रसंगीं हाच वेळ संपतां संपत नसतो. घटका महिन्यासारखी व दिवस वर्षासारखा दीर्घ होतो व उदासी मनाला फारच यातना देतो. आमच्या विष्णुपंतांच्या आणि लक्ष्मीबाईच्या मनाची स्थिति काय वर्णावी ! वरील गोष्टीला आतां पांचसहा महिने झाले होते खरे, परंतु हे दिवस त्यांनां पांच युगांपेक्षांहि मोठे झाले होते. रात्रंदिवस तीं उभयतां परस्परांच्या चिंतनांत आणि काळजींत मग्न झालेलीं असत. परंतु मानी स्वभावामुळें ही घटका पावेतों कोणींहि कोणाला बोटभर चिठ्ठी पाठविली नाहीं. आतांतर सहावा संपून सातवा महिना लागला होता. लक्ष्मीबाईची बाळंतपणाची व माहेरीं रहाण्याची सर्व मुदत भरून गेली होती. किंबहुना ठरल्या मुदतीपेक्षां महिना दीड महिना जास्तच होऊन गेला होता. नवऱ्याकडून आज बोलावणें येईल, उद्यां पत्र येईल, या भरंवशावर लक्ष्मीबाईनीं इतके दिवस जीव मुठींत धरून काढले. परंतु आतां त्यांच्यानें मुळींच धीर निघेना. "पत्र नाहीं आलं तरी पत्करलं, पण एकदा आपल्या प्रेमाच्या माणसाजवळ जावयाचं," असा त्यांचा आतां पक्का निश्चय झाला होता. फारतर महिनापंधरा दिवसपर्यंत जो रुसवा रहावयाचा, तो आज चांगले नऊदहा महिने झाले तरी मोडत नाहीं असें पाहून त्यांच्या मानीपणाचा पर्वत प्रेमाच्या ओझ्याखालीं केव्हांच विरघळून गेला होता. विष्णुपंतांकडे जावयाला त्या एका पायावर तयार होत्या; परंतु त्यांचें तसें पत्र आल्याखेरीज "मला पाठवून द्या" असें त्यांनां आपल्या माहेरच्या मंडळीस ह्मणतां येईना, व माहेरच्या मंडळीसहि "इला आतां घेऊन जा," असें जामातांनां आपण होऊन लिहिणें प्रशस्त वाटेना. या अडचणींतून हल्लींच्या प्रसंगीं आपली कशीतरी सुटका केली पाहिजे, असें जाणून लक्ष्मीबाईनीं आपल्या एका मैत्रिणीला पत्र पाठविलें व त्यांत आपली सर्व हकीगत मोठ्या केंविलवाणेपणानें कळवून "कसंतरी तिकडून पत्र लिहिविण्याची तजवीज करावी. नाहींतर निदान तुमच्या तिकडून इकडच्या नांवचं पत्र लिहवावं," असें अगदीं विनवून लिहलें होतें.

लक्ष्मीबाईची ही हकीगत वाचून राधाबाईनां प्रथमतः पोटभर हंसूं आलें. परंतु त्यांनां या दांपत्याचा हट्टी स्वभाव पूर्णपणें ठाऊक असल्यामुळें, व ही गोष्ट अशीच राहिल्यास कदाचित् विकोपाला जाईल अशीहि भीति वाटल्यामुळें, त्यांनीं तें पत्र आपल्या नवऱ्यास दाखवून "याला कांहींतरी युक्ति करायची," असें आग्रहानें सांगितलें. माधवरावांनीं ती गोष्ट कबूल केली व त्याप्रमाणें विष्णुपंतांस

बराच आग्रह केला. परंतु "ही गोष्ट आपण बापजन्मींसुद्धां करणार नाहीं. तिला असेल गरज नवऱ्याची तर येईल इकडे. तुम्ही उगीच कशाला मधें त्रास घेतां!" असा विष्णुपंतांनीं रोखठोक जबाब दिला; परंतु तसें उत्तर देतांना त्यांचें अंत:करण किती सद्गदित झालें होतें, हें त्यांचें त्यांनांच ठाऊक. माधवरावांनीं विष्णुपंतांच्या मनाची ही स्थिति तेव्हांच ताडली. परंतु मुद्दामच ते त्या वेळीं आणखी कांहीं न बोलतां तो विषय तेवढ्यावरच सोडून देऊन दुसऱ्या कांहीं गोष्टी बोलून निघून गेले.

घरीं आल्यावर या विलक्षण प्रकारांतील खरी स्थिति काय आहे हें माधवरावांनीं राधाबाईंना समजावून सांगितलें. विष्णुपंत आपले हट्टानें कांहींतरी म्हणत आहेत; परंतु त्यांनां हा विरह दु:सह झाला असून त्यांची परस्परांची भेट होतां क्षणींच हें मौनव्रत आपोआपच सुटेल व पुन: पूर्ववत् समजी होईल, अशी त्यांनीं खात्री दिली. परंतु हल्लीं या दोघांनांहि एकत्र करणें अत्यंत हितकर असून असें न केल्यास कदाचित् प्रेमास विघातक होईल, असें राधाबाईप्रमाणेंच त्यांचेंहि मत झालें, व त्याकरितां त्यांनीं पुढील युक्ति योजिली.

विष्णुपंतांनीं पत्र पाठवावयाचें जेव्हां साफ नाकारलें, तेव्हां माधवरावांनीं स्वत: आपल्या नांवानें लक्ष्मीबाईच्या वडिलांस एक पत्र पाठविलें. त्यांत "विष्णुपंत हे कांहीं सरकारी कामाकरितां गांवीं गेले असून सौ. वहिनींनां पाठवून देण्याबद्दल त्यांनीं आपणांस लिहिण्यास सांगितलें आहे. तरी सौ० वहिनींस परवां दुपारच्या गाडीनें पाठवून द्यावें, म्हणजे आम्ही स्टेशनावर येऊं," असें लिहिलें होतें.

लक्ष्मीबाईनीं ज्या दिवशीं राधाबाईस पत्र लिहिलें होतें त्याचेनंतर दोनतीन दिवसांनींच जेव्हां हें पत्र आलें, तेव्हां आपलें काम झालें, असें वाटून त्यांनां आनंदतर झालाच; परंतु त्यांत आपल्या नवऱ्याचा आपल्यास पाठवून देण्याविषयींचा निरोप वाचल्याबरोबर त्यांनीं आपल्या मनास जो एक आजवर निग्रहाचा बांध घातला होता व जो इतक्या दिवसांच्या मौनव्रतामुळें बहुतेक दुभंग होण्याची वेळ आली होती, तो तावडतोब दुभंग झाला व आतां विष्णुपंतांकडूनच आरंभ झाला आहे, तेव्हां प्रसंग पाहून सर्व जुळतें घेतलें पाहिजे, विशेष ओढून धरतां कामा नये, असा मनाचा निश्चय करून ठरल्या दिवशीं ठरल्या गाडीनें जाण्याची सर्व तयारी केली, व त्याला घरच्या मंडळीचीहि पूर्ण अनुमती मिळून लक्ष्मीबाईंची सोबतीनें पुण्याला रवानगी झाली.

[ ४ ]

इकडे ठरल्या दिवशीं संध्याकाळीं विष्णुपंतांना बरोबर घेऊन माधवराव बंडगार्डन-कडे फिरावयास गेले होते. पांच साडेपांचांच्या सुमारें ते उभयतां माघारे फिरले. स्टेशनावरून येतांना माधवराव सहज ह्मणाले "विष्णुपंत, चला जरा स्टेशनावर जाऊं. या वेळीं स्टेशनाच्या प्लॅटफार्मवर फिरण्याची मोठी मौज असते." विष्णु-पंतांस खऱ्या प्रकाराची वार्ताहि नसल्यामुळें त्यांनीं ती गोष्ट कबूल केली व बोलत बोलत मौज पहाण्याच्या निमित्तानें ह्मणून दोन प्लॅटफार्मतिकिटें काढून गाडी येण्याच्या ऐन वेळीं उभयतांहि आंत गेले व गप्पा मारित इकडूनतिकडे सहल करूं लागले. इतक्यांत गाडी येण्याची घांट वाजली आणि पांचएक मिनिटांत प्लॅटफार्मवर गाडी सोसावत येऊन थांबलीहि.

कर्मधर्मसंयोग! गाडीची मौज पहावयाला ह्मणून विष्णुपंत आणि माधवराव ज्या ठिकाणीं उभे राहिले होते, त्याच ठिकाणीं लक्ष्मीबाईची स्वारी आपल्या नूतन बालकाला कपड्यांत गुंडाळून खालीं उतरली व तिर्यक्, सलज्ज व किंचित् सुहास्य दृष्टीनें आपल्या पतीकडे त्यांनीं एकवार पाहिलेंसें केलें व लागलीच माधव-रावांस गाडींतील सामान उतरावयाचें आहे ह्मणून हातानें खुणावलें. माधव-रावांनीं लगेच एका पोर्टरास बोलावून त्यास सामान उतरावयास सांगितलें व लक्ष्मीबाईच्या हातांतील मुलीला आपल्याजवळ घेऊन तिचें चुंबन घेतल्यावर तिला विष्णुपंतांकडे करून ह्मणाले "विष्णुपंत, संभाळा आपलें हें रत्न! मी गाडी ठरवून येतों." असें ह्मणून घाईघाईनें त्या बालकाला त्यांच्या हातांत देऊन ते चालते झालेसुद्धां! थोडक्यांत चुकलें. विष्णुपंतांनीं आवरलें नसतें, तर ती पोर त्या फरशीवरच पडावयाची. परंतु त्या पोरीचें नशीब ह्मणा, अगर विष्णुपंतांची शिताफी ह्मणा, कीं कांहीं ह्मणा, तसें कांहीं झालें नाहीं. विष्णुपंतांनीं कसेंबसें त्या पोरीला आपल्या खांद्यावर टाकलें व ते वेड्यासारखे पहात उभे राहिले! "आपण आपल्या बायकोला बोलावलें नसून ही आली कशी? बरें यावयाचें होतें तर अगोदर कळविलें कां नाहीं? माधवराव आपणांस नेहमीं फिरावयास बोलावून नेतात, परंतु स्टेशनावर चल ह्मणून क्वचित्च ह्मणतात; परंतु आज त्यांनीं इथें आपल्याला आणावयाला व आपली पत्नी यावयाला एकच गांठ पडली तेव्हां यांत कांहींतरी पूर्वी ठरलेला बेत तर नसावा?" अशा कितीतरी शंका यावेळीं त्यांच्या मनांत आल्या. "आपल्या स्त्रीच्या मुखावरहि कांहीं आश्चर्य दिसत नाहीं; तिला जणूं काय आपण स्टेशनावर येणारच असें वाटलें असावेंसें दिसतें; तेव्हां

हें गौडबंगाल आहे काय!" याविषयीं ते विचार करूं लागले व एकीकडे त्या पोरीकडे पाहूं लागले, तों ती पोर आपण कांहीं परक्या माणसाजवळ नाहीं, आपली आणि त्याची पुष्कळ दिवसांची ओळख आहे अशा हेतूनेंच जणूं अकारण सुहास्य करूं लागली. तें पाहून व आपल्या मुलीच्या चेहऱ्याची व पत्नीच्या चेहऱ्याची साम्यता पाहून त्यांचे मनांत पूर्वींपेक्षां दुसरेच विचार येऊं लागले. इतक्यांत माधवरावांनीं येऊन गाडी ठरविल्याचें सांगितलें व सर्व मंडळी निमूटपणें स्टेशनाबाहेर पडली व गाडींत जाऊन बसली. गाडी थोडीशी पुढें गेली नाहीं तोंच माधवरावांनीं विष्णुपंतांला एकापरीनें हवा असलेला व एकापरीनें नको असलेला असाच विषय काढला. विष्णुपंत आपल्या मुलीला घेऊन स्वस्थ बसले होते. त्यांस हालवून माधवराव ह्मणाले "वाः विष्णुपंत! आपण मोठे वस्ताद दिसतां बुवा! आह्मी विचारूनविचारून दमलों, पण आह्मांला कांहीं दाद दिलीत नाहीं. आज इतके दिवस वहिनींला घेऊन या, घेऊन या ह्मणून आह्मी मागें लागलों आहोंत तर आह्मांला 'बस्स, आह्मांला नाहीं इतक्यांत आणायची; आणूं मर्जी लागेल तेव्हां!' ह्मणून ऐटीनें ह्मणत होतां; परंतु तेच आतां मुकाट्यानें आह्मांला नकळतां परभारें पत्र लिहून आणावयाची तयारी केलीत! आह्मी कांहीं तुमच्या पहिल्या भेटीच्या सुखांत आड आलों नसतों, समजलां! मग एवढा हा खटाटोप करायचें काय कारण होतें. मला आज तुमच्याबरोबर फिरायला येण्याची बुद्धि झाली, हें बरें झालें. आज आपली चांगली फट्फजिती झाली! चांभाराच्या देवाला खेटराचीच पूजा पाहिजे!" असें ह्मणून ते त्यांनां नाना तऱ्हेनें हिणवूं लागले. बिचारे विष्णुपंत पक्के गोंधळून गेले. लक्ष्मीबाईचीहि तीच स्थिति झाली. पत्र खुद्द माधवरावांच्या हातचें असून त्यांत विष्णुपंतांनीं पाठवून द्या ह्मणून सांगितलें आहे असा स्पष्ट मजकूर असून आतां हें असें बोलताहेत, तेव्हां ही थट्टा कीं खरें, हें त्यांनां कांहींच कळेना. इकडे माधवरावांनीं आपला थट्टेचा ओघ अप्रतिबद्धरीतीनें सारखा चालविलाच होता. विष्णुपंतांच्या मांडीवरच्या त्या अर्भकाला उचलून ते ह्मणाले "कां पंत, आजपर्यंत आपण बऱ्याच गप्पा मारल्यात. पण खरें सांगा पाहूं, आह्मांला नकळत आपल्या नाशिकाला किती खेपा झाल्या त्या! एवढें सहा महिन्यांचें मूल, आईखेरीज अनोळखी माणसाच्या मांडीवर कसें राहील! हें पहा मीं घेतल्याबरोबर रडूं लागलें, आणि तुमच्याजवळ स्वस्थ पडतें. हें कसें काय बुवा." अशी एक ना दोन त्यांनीं नानापरीनें त्यांची थट्टा चालविली होती. बिचाऱ्या विष्णुपंतांला आज आपण कुठून यांच्याबरोबर

यायला कबूल झालों, असें झालें व त्यांनीं अगदीं हिरमुसलें तोंड केलें. त्यांचा तो दिवस माधवरावांच्या घरींच गेला. तेथें दोघांहि नवराबायकोंनीं त्या दोघांचीहि यथास्थित थट्टा केली; परंतु त्यांच्या हल्लीं चालू असलेल्या रुसव्याला अनुलक्षून तीं कांहींच बोललीं नाहींत. त्यांनां इतकें पक्कें कळून चुकलें कीं 'जल तुंबतां तडागीं फोडावा लागतो जसा पाट' याप्रमाणें दोघांच्याहि मनाची स्थिति झाली असून तो लवकरच फुटल्याखेरीज रहाणारच नाहीं !

दुसरे दिवशीं लक्ष्मीबाई आपल्या घरीं गेल्या. त्यांची व्यवस्था नीट लावून देण्याकरितां राधाबाईहि बरोबर गेल्या होत्या. त्या दुपारीं तेथील काम आटोपून आपल्या घरीं आल्या व येण्याच्या अगोदर त्यांनीं लक्ष्मीबाईला त्यांच्या अकारण रुसव्याबद्दल नानातऱ्हेनें उपदेश केला व क्षुल्लक कारणाकरितां असा हट्ट धरून बसणें आपणाला शोभत नाहीं व चांगलें नाहीं असें नानाप्रकारें बजावून सांगितलें. लक्ष्मीबाईंनां हल्लीं या गोष्टीचा चांगलाच अनुभव आला असल्यामुळें त्यांनीं आपण त्यांच्या वचनाप्रमाणें वागूं असें राधाबाईशीं कबूल करून त्यांची रवानगी केली.

याप्रमाणें लक्ष्मीबाईच्या व विष्णुपंतांच्या ओंठावर शब्द येऊन बसले होते, तरीपण त्यांनां प्रथम उच्चार कोणीं द्यावा, याबद्दल त्यांच्यांत कांहीं वेळ झगडा चाललासा दिसला. दोघेंहि एकमेकांकडे पहात, एखादे वेळ चुकून हंसत, मध्येंच त्या बाळकाला घेऊन त्याचें चुंबन घेत; परंतु प्रथम कोणीं बोलावें, हा मोठा प्रश्न अद्यापि उलगडला नव्हता. आजपर्यंतच्या रीतीप्रमाणें ह्मटलें ह्मणजे विष्णुपंतांनीं आरंभ करावयाचा. परंतु ते हल्लीं खरेखुरे रागावले होते. तेव्हां त्यांनीं, कांहीं झालें तरी प्रथम बोलावयाचें नाहीं, असा निश्चयच केला होता. बरें, इकडे लक्ष्मीबाईहि अर्धवट या गोष्टीची किंवा दुसऱ्या एखाद्या चांगल्याशा संधीची वाट पहात होत्या. प्रथम बोलण्याची या खेपेला त्यांची तयारी झाली होती. पण संधि आल्याशिवाय कसें बोलावयाचें, ह्मणून त्या आपल्या मनाशीं विचार करित होत्या, व लवकर संधि न मिळाल्यास ती कशी जुळवून आणावी, याबद्दल त्यांचा विचार चालला होता. 'सुंब जळला तरी पीळ जात नाहीं' ह्मणतात तें यालाच ! दोघांच्याहि मनांतील आग्रहाचा सुंब केव्हांच जळून गेला होता. त्याचा पीळ दिसावयाला मात्र राहिला होता. एखादी वाऱ्याची झुळूक लागली ह्मणजे सुंबाची पीळ असलेली राख जशी उडून जाते तसाच त्यांच्या मनांतल्या जळलेल्या आग्रहाचा राहिलेला पीळ लवकरच एका वायुलहरीनें नष्ट झाला. ती वायुलहर पुढीलप्रमाणें उत्पन्न झाली.

लक्ष्मीबाईंचीं पत्रें विष्णुपंतांस येईनाशीं झाल्या वेळेपासून विष्णुपंतांनीं कांहीं दिवसपर्यंत कसेबसे तरी दिवस काढले; परंतु आपल्या पत्नीकडून पत्रें येण्याची आतां कांहीं आशा राहिली नाहीं अशी जेव्हां त्यांच्या मनाची पक्की खात्री झाली, तेव्हां त्यांनीं पत्नीच्या प्रणयपत्रिका वाचण्यास अधीर झालेल्या मनास रिझविण्या-साठीं पुढील अपूर्व युक्तीचा अवलंब केला. सुखदुःख कांहींहि विकार असो, त्याचा अतिरेक झाला, ह्मणजे तो सहन करणें अशक्य होतें; व तसें झालें ह्मणजे त्यांत कोणीतरी विभागी करावा लागतो. आणि तसें केलें ह्मणजेच दुःख असल्यास तें सह्यवेदन होतें व आनंद असला तर तो दुणावतो. विष्णुपंतां-सारखा विशेष कोमळ मनाचा मनुष्य असला ह्मणजे त्यालातर त्या स्थितीपासून अत्यंतच त्रास होतो; आणि ह्मणूनच तो त्रास कांहीं अंशानेंतरी कमी करण्याच्या हेतूनें विष्णुपंतांनीं वरील अपूर्व युक्ति अमलांत आणिली होती. आपल्या पत्नीकडून वरचेवर पत्रें यावीं, आपण त्याचीं प्रेमानें उत्तरें पाठवावीं, ही त्यांच्या मनाची फार इच्छा. परंतु दुर्दैवानें ती सफल होण्यास विघ्न उपस्थित झालेलें पाहून त्यांनीं आपल्या पत्नीनें आपल्याला पत्र लिहिलें असतें तर आपण तिला काय लिहिलें असतें; नंतर तिनें त्यावर अमुक अमुक उत्तर पाठविलें असतें तर आपण त्याचा कसा जबाब लिहिला असता; इत्यादि आपल्या मनाशींच कल्पना करून त्या कल्पनेवरच त्यांनीं आपल्या पत्नीस पत्रें लिहावीं व त्यांचीं उत्तरेंहि पण आपणच लिहावीं, असा विचित्र प्रकार आरंभिला होता! अशीं पत्रें त्यांनीं या चारपांच महिन्यांच्या अवधींत निदान तीसचाळीसतरी लिहिलीं असतील! विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यांनीं पत्नीकडून येणारीं पत्रें फार मेहनत घेऊन, जणूं काय तीं पत्रें एखाद्या स्त्रीनेंच लिहिलीं आहेत अशा अक्षरानें—अर्थात् स्त्रीच्या हस्ताक्षरांत—लिहिलीं होतीं. आपला पत्ताहि आपणच लिहावा व तें पत्र पाकीटांत बंद करून त्यावर तिकीट लावून पोस्टांत टाकावें व नंतर पोस्टवाल्यानें तें आणून देतांच तासचेतास आवडीनें वाचित बसावें! अशी कांहीं अजब युक्ति त्यांनीं काढली होती. त्रस्त झालेल्या त्यांच्या मनाला या कृत्रिम प्रणयपत्रिकांनीं बऱ्याच अंशानें करमणूक होऊन समाधानहि होत असे. त्यांनीं हीं पत्रें लिहिण्याच्या नादांत रात्रीच्या रात्री जागून काढाव्या व त्याप्रमाणेंच तीं वाचण्यांतहि परमा-नंद मानावा. या पत्रांत त्यांनीं आपल्या तकरारी, आपलें प्रेम, आपल्या पहिल्या स्त्रीचें वर्तन, तिचा हट्टी स्वभाव, तिच्याशीं केलेला विनोद—कधीं खरा, कधीं काल्पनिक—अशा एकना दोन, हजारों गोष्टी गोंविल्या होत्या.

आज लक्ष्मीबाई आल्याला तिसरा दिवस होता. परंतु वर सांगितल्याप्रमाणें या दंपत्यांत एक शब्दहि उच्चारला गेला नव्हता. दोघांच्याहि चेहऱ्यावर मुद्दाम ओढून आणलेला गंभीरपणा दिसत असून त्यांत उदासपणाची झांक दिसत होती. दोघेंहि बोलण्यास अत्यंत उत्सुक असून आरंभ व्हावयाचाच काय तो अवकाश आहे, असें त्यांच्या चर्येवरून कोणालाहि कळलें असतें.

विष्णुपंत जेवण आटोपून कचेरींत गेले होते. लक्ष्मीबाईंनीं घरचें सर्व काम आटोपून दुपारीं कांहींतरी वाचावें म्हणून त्या आपल्या नवऱ्याच्या टेबलाजवळ गेल्या व खुर्चीवर बसल्या. या अकारण मौनवृत्तीबद्दलचे विचार यावेळीं त्यांच्या डोक्यांत सारखे घोळत होते. त्या तंद्रींतच त्यांनीं विष्णुपंतांच्या खिशांतील चाव्या काढून टेबलावर विष्णुपंतांची पत्र लिहिण्याची पेटी होती ती उघडून लीलेनें त्या सहज पाहूं लागल्या. पेटी उघडली मात्र तोंच एखाद्या सर्पिणीला पाहून मनुष्य जसें एकदम दचकतें, व त्याची विलक्षण वृत्ति होते, तद्वत् लक्ष्मीबाईंची यावेळीं अवस्था झाली. आंत पहातात तों स्त्रीच्या हस्ताक्षरानें स्वच्छ, सुवाच्य लिहिलेलीं कांहीं पत्रें त्यांच्या दृष्टीस पडलीं. पाकिटांवर विष्णुपंतांचाच पत्ता ! लक्ष्मीबाईच्या अंगाची आग होऊन त्या कांपूं लागल्या. कांपतकांपतच त्यांनीं एक पत्र वर उचललें व धडधडणाऱ्या छातीनें त्या तें वाचूं लागल्या तों तों प्रत्येक अक्षरागणीक त्यांचा चेहरा आरक्त होत चालला. त्या कागदांत पुढील प्रमाणें मजकूर होता:—

"प्रिये रमे, मागील पत्रीं तूं मला 'चित्तचोर' म्हणून म्हटलेंस खरें, पण मी तुला विचारतों कीं, तुझें चित्त चोरून मीं ठेवूं तरी कुठें ! चित्त ही कांहीं इतर वस्तुसारखी वस्तु नाहीं, कीं, जी वाटेल तिथें आणि वाटेल तशी ठेवतां येईल! त्याला तशीच, त्याच्यासारखी वस्तु लागते ठेवायला. तीच जर माझे जवळ नाहीं, तर मीं तुझें चित्त चोरून कुठें ठेवूं ? माझें चित्त जर ठिकाणावर असतें आणि तूं मग म्हणतीस कीं, तुम्हीं माझें चित्त चोरून ठेवलेंस, तर मला तें पत्करलें असतें; परंतु हल्लीं माझ्या चित्ताच्या अभावीं तुला असें म्हणण्यास मुळींच आधार नाहीं ! तेव्हां माझी तुला अशी आशा आहे कीं—ही एकशीलना पण !—माझें चित्त मला आणून दे, म्हणजे मी तुझें चित्त आपल्या नीट स्वाधीन ठेवीन आणि मग तुझ्या दोपारोपास मोठ्या आनंदानें पात्र होईन. बरें, हल्लीं तुझ्याकरितां हा गुन्हा कबूल केला, तर त्याबद्दल मला काय शिक्षा करणार ती सांग पाहूं. ती शिक्षा सांगण्यावर हें पत्र मी इथेंच आटोपतें घेतों. तुझा—चित्तचोर **रमाकांत.**"

हीं व अशाच धर्तीवर परस्परांनीं परस्परांस लिहिलेलीं पत्रें वाचून लक्ष्मीबाईच्या तळपायांची आग मस्तकास गेली. आजपर्यंतच्या मौनाचें कोडें एकदम लख्खकन् उकललें. "एकूण, माझ्या पाठीमागं असले चाळे सुचले! नशीव ह्मणायचं. आज याचा उलगडा करून घेईन तर मी नांवाची लक्ष्मी," असें ह्मणून रागारागानें पुटपुटत तणतणत त्या तेथून उठून पलंगावर निजून राहिल्या.

खरा प्रकार काय होता हें लक्ष्मीबाईच्या मुळींच ध्यानांत आलें नाहीं. त्यांनीं आपल्या मनाचा असाच ग्रह करून घेतला कीं "आपल्याला कुणीतरी मेली सवत झाली!" कोणा भविष्यवाद्यानें त्यांनां ही गोष्ट सांगितली होती, ती शेवटीं खरीच झाली, असें त्यांनीं ठरविलें. सवतीची गोष्ट ह्मणजे कोणत्या स्त्रीला आवडली आहे, कीं ती लक्ष्मीबाईनां आवडणार? तशांत त्यांचा स्वभाव पडला विशेष मानी. परंतु या पत्रांनीं त्यांचा तो मानीपणा सर्व लयाला गेला. त्यांनीं शोक करण्यांतच एकदोन तास घालविले, व भेट होतांच एकदाचा या गोष्टीची सोक्ष कीं मोक्ष करून घ्यावयाचाच, असा त्यांचा निश्चय झाला. तशांत, काल रात्रीं विष्णुपंत बाहेर जाऊन त्यांनां परत यावयाला बरीच रात्र झाली होती, व पूर्वीं विष्णुपंतांनां अशींच एका स्त्रीकडून पत्रें आलीं होतीं व तीं त्यांनीं आपल्याला दाखविलींहि होतीं, या गोष्टीचें त्यांनां आतां स्मरण झालें. "आपण नाहीं असं पाहून त्या कवटाळणीनं पुन्हा भुरळ घातली असेल, व आपल्या मौनानं तिकडचं मन आपल्यावरचं उडालं असावं, नी असं होण्याला आपणच कारण आहोंत," असा त्यांच्या मनाचा पक्का ग्रह झाला.

[ ५ ]

झालें. एकदाची ती भयंकर संध्याकाळ आली. विष्णुपंत घरीं आले. जेवणें वगैरे सर्व निर्विघ्नपणें आटोपलीं. विष्णुपंत खोलींत येऊन पहातात तों लक्ष्मीबाईचे डोळे रडूनरडून लाल झालेले आहेत. त्यांनां त्याबद्दल फार वाईट वाटलें. आपण आपल्या स्त्रीला विनाकारण दुःख दिलें, एवढें कठोरपण आपण दाखवावयाचें नव्हतें, आतां कांहीं झालें तरी आपणच प्रथम बोलावयाचें इत्यादि त्यांनीं संकल्प केला; परंतु त्याचें कारणच पडलें नाहीं. कारण लक्ष्मीबाईनींच प्रथम प्रारंभ केला. त्या ह्मणाल्या "मेलं असं करायचं होतं, तर या हातांनीं एकदाचा हा जीवतरी घ्यायचा होता, अन् मग हवं तें करायचं होतं. माझ्यामागं कांहीं झालं तरी मीं पाह्यला आल्यें नसत्यें. पण माझ्यादेखत हे असले ढंग—" हांहां ह्मणतां त्यांचा कंठ दाटून आला. पुढें शब्द फुटेना.

"पण झालें तरी काय? असें मीं केलें तरी काय?" विष्णुपंत बिचारे या स्वरूपानें गांगरून ह्मणाले.

"झालं काय–काय! हें पहा काय झालं तें," असें ह्मणून लक्ष्मीबाईनीं तें पत्रांचें बिंडोळें विष्णुपंतांच्या पुढें आपटलें व त्यांनां तो दुःखावेश न आवरून आतां त्या मोठमोठ्यानें रडूं लागल्या.

आपल्याच पत्रांचें तें बिंडोळें पाहिल्याबरोबर विष्णुपंतांच्या डोक्यांत चकून् उजेड पडला व ते मोठमोठ्यानें हंसूं लागले. त्यांच्या हंसण्याचें वास्तविक कारण लक्ष्यांत न आल्यामुळें लक्ष्मीबाई जास्तच चवताळून तिरमिरीनें ह्मणाल्या "लोकांचा जीव चालला तरी इकडे मेली थट्टाच वाटते? न वाटेल तर काय झालं! आमच्या उरावर घरीं सवती आणायला हव्यात, ह्मणून इतकं हंसणं सुचतंय्. दुसऱ्याच्या जीवाला काय होतंय् याची आहे का काळजी. एकदा मेल्यें ह्मणजे घरीं सवत आणायला मोकळीक झाली, अस्संचना?"

"हो, हो, अस्सेंच, अस्सेंच!" विष्णुपंत जवळ येऊन व लक्ष्मीबाईच्या खांद्यावर हात टाकून ह्मणाले. "तूं मेल्यावर कशाला! आतांच मीं ही तुझी सवत घरीं आणली आहे!"

"दाखवा पाहूं मेलीला! सटवीच्या झिंजोट्या धरून आतांचे आतां तिला बाहेर घालवून देईन," लक्ष्मीबाई पाय आपटून जणूं काय तिला घालवून देताहेत अशा आविर्भानें ह्मणाल्या.

"बघ हो! नाहींतर मग कांकूं करशील?"

"ह्मणजे! या घरांत मी कुणीच नाहीं असं आपण समजतां कीं काय! इथं पायतर ठेवूंदे त्या सटवीला, त्याच पावलीं तिला हांकलून देईन तरच मी नांवाची लक्ष्मी असेन!"

"बरें तर. ही पहा मीं आपल्या घरांत सवत आणली आहे!" विष्णुपंत लक्ष्मीबाईचें चुंबन घेऊन म्हणाले. "घालव पाहूं हिला आतां कशी घालवतेस ती बाहेर!"

"ह्मणजे? ही भलतीच मेली काय थट्टा!"

"ह्मणजे काय! अग वेडे, तुझी सवत आणखी दुसरी कोण असणार! तूं इथें नव्हतीस अन् तुझीं पत्रेंहि येत नव्हतीं, ह्मणून मीं तीं तुलाच उद्देशून सर्व लिहिलीं आहेत," विष्णुपंत खोखो हंसत ह्मणाले.

" खरेंच का पण हें ! " लक्ष्मीबाई पतीच्या खांद्यावर मान टाकून त्याच्या मुखाकडे पहात संशयग्रस्त मुद्रेनें ह्मणाल्या.

" खरेंच ह्मणजे ? मी खोटेंच का सांगेन तुला सगळें. मी असें करीनसें तुला वाटतेंतरी ?"

" पुरुषांचा कुणींबाई नेम सांगावा ? "

" तुह्मींच ! "

"बरं, मीतरी तसं करीन," लक्ष्मीबाई विष्णुपंतांनां आलिंगन देऊन ह्मणाल्या.

" मग आजच्यासारखा प्रसंग येणार नाहीं," विष्णुपंत उलट तसेंच करून ह्मणाले. " त्याला सहा महिन्यांचें मौनव्रत पत्करावें लागतें!"

" मेलं त्याचं नांव नको आतां ! मी आजन्म असं करणार नाहीं. "

" तथास्तु! " ह्मणून विष्णुपंतांनीं त्यांचें तोंड मिटलें!

* * * * *

इटकुली मिटकुली गोष्ट सरो आणि आमच्या वाचकांचें पोट भरो!

## गोष्ट २६ वी.

## तारा.

" बाबा, बाबा, मला किनी, एक तुमच्यासारखा पोशाक आणा, ह्मणजे मी तुह्मांला मदत करीन."

" वाहवा ग वाहवा! बायका कुठें लढाईंत जात असतात का? बाबा, तुह्मी हिचें कांहींएक ऐकूं नका हो! मला मात्र एक चिलखत आणि एक तरवार द्या; ह्मणजे मी येईन तुमच्याबरोबर."

" अहाहा! तुला कुणीं सांगितलं बायका लढाईंत जात नाहींत ह्मणून? तूं एक तरवार अन् चिलखत मागतोस, पण बसणार कशावर?"

"हो गडे खरेंच! मला घोड्याची आठवणच नाहीं. बरें माझें राहो, पण तूं कशावर बसून जाणार?"

" कोण, मी होय? मला कालच रावसाहेब ह्मणाले, तुझे बाबा तुला सगळा पोशाक देत असले तर आपण एक घोडा देईन ह्मणून. अरे, पण बाबा कुठं गेले?"

" आंत पाणी प्यायाला. चल आपणहि तिकडेच जाऊं."

असें बोलत तीं बहीणभावंडें माजघरांत गेलीं. त्यांचे वडील त्यांना दारांतच भेटले. त्यांनीं विचारलें " तारे, तूं काय मघांशी ह्मणालीस?"

" बाबा, तुह्मी तिचें कांहीं ऐकूं नका. ती आतांशा फारच डोक्यावर बसूं लागली आहे."

" बाबा, मला हा जेव्हांतेव्हां असं ह्मणतो. मी काय हो असं करत्यें?"

" आणखी काय करायचें? एवढी थोरली गाणारीण तर झालीस! आणि रावसाहेबांच्या वाड्यांत दररोज सतार वाजवून पद ह्मणतेस; आणखी—"

" मोत्या, अंमळ तोंड आवर. ती लहान आहे तोंवर आहे हें. उद्यां मोठी झाली ह्मणजे मग ती कशाला कुठें जाईल. तारे, काल तूं रावसाहेबांच्या घरीं उत्तम गाणें ह्मटलेंस ह्मणून ऐकलें?"

"चांगलं असं कांहीं नाहीं. नेहमींप्रमाणंच; पण त्यांनीं मला बक्षिस देण्याचं कबूल केलं; आणि काय हवं असं विचारलं."

"मग तूं काय मागितलेंस?"

"तुमच्याबरोबर येण्यासाठीं बसायला एक घोडा मागितला."

"असें! तुझा लढाईवर येण्याचा बेत आहेतर? ठीक!"

इतकें ते बोलतात न बोलतात तोंच एक शिपाई त्यांचेकडे आला आणि "आपल्याला लवकर बोलावलें आहे," असें सांगून तांतडीनें निघून गेला.

"स्वयंपाक झाला आहे. जेवून जायचं होतं," तारेची आई तितक्यांत ह्मणाली. त्याप्रमाणें तारेच्या वडिलांनीं घाईघाईनें भोजन उरकलें व पोषाक करून "मला रात्रीं येण्यास सवड होणार नाहीं," असें सांगून ते तांतडीनें निघून गेले.

[ २ ]

राजाराम महाराजांच्या वेळची ही हकीगत आहे. तारेचा बाप विश्वासराव हा रावसाहेबांच्या पदरचा एक शूर शिपाई असून आज त्याच्या गांवाला मुसलमानांच्या सैन्यानें वेढा घातला होता. गांव कांहीं फारसें मोठें नव्हतें. हजार दीड हजार लोकांची वसति असेल. त्यांत ब्राह्मणवसति इतर जातींपेक्षां बरीच जास्त होती. गांवाच्या सभोंवार दगटी कोट असून आंत शिरण्यास चोहों दिशांस चार मजबूत वेशी होत्या.

वर सांगितलेले रावसाहेब हे त्या गांवचे जहागीरदार होते. मुसलमानांचा वेढा पडून पंधरा दिवस झाले, पण अजून कोणाचीच सरशी झाली नव्हती. तरी अलीकडे तीन दिवस बाहेरच्या लोकांनीं जास्त उचल घेऊन आंतल्या लोकांवर गोळयांचा सारखा वर्षाव चालविला होता. ह्या माऱ्याखालीं आंतले लोक अगदीं जेरीस आले होते. कोणाला अन्न खायाला कीं घटकाभर झोंप घ्यायाला फुरसत नव्हती. पण असें किती दिवस चालणार ! अती श्रम करून मनुष्याच्या अंगांत ताकद तरी कशी रहाणार ! असा विचार करून रावसाहेबांनीं त्या लोकांचे दोन भाग केले होते. अर्धे दिवसा विश्रांति घेत आणि अर्धे रात्रीं विश्रांति घेत. आणि तशीच निकराची वेळ आली तर विश्रांति घेत असलेलेहि तिकडे जात. त्याप्रमाणें विश्वासरावांची आज रात्र पाळी होती. हा शिपाई साधारण गरीब स्थितींतलाच होता. त्याला वर सांगितलेलीं मोतीराम व तारा हीं दोन अपत्यें होतीं.

तारा मोतीरामापेक्षां लहान होती. हल्लीं तिचें वय बारा वर्षांचें होतें. ही पोर चांगली सशक्त, गोरी आणि सुरूप होती. तिचा चेहरा उग्र असून पुरुषासारखा दिसे. तिला चांगलें लिहितांवाचतां येत होतें. रावसाहेबांचीतर तिच्यावर फार मर्जी असल्यामुळें त्यांच्या मुलांबरोबर ती घोड्यावर बसणें, तीर मारणें, पट्टा खेळणें, बंदूक मारणें, तरवार, भाला, बर्चा वगैरे शस्त्रें धरणें इत्यादि कसबें शिकली होती. शिवाय याहूनहि तिला एक ईश्वरी देणगी होती. ती ही कीं, तिचा कंठ फार मधुर असे. ती गाण्याच्या कामांत मोठमोठ्या गवयांनांहि

लाजवित असे. रावसाहेबांनां जेव्हां तिची गायनकला समजली तेव्हां त्यांनीं तिला सतार वाजविण्यास शिकविलें; आणि तें काम ती फारच लवकर शिकल्या-मुळें त्यांनीं तिला एक बांसरी बक्षिस दिली होती. ती बांसरी ती नेहमीं आपल्या-जवळ बाळगी आणि वाजवित असे. तारा नेहमीं बापाबरोबर बाहेर जात असे. यामुळें तिला त्या वेळच्या बहुतेक लढायांचीं वर्णनें कळत होतीं. शिवाय लढाईंत किती वाद्यें असतात, तीं केव्हां कशीं वाजवितात, हें प्रथम तिला समजलें होतें. पुढें तीं वाद्यें ती स्वता वाजवूं लागली होती. तारा तीं वाद्यें इतक्या उत्तम रीतीनें वाजवी कीं, प्रत्येक शिपाई तोंडांत बोट घालून तिच्याकडे पाही आणि मोठ्या कौतुकानें तिला तीं वाजविण्याची एकेक नवी कला शिकवी.

आतां फौजेचे दोन भाग केल्यापासून विश्रांति घेण्याची जागा रावसाहेबांच्या वाड्यांत केली होती. दुपारीं आणि संध्याकाळीं विश्रांति घेणारी शिपाई मंडळी जेवणाचे वेळीं तारेला मुद्दाम बोलावून नेत आणि तिच्याकडून दोनचार पदें ह्मणवून व सतार, अलगूज, बांसरी हीं वाद्यें वाजवून आपली करमणूक करीत.

तारेची ही गायनवादनकला आसपासच्या खेड्यांत प्रसिद्ध झाली होती. तिचा भाऊहि तिच्याप्रमाणेंच हुषार होता, पण त्याचें लक्ष्य शस्त्रविद्येकडे फार असे. विश्वासराव बाहेर गेल्यावर ह्माळसाबाई जेवायाला बसल्या. मोतीराम त्यांनां गोष्ट वाचून दाखवूं लागला. ती गोष्ट ऐकतऐकत ह्माळसाबाईंचें जेवण झालें. उष्टेंखरकटें झालें, आणि आतां अंथरुणें घालण्यासाठीं त्या माजघरांत येणार, इतक्यांत इजार, डगला, टोपी घातलेल्या एका मुलानें येऊन त्या दोघांनां नमस्कार केला आणि आपणच खो खो हंसत सुटला. त्याबरोबर ह्माळसाबाई ह्मणाल्या "कोण तारे! काय चहाटळ पोर आहे तरी ?"

"आई, हिनें माझा डगला, विजार घातली आहे. यंव, काय पण सजलें आहे माकड! आतां कुणी ह्मणेल का ही बायको आहे ह्मणून? तारे, काढ तो माझा पोशाक !"

"अरे दादा थांबरे थोडासा. मीं आपलं उगीच बघितलं कसं काय दिसतं तें."

असें ह्मणत तारेनें आपली बांसरी घेतली आणि ती ती वाजवूं लागली. इतक्यांत दारावर कोणीतरी हांका मारतें आहे असा तिला भास झाला. त्याबरोबर आपल्या पोशाकाचें भान न राहून ती झटकन् बाहेर गेली. पहाते, तों विश्वास-रावांनां एक गोळी लागल्यामुळें ते बेशुद्ध झाले आहेत आणि मेण्यांत घालून त्यांनां घरीं पोहोंचतें केलें आहे. तो प्रकार पहातांच सर्वजणें घाबरलीं. ह्माळसा-

बाईनीं कसेंतरी अंथरुण घालून त्याचेवर त्यांनां निजविलें. बापाची ती भयंकर स्थिति पाहून मोतीराम कोणाला न सांगतां वैद्याकडे गेला. इकडे ह्माळसाबाई अगदीं वेड्यासारख्या झाल्या होत्या. त्यांनीं मोतीरामाला पुष्कळ हांका मारल्या, पण तो कांहीं ओ देईना. तेव्हां त्यांनीं शेजारीं असलेल्या तारेस "वैद्यांनां लवकर घेऊन ये," ह्मणून सांगितलें. तारा आपला तो पोशाक उतरून जाण्याच्या बेतांत होती. पण ह्माळसाबाईनीं तिला "तशीच जा, मग बदल तुझा पोषाक," ह्मणून घाईनें सांगितल्यावरून ती तशीच बाहेर पडली. ह्यावेळीं तिच्या हातांत ती बांसरीहि चुकून राहिली होती. तारा गेल्यावर दहाएक मिनिटांनीं मोतीराम वैद्याला घेऊन आला. वैद्यानें विश्वासरावांची जखम नीट तपासून बांधली आणि तो निघून गेला. कांहीं वेळानें विश्वासराव शुद्धीवर आल्यासारखे झाले न "तारे, थोडें पाणी आणग," एवढेंच ह्मणून पुनः ते पडले. त्यांनीं तारेचें नांव काढतांच ह्माळसाबाई दचकल्यासारख्या झाल्या. विश्वासरावांस पाणी देऊन त्या मोतीरामास ह्मणाल्या "मोत्या, तारा नाहींकारे तुला वाटेंत भेटली?"

"ह्मणजे? नाहीं बोवा. तूं तिला कुठें पाठविलीस का काय?" घाबऱ्याघाबऱ्या मोतीराम ह्मणाला.

"होय. तूं वैद्याकडे गेलेला मला ठाऊक नाहीं. ह्मणून मीं तिला पाठविली. आतां आधीं जा बरं ती इतका वेळ कुठं गेली आहे तें पहा."

"केव्हांशी गेली ती?"

"आतां किनी, शंभर प्रश्न विचारूं नकोस. आधीं जा. दिवस हे असले; मला कुठून बुद्धि झाली तिला पाठविण्याची," बोलतांबोलतां ह्माळसाबाईंचा कंठ भरून आला. डोळ्यांतून अश्रुधारा लागल्या. नंतर मोतीराम अधिक कांहीं न बोलतां हातांत तरवार घेऊन बाहेर पडला.

इकडे विश्वासराव चांगले शुद्धीवर येऊन मुलें कोठें आहेत ह्मणून विचारूं लागले. ह्माळसाबाईनीं नाइलाजास्तव झालेली हकीगत त्यांनां सांगितली. तेव्हां ते तसेच उठून निघाले. पण त्यांनां दोन पावलेंहि चालण्याची शक्ति नसल्यामुळें ते धाडकन् खालीं पडले. ह्माळसाबाईनीं त्यांनां सावध करून बिछान्यावर आणून निजविल्यावर थोड्या वेळानें ते ह्मणाले "तुला मागचापुढचा कांहींच पोंच नाहीं. शत्रूंनीं गराडा घालून नुसता प्रलय केला आहे. त्यांचे हेर गुप्तपणें गांवांतून हिंडतात अशी वदंता आहे. आणि अशा वेळीं तूं तिला रात्रीची बाहेर कशी

पाठविलीस ?" ह्मालसाबाईची रडण्यापर्यंत पाळी आली होती. पण तें त्यांनीं मोठ्या कष्टानें आवरलें. तासा दीड तासानें मोतीराम एकटाच परत आला.

झालें. ती काळरात्र संपून दिवस उगवला. पण तारेचा ठिकाण नाहीं. सगळ्या गांवांत शोध केला, तटावर चौकशी केली, पण कोठें पत्ता नाहीं!

[ ३ ]

वाचकहो, आतां आपण तारेच्या आईबापांना अश्रु गाळतांना पहाण्यापेक्षां तारेच्याच मागोमाग जाऊं. ती पहा तारा गांवापासून दीड दोन मैल आली आहे. तिच्याभोंवतीं कितीतरी शिपायांचा गराडा पडला आहे. ते सगळे तिच्या भोंवतीं आणि ती मध्यें अशी ती टोळी चालली आहे.

उजाडण्यापूर्वींच त्यांनीं तिला आपल्या छावणींत नेऊन एका कोठडींत कोंडून ठेविली होती. वाचकभगिनींनो, तुह्मांला वाटत असेल कीं, तारेनें तो दिवस त्या कोठडींत रडून काढला असेल. पण नाहीं बरें! बंदींत जातांच प्रथम तारेला थोडेंसें वाईट वाटलें खरें, पण लागलीच तिनें आपलें दुःख आवरलें. आतां आपण वांचत नाहीं असें तिला खास वाटूं लागलें. पण आपण मरण्यापूर्वीं आपली झालेली हकीगत लिहून काढावी; साधलें तर तें पत्र कोणाबरोबरतरी आपल्या घरीं पाठवावें, नाहींतर फाडून टाकावें, असा विचार करून तिनें खिशांत हात घातला. तों एक कागद तिला सांपडला. पण लेखणी कांहीं खिशांत नव्हती. आणि लेखणीहि असती, तरी शाई कुठें मिळणार? तथापि तिला एक युक्ति सुचली. तिनें लागलीच आपल्या हातांतली पाटली काढली; तिचा फासा दांतानें उकलला आणि डाव्या हाताला थोडी जखम करून तिनें तें पत्र फाशानें लिहिलें. त्याची पिशवी करून तिच्यावर पत्ता लिहिला, आणि नंतर तें खिशांत ठेविलें.

इतक्यांत संध्याकाळ झाली. चांगला अंधार पडल्यावर एकाएकीं तारेची कोठडी बाहेरून कोणीं उघडली. लगेच पांचसहा शिपाई व सेनापती एवढे तिच्या कोठडींत शिरले. त्यांनां पहातांच तारा उठून उभी राहिली. तिच्याकडे निरखून पाहून सेनापती आपल्या शिपायांस ह्मणाला "कायरे, तुह्मींतर मला छोकरी आहे ह्मणून सांगितलेंत, आणि हातर छोकरा दिसतो!"

"नाहीं, नाहीं महाराज, ही छोकरीच आहे. तिनें वेष पालटला आहे ह्मणून तसें दिसतें." एक शिपाई ह्मणाला.

नंतर सेनापती तारेकडे वळून ह्मणाला "ए छोकरी, तूं आतां आमचेबरोबर चल. आह्मी वेशीपाशीं गेलों ह्मणजे तुझी ती बांसरी नेहमींप्रमाणें वाजीव-वाजविशीलना ?"

इतका वेळपर्यंत तारेची मान खालीं होती. पण त्या सेनापतीचा शेवटला प्रश्न ऐकून तिनें होकारार्थीं मान डोलवली व सरोष दृष्टीनें एकवार त्याच्याकडे पाहून लागलीच खालीं पाहिलें. त्यावेळीं तिचा चेहरा किती फिक्कट दिसत होता! मातृप्रेम, पितृप्रेम आणि बंधुप्रेम ह्यांनीं तिच्या आंतड्यांस पिळवटून टाकलें होतें. आतां आपली व त्यांची भेट होणें शक्य नाहीं, ह्या दुष्ट निराशेनें तिच्या तोंडावर मूर्तिमंत प्रेतकळा आणली होती. नंतर थोड्याच वेळानें ती सर्व फौज निघाली. त्याबरोबर तारेलाहि जावें लागलें.

त्यावेळीं काळोख ह्मणजे किती होता! वारा मोठ्या सोसाट्यानें वाहून सर्वांस खडबडून जागें करित होता. मेघांची एवढ्या मोठ्यानें गर्जना चालली होती कीं, प्रत्येक गडगडण्याला सर्वांच्या पोटांत भीति उभी रहात होती. वीजहि मधून मधून चमकून आपल्या तेजाचा प्रताप दाखवितच होती. आकाशांत एकहि तारा प्रकाशत नव्हता. अशा त्या काळरात्रीं आमची तारा खालीं मान घालून चालली होती. आदले रात्रीं झोंप नाहीं, दिवसा पोटभर अन्न नाहीं, ह्यामुळें ती फारच थकली होती. चालण्याला तिच्यांत मुळींच त्राण उरला नव्हता. ह्यामुळें ती वरचेवर मागें राही. अशी ती पांचसहा वेळ मागें राहिली, तेव्हां एका शिपायानें तिला एक चापट दिली आणि "पळून जाण्याचा बेत आहे होय ? तसें जर केलेंस तर आतांच प्राणास मुकशील ?" असें ह्मणत तिला सर्वांच्या मध्यभागीं घातली.

त्यावेळेस तारेला किती बरें दुःख झालें ? इतका वेळ तिनें दाबून ठेवलेले अश्रू आतां खळखळ वाहूं लागले. आईबाप, भाऊ ह्यांच्या निरर्थक अश्रू ढाळणाऱ्या मूर्ती तिच्या डोळयांपुढें उभ्या राहिल्या. शेवटीं ती सर्व फौज त्या वेशीजवळ पोहोंचली. मग लागलीच त्या सेनापतीनें चोहींकडे नजर फेंकून हल्ल्याची सर्व तयारी नीट आहे अशी मनाची खात्री करून घेतली, आणि तो तारेकडे वळून ह्मणाला "ए छोकरी, आतां ती बांसरी तूं नेहमीं वाजवित होतीस तशीच अगदीं वाजीव !"

तो दुष्ट काळाचा हुकूम ऐकतांच तारा अगदीं गर्भगळित झाली. तिच्या अंगास कांपरें सुटलें, आणि दरदरून घाम आला. तोंड अगदीं पांढरें फटक, निस्तेज दिसूं लागलें. ती आपल्या थरथरणाऱ्या हातांनीं ती बांसरी वाजवूं लागली. त्याबरोबर सेनापती घोड्यावरून खालीं उतरला आणि अगदीं मृदु आवाजानें

तारेस ह्मणाला "बाळे, हे सूर वाजवायचे नाहींत. तूं घरीं असतांना जे वाजवित होतीस, ते वाजीव."

तारेनें त्याचें बोलणें ऐकलें न ऐकलेंसें केलें, आणि पुनः पूर्वीप्रमाणेंच ती वाजवूं लागली. तेव्हां सेनापतीनें तिचा हात धरला आणि ह्मटलें "बाळ, तूं माझें ऐकलेंस तर हा हार आणि ही आंगठी तुला बक्षीस देऊन तुला तुझ्या घरीं पोहोंचवीन. हं चल आटप, हें घे, आणि निदानचें दुसरें पद वाजीव."

"मला तुमचं तें कांहीं नको. माझा हात सोडा ह्मणजे मी वाजवित्यें," असें ह्मणत तारेनें आपला हात सोडवून घेतला, आणि आपल्या अंगांतलें सर्व बळ एकवटून खूप मोठ्यानें आणि भराभर पहिल्यापेक्षांहि भेसूर आणि भयसूचक असे सातआठ सूर वाजविले.

ते ऐकतांच त्या निर्दय सेनापतीच्या अंगाची संतापानें काहिली होऊन त्यानें त्यासरसा तारेच्या बांसरी वाजविणाऱ्या कोमल हातावर जोरानें वार केला. बिचारी तारा मूर्च्छा येऊन धाडकन् खालीं पडली.

[ ४ ]

त्याच दिवशीं संध्याकाळपासून आंतले लोक नेहमींप्रमाणें तटावर आपलें काम बजावित नव्हते. एक चतुर्थांश लोक पहाऱ्यावर ठेवून बाकीचे विश्रांति घेण्याच्या नादीं लागले होते. कारण त्या दिवशीं नेहमींप्रमाणें शत्रूची गडबड नव्हती. त्यामुळें ते थकले असावेत अशी त्यांची समजूत झाली होती. रात्रीं बारांच्या सुमारास विश्रांति घेणारे लोक तर घोरतच होते. पण एक चतुर्थांश लोक जे पहाऱ्यावर आले होते तेसुद्धां बहुतेक निद्रावश झाले होते. एकदोघे मात्र चांगले सावध होते. त्यांच्या कानीं हे भेसूर सूर जातांच ते कोण वाजवितें आहे हें त्यांनीं ओळखिलें, आणि शत्रु इतके जवळ आले असून तारा त्यांच्या हातांत सांपडली आहे असें लक्ष्यांत येतांच त्यांनीं सर्व मंडळीस जागें करण्याकरितां कर्णे आणि शिंगें वाजविलीं. त्याबरोबर सर्व मंडळी खडबडून उठली, आणि तटाकडे धावत गेली. तेथें त्यांनां तारा शत्रूच्या हातीं सांपडली असून आतां तिनेंच ह्या सूचना केल्या, असें कळतांच सर्वजण तिच्या संरक्षणासाठीं झटले. तिला सोडविण्याची त्यांनीं शिकस्त केली, पण उपयोग काय ? हे त्यांचे सर्व प्रयत्न पालथ्या घड्यावरच्या पाण्याप्रमाणें व्यर्थ गेले. सर्वांनीं एका दिलानें प्रयत्न करून आणि लढून शत्रूंस मागें हटविलें; किल्ला पूर्वीप्रमाणेंच सुरक्षित आणि अभंग राहिला; पण त्या दुर्दैवी निरपराधी पोरीचें—नव्हे

त्या शूर हिरकणीचें पुढें काय झालें ? माझ्या भगिनींनों, नागासाख्या चवताळलेल्या त्या सेनापतीनें त्या गरीब, कोंवळ्या पोरीचे त्याच वेळीं तुकडे तुकडे करून टाकले !

दुसरे दिवशीं सकाळीं शत्रू पार नाहींसे झाले का नाहींत हें पहाण्यासाठीं कांहीं मंडळी तटावर चढली. तों तेथें कोणी नसून पुष्कळांचीं प्रेतें पडलेलीं दिसलीं. अगदीं वेशीच्या तोंडाशीं एक छिन्नभिन्न झालेलें प्रेत होतें, तें मोतीरामानें ओळखिलें. त्याबरोबर त्याच्या अंगावर शहारे येऊन 'तारा' असें ह्मणत तो खालीं पडला. बाकीच्यांनीं तारेचें नांव ऐकतांच तीं तेथें धावत आलीं आणि डोकें फोडून घेऊं लागलीं.

बराच आकांत चालला होता. शेवटीं जवळच्या मंडळींनीं त्यांची समजूत घालून तारेच्या दहनाची तयारी केली. दहन करतेवेळीं एक पत्र तिच्या खिशांत सांपडलें. त्यांत पुढील मजकूर होता:—

"ती० बाबा यांस तारेचा नमस्कार.

मी घरांतून सरासरी हांकभर गेलें असेन तों तेथें एक डोळी उभी होती. मी त्या डोळीशेजारीं आलें, तशी दोघांनीं मला पकडून माझे तोंडांत बोळा घातला आणि मला डोळींत घालून व ती बंद करून ते भरधांव निघाले. त्यांच्या हातून सुटण्यासाठीं मीं आपली शिकस्त केली, पण ती सर्व व्यर्थ गेली. थोड्याच वेळानें त्यांचा मला पकडण्याचा आशय त्यांच्या आपापसांतल्या बोलण्यावरून समजला. शत्रूंनीं देऊं केलेल्या मोठ्या रकमेच्या मोहानें मला पकडण्यासाठीं आलेले ते आपलेच लोक होते! ते नराधम कालपासून माझा पाठलाग करित होते, असें मला आतां कळलें. माझ्याकडून बांसरी वाजवून बाहेरून तुह्मांला कुमक आली आहे असें भासवून वेशीचे दरवाजे तुह्मीं उघडावे, असें करण्याचा शत्रूचा मानस आहे. आपल्या पिढीजात कुळाच्या नांवाजोगेंच मी आतां आचरण करीन. पण तुह्मां सर्वांनां मुकेन! माझ्या देशापुढें मला माझ्या प्राणांची किंमत नाहीं! हें पत्र लिहिण्यास कागद सांपडला. पण शाई कुठली ? आई तूं इतके दिवस खाऊंपिऊं घालून वाढविलेल्या शरीरांतलें हें रक्त आहे. असो. आतां वेळ नाहीं. कोणी पाहील ह्या भीतीनें पुरें करतें. पण हें पत्र तुह्मांला मिळेल का ? आई, बाबा, दादा, तुह्मां सर्वांची आतां हीच भेट.

तारा."

## गोष्ट २७ वी.

# गोदी.

गोदी ह्मणजे कांहीं फार मोठी मुलगी नव्हे. अजून तिला पांच वर्षेंहिं पुरतीं झालीं नव्हतीं. पण एवढ्या वयांतच या चिमुकल्या पोरीचे जे गुण दिसून आले, ते सहृदय मनुष्याच्या अंतःकरणास चटकाच लावण्यासारखे होते. आईनें किंवा बापानें मुद्दाम होऊन गोदीला कांहीं शिकविलें होतें असें नाहीं. आणि तसें कांहीं विशेष शिकवण्यासारखें तिचें वयहि नव्हतें. तथापि मुलें जन्मल्यापासूनच शिकूं लागतात. गोदीच्या दोघी वडील बहिणी जे कांहीं पोरींचे खेळ खेळत किंवा दुसरें हरकांहीं कृत्य करीत, त्यांच्यायोगानें या ग्रहणशील पोरीचें आयतेंच काम होत असे. ही पोर तीन साडेतीन वर्षांची असतांच आठआठ, दहादहा वर्षांच्या पोरींचे खेळहि खेळूं लागली. फुगड्या खेळण्याचीतर गोदीला पराकाष्ठेची हौस असे. मोठमोठ्या मुलींचे हात धरधरून आणि त्यांच्याजवळ जसा काय हट्टच घेऊन कितीक वेळ ती फुगड्यातर फुगड्याच घालून आपली नाजुक काया दमवून घेई आणि घामानें अगदीं थबथबून जात असे. फुगड्या घालतांना जाणत्या मुलींनीं कितीकदा तिला लोळवावी, पण तिला ती गंमतच वाटे. चोळी परकर नेसण्यासारखें तिचें मोठें वय होतें असें नाहीं. पण पुष्कळदा ती चोळी परकर नेसून आपले खेळ खेळूं लागे. तिचा बांधा ठेंगणा, डोळे पाणीदार, नजर तीव्र व अंग पराकाष्ठेचें चपळ होतें; आणि वय चोहोंच्या आंत. अशा स्थितींत ती कधीं नागवी, कधीं परकर चोळी नेसलेली, कधीं झुसता सद्दा (सदरा) किंवा कोट घातलेली, अशी कशी जरी असली, तरी जेव्हां जेव्हां म्हणून ती आपल्या खेळांत दंग असे, तेव्हां तेव्हां आपल्या अंगचापल्यानें, टापटिपीनें आणि बोबड्या पण स्वाभाविकच अति अति मधुर अशा वाणीनें पहाणाराचें मन वेधून टाकी. दोन्ही हात सारखे कमरेवर ठेवून आणि सगळें अंग समतोल राखून, पायांचीं दोन्हीं पावलें जुळून तळव्यांनीं जमिनीला किंचित् चाटलें न चाटल्यासारखें करून अत्यंत त्वरेनें पावलें पुढें टाकणें आणि मागें घेणें अशा प्रकारची जी एक "किकीचें पान बाइ कीकी" ह्मणून फुगडी खेळतात, तिच्या मध्येंतर गोदीसारखी पटाईत मुलगी शेंपन्नास मुलींत सांपडणार नाहीं. ही फुगडी खेळतांना तिचें नागवेंपण तिला जास्तच शोभा देई. या फुगडींत तिचें अंगचापल्य फारच विलक्षण दिसून येई. कसरती लोकांचीं शिकलेलीं पोरेंसुद्धां हें काम गोदीपेक्षां जास्त टापटिपीनें आणि बिनचूक करतील असें वाटत नाहीं.

फुगड्यांप्रमाणेंच गोदीला भातकुलीच्या खेळाचा भारी भारी नाद असे. हा खेळ खेळल्यावांचून तिचा दिवस बहुधा सुना जात नसे. तिच्या मोठ्या बहिणींना खेळण्याचा इतका फारसा नाद नाहीं. पण इनें त्यांची पाठ पुरवावी. गोदीनें आपल्या दुखण्याच्या पहिल्याच दिवशीं "आई, मला भातुकलीला देशील ना?" असा प्रश्न केला होता; आणि आईनें "गोदे, तूं बरी झालीस म्हणजे मी तुला भातुकलीला देईन हो," असें तिला म्हटलें होतें. या आणि असल्या कितीकतरी दुसऱ्या गोष्टी आईच्या अश्रुपातास कारण होत आहेत. भातुकली खेळतांना गोदीनें आपलीं उपकरणें मोठ्या व्यवस्थित रीतीनें मांडावीं. ती केव्हां पाणी काढण्यांत, कधीं अंग धुण्यांत, केव्हां पानें वाढण्यांत, याप्रमाणें संसारिक कृत्यांची हुबेहुब नक्कल उठविण्यांत एखाद्या पोक्त गृहिणीसारखी अगदीं गढून गेलेली पाहून तिच्या आईबापांस कौतुक होई. तेंच आतां त्यांच्या दुःखास पार नाहीं असें करित आहे !

गोदीचे आणखी आवडते खेळ म्हटले म्हणजे मंगळागौर आणि हळदकुंकू हे होत. तिनें आपली कशिद्याची चोळी आणि परकर नेसून तयार व्हावें, किंवा कधीं चोळी पातळ कोणाच्यातरी पाठीस लागून नेसून घ्यावें व मोठ्या बायकांसारखा पदर घ्यावा. परकरसुद्धां तिला स्वतां नेसतां येत नव्हता. चार वर्षांच्या पोरीचा असला हव्यास व असे ढंग पाहून ज्याला त्याला नवल वाटे.

मुलींच्या ओंव्या म्हणण्यांततर गोदीनें पराकाष्ठाच करून सोडिली होती. गोदीची वाणी फारच मधुर आणि वर्णोच्चार अगदीं स्पष्ट व शुद्ध होता. एक 'र' मात्र काय तो तिला म्हणतां येत नसे 'र' बद्दल ती 'द' 'ड', असें कांहीं म्हणे. नुकती अलीकडे महिना पंधरा दिवसांत ती चूक तिच्या समजुतीस आणून दिल्यावर तिला 'र' बरोबर उच्चारतां येतो आहे, असें दिसून आलें. पण तिचा तो बोबडा उच्चारच कानांला कौतुक देत असे. आणखी, तिची म्हणण्याची धाटणी सुरेख बसून गेली होती. येणेंकरून तिच्या ओंव्या चित्ताकर्षक होत. शेंपन्नास ओंव्या तिला पाठ येत होत्या. आणि त्या ती आपल्या वडील बहिणींच्या व आईच्या पाठीस लागलागून शिकली होती. एखाद्या ओंवीचे एकदोन चरण तिनें म्हणावे, आणि पुढचे आईला विचारून घ्यावे. अशा रीतीनें तिची आपण होऊन शिकण्याची अनिवार हौस असे. गोदीच्या तान्ह्या बहिणीला सकाळीं न्हाऊं घालून पाळण्यांत ठेविलें कीं गोदीनें एका जागीं ठाम उभें राहून दोर हातीं धरून एकीकडे पाळणा हालवावा आणि एकीकडे आपल्या सुरस ओंव्या

गात रहावें, तें ती धाकटी बहीण स्वस्थ झोंपी जाईपर्यंत. गोदीचें अलीकडे पांच सहा महिने हें आवडतें काम नित्याचें झालें होतें. गोदीच्या त्या सुश्राव्य ओंव्या ऐकून ऐकून तिची सहा महिन्यांची बहीण आनंदांत आलेली दिसे आणि आ आ ऊ ऊ असे आपले अस्पष्ट बोल गात निजे. गोदीची ही धाकटी बहीण पहांटेस उजाडतांउजाडतां जागी होऊन रडूं लागावी आणि दुसऱ्या मोठ्या बहिणी जवळच निजलेल्या असतांहि गोदीनें आईच्या हांकेसरशी ओ देऊन तिला ओंव्या ह्मणून व अन्य रीतीनें निजवावें. त्यायोगें या अल्पवयस्क पोरीचें मोठें कौतुक वाटे.

गोदी फाडे काढण्याचा एक फार्स करी. फाडे ह्मणजे काय हें तिला वस्तुतः कळत नव्हतें. पण आपल्या मोठ्या बहिणीचें ती अनुकरण करी. तिनें पाटी स्वतः चांगली घांसूनपुसून स्वच्छ करावी आणि उजळणी शिकणारीं मुलें जशी पाटी उजळणीनें भरून टाकितात तशी गोदीनें आंकड्यासारख्या कांहीं चमत्कारिक एकसारख्या आकृति काढून पाटी दोन्ही अंगांनीं अगदीं भरून काढून आणून बापाला दाखवावी. आणि बापाच्या तोंडून "वाः, छानदार काढलें आहेस," असें कितीकदातरी ह्मणवून घ्यावें. गोदीची ही विचित्र पाटी दुरून कोणीं पाहिली तर खरोखरच ती उजळणीनें भरलेली असावीशी वाटे. तीन साडेतीन वर्षांच्या वयांत या लहानग्या पोरीचे फाडे ह्मणजे कांहींतरी एक ठराविक आकृति असे; पण त्या उगीच कांहींतरी भिरकुट्या नसत. आणि सगळी पाटी भरून जाईपर्यंत तीच तीच आकृति काढण्याला ती कंटाळत नसे. आपलें अज्ञान आपल्याला ठकवित आहे, हें या अजाण पोरीला कोठून कळणार! बालस्वभावाची ही उत्कृष्ट अनुकरणेच्छा पाहून पोटांत गुदगुल्या होत. पण हाय हाय! तें आतां सारें स्मृतिशेष होऊन डोळ्यांतून टिपें पाडवित आहे!

अलीकडे हा फाड्यांचा मिथ्या नाद सुटून गोदी खरोखरीच कांहीं अक्षरें काढूं लागली होती. आतां हीं अक्षरें शिकविण्यासाठीं तिच्या मागें कोणी लागलें नव्हतें; पण उलट तिचाच मोठा तगादा असे. तिच्या मोठ्या बहिणींनीं पाटी घेतली कीं गोदीनें सगळ्यांत मोठी चांगली पाटी असेल ती आपण घेऊन बसावें, आणि कांहींतरी सुरेख आकृति वगैरे काढूं लागावें. असें होतां होतां एकदा तिच्या भावानें तिला 'गणपति' अशीं सुरेख वळणदार मोठालीं अक्षरें पाटीवर काढून दिलीं आणि त्यांतून हात गिरविण्यास सांगितलें. गोदीनें थोडेच वेळांत तीं चारी अक्षरें हुबेहुब काढून दिलीं. तें पाहून तिच्या बहिणीभावांस मोठें कौतुक वाटलें. पण बापाला तें मोठें आश्चर्य वाटलें. जें अगदीं परिपाठांतलें

आणि ज्यांचीं नांवें प्राय: केवळ मुळाक्षरांनीं झालेलीं आहेत, अशा पदार्थांच्या साह्यानें गोदीच्या मोठ्या बहिणींस वाचावयास शिकविलें होतें. त्यासाठीं एकेक चोपडीच केली होती. 'कमळ' 'परकर' 'नथ' 'गणपति' इत्यादि शब्दांतला एखादाच शब्द प्रथम चोपडीवर लिहावा. त्यांतील अक्षरें उलटसुलट रीतीनें त्याखालीं लिहावीं. नथ, कमळ, गणपति इत्यादिकांचीं हातानेंच साधतील तशीं त्याच पानावर चित्रें काढून द्यावीं व एकेक शब्दांतील अक्षरें ओळखतां येऊं लागलीं ह्मणजे चोपडीवर दुसरा शब्द लिहावा. अशा पद्धतीनें अक्षरओळख फारच सुलभ रीतीनें होते. मोठ्या बहिणीप्रमाणें गोदीनें दादाची पाठ पुरवून चोपडी करून घेतली होती. तिजवर 'कमळ' 'गणपति' 'परकर' असे दोन तीनच शब्द लिहिले गेले ! ! तात्पर्य, गोदीला नुकतीच कोठें दहापांच मुळाक्षरांची ओळख झाली होती आणि तीं ती सुरेख रीतीनें काढी. एवढेंच नव्हे, पण बाराखड्या शिकविण्याचा बापाचा क्रम वेगळाच असे तरी मोठी बहीण बाराखड्या काढी तें पाहून ही मोठी हव्यासी मुलगी क ची बाराखडी नुकती दहापंधरा दिवसांमागेंच बरोबर काढूं लागली होती, ती केवळ बहिणीचें पाहून पाहून व विचारून विचारून. काय जें आश्चर्य तें हेंच. शाळेंतले मास्तर मुलांशीं एवढी उरस्फोड करतात आणि मुलांस अगदीं जसे काय भरवित असतात तरीसुद्धां दीर्घ प्रयासानें जें होण्याची मारामार, तें ही एवढीशी पोर आपण होऊन, भावांच्या, बहिणींच्या आणि आईबापांच्या पाठीस लागलागून मोठ्या हौसेनें शिके. लहान मुलें हातांत बूक घेऊन मुळींच कांहीं अक्षर ओळखत नसतें अशा स्थितींत खोटेंच वाचित असतात. असा प्रकार मात्र ह्या पोरीचा कधीं पहाण्यांत आलेला नाहीं. जेवढीं दहापांच अक्षरें तिला येत होतीं तीं कोणत्याहि पुस्तकांत किंवा वर्तमानपत्रांत आढळलीं तरी तीं ती अचूक वाची. तथापि वाचण्यापेक्षां तिचा पाटीवर अक्षरें सुरेख काढण्यांत भारी भर असे. कांहीं दिवसांमागें ह्या दोघी तिघी मुलींस कांहीं लहानलहान गोष्टी शिकविल्या होत्या. किंवा, शिकविल्या ह्मणण्यापेक्षां सांगितल्या होत्या असेंच ह्मणणें बरें. कारण, रोज ऐकून ऐकून त्या शाळेंतील मुलांस जशा तोंडपाठ होतात तसा कांहीं हा प्रकार नव्हे. या गोष्टी फारतर चार दोन वेळां त्यांच्या कानांवरून गेल्या होत्या. पण त्यांतल्या कांहीं गोष्टी गोदी बरोबर सांगत असे.

मोठ्या मुलींप्रमाणें गृहकृत्यें करण्याची गोदीला मोठी हौस असे. तिनें कधीं लहानसें भांडें घेऊन पाणी आणूं लागावें. केव्हां जेवणें झाल्यावर ताटें, खरकटीं

भांडीं उचलावयास लागावें. कधीं तांदूळ निवडावे. केव्हां घांसून विसळून दिलेलीं भांडीं घरांत आणून ठेवावीं. जें जें काम ती करी त्यांत तिची टापटीप, संथपणा आणि नजरेचा तीव्रपणा दिसून येई. तांदुळांतील एकूण एक खडा किंवा भातगोटा तिनें वेंचून काढावा. गोदीनें मोठ्या प्रेमळ आणि मधुर वाणीनें आईला ह्मणावें "आई, मी तुझं काम करायला लागूं?" पण हें सगळें तिच्या तब्बेतीवर होतें. आपल्याला कोणीं कांहीं सांगितलें ह्मणजे आपण तें केलें पाहिजे, हें तिला कळत नव्हतें. तिचा स्वभाव कांहींसा हट्टी आणि मानी होता. तिचा कल संभाळून तिच्याशीं वागलें ह्मणजे ती तेढी जात नसे; पण कोणी दांडगाईनें कांहीं करूं ह्मणेल तर त्याला ती जुमानित नसे कीं भीत नसे. आपल्या सोबतिणी आपल्या कांहीं कृतीमुळें रुसतात असें तिच्या लक्ष्यांत येतांच चटकन् ती आपला हेका सोडून त्यांच्या मनासारखें करी. ती मोठी विनोदी आणि कल्पक होती. वडील भावांबहिणींनां अप्पा, अण्णा, ताई ह्मणावयाचें सोडून केव्हां केव्हां तिनें गालांतल्या गालांत हंसतहंसत त्यांच्या नांवांनीं हांका माराव्या. कधींकधीं तिच्या तोंडून एखादें वाक्य असें निघे कीं—तें लिहून ठेवावें. या हतभाग्य लेखकाला जर तिजविषयींचें दुष्ट स्वप्न पडलें असतें तर तो खरोखरच तसें करता.

गोदीची नजर तीव्र आणि अवलोकनशील होती. कोठें कांहीं चमत्कारिक वस्तु पाहिली कीं तिनें आपले खिशांत महिनेच्या महिने ती बाळगावी. एखाद्या झाडाचीं पानें, फुलें, फळें चमत्कारिक दिसलीं कीं आईला किंवा बापाला तीं दाखवायास आणून विचारित बसावें.

गोदीच्या पाठीवरचें एक भावंड गेलेलें असल्यामुळें गोदीला आईचा आणि आईला गोदीचा भारीच लळा होता. गोदी आईवांचून कोणापाशीं निजली नाहीं. अलीकडे गोदीची तान्हुली बहीण आईच्या कुशीशीं असे, तरी गोदी दुसऱ्या कुशीशीं चिकटलेली असे. झोंपेंतून जागी झाली असतां "आई मला कुशींत घे," ह्मणून तिनें रडावें. भावांबहिणींबरोबर कांहींतरी निमित्त होऊन गोदीनें दिवसांतून कितीकदा तरी रडूं लागावें आणि कांहींकेल्या उगी राहूं नये. शेवटीं "गोदे ये, माझ्या जवळ ये, कुणी ताईनं का तुझा कान दुखवला?" असें ह्मणून आईनें तिला गोंजारावें, कीं गोदी चूप. सकाळीं ताक झाल्यावर गोदीनें नेमानें लोणी मागावें. कधीं एखाद दिवस ती त्या वेळेला चुकली कीं "आई, मला तूं आज लोणी नाहीं दिलं?" असें गोदीनें ह्मणावें. गुळाचा किंवा साखरेचा डबा उघडला कीं गोदीचा हात पुढें. आईनें नाहीं ह्मटलें तर "थोडा दे, इवला

इवला दे," असें गोदीनें हंसतहंसत गोड वाणीनें वदून आपलें कार्य साधावें. दह्यांवांचून गोदीचें जेवण झालें नाहीं. एखाद वेळ तें नसलेंच तर "गोदे, आज दहीं नाहीं ग, दूध चालूं का?" असें आईनें ह्मणावें, आणि एखादे वेळेस तेंहि नसलें तर "उद्यां मी तुला पुष्कळ दहीं घालीन," असें सांगितलें ह्मणजे गोदीची समजूत होई. पण रागानें नाहीं ह्मटलेलें तिला पटत नसे.

मुलांनां बापाचा लळा झाला तरी बेताचाच असतो. तशांत गोदीच्या बापाचें मुलांशीं वागणें अगदींच नेमस्तपणाचें. तथापि मुलांविषयींचें जें कांहीं जिव्हाळ्याचें प्रेम त्यानें बापाचें हृदय तुडुंबलेलें असावें, यांत काय विशेष आहे? अंतर्मुखवृत्तीचीं माणसें असतात त्यांचें कोडकौतुक जनांपेक्षां मनाशीं असतें. त्यांच्या आनंदाब्धीच्या लाटा किंवा दुःखोदधीचे तरंग सामान्यजनांप्रमाणें ओंठाबाहेर आदळत नाहींत. ते आपल्या सुखदुःखाचीं आसवें केव्हां कशीं पुसून किंवा गिळून टाकितात तें त्यांचें त्यांनांच ठाऊक. मुलगी झालेली ऐकून पुष्कळ बाप वाईट तोंड करितात. हिंदू समाजांत, विशेषें करून उच्च वर्णांत स्त्रियांच्या संबंधानें ज्या कित्येक चाली आहेत त्यांचे आजकाल तरी कित्येक वेळां अत्यंत हृदयद्रावक परिणाम घडतात. आणि येणेंकरून विचारी मनुष्याचें मन स्त्रीजातीविषयीं विरघळून जातें. तीच गोष्ट गोदीच्या बापाची आहे. 'मुली' ह्मणून त्याच्या मनाला अनादर कधींच शिवला नाहीं. उलटें, मुली ह्मणजे केवळ गाईची जात होय असें त्यानें आपल्या मनाशीं कितीक वेळां ह्मटलेलें आहे. इतक्या पोरी ह्मणून लोकांनीं नाक मुरडावें. पण मुलींविषयीं जो लौकिक तिरस्कार, त्याचा पगडा बसण्यासारखें त्याचें मन अविचारानें मठ्ठ झालेलें नाहीं. मुलांपेक्षांहि मुलींच्या अंगस्वभावांत कांहीं विशेष प्रकारचा मोहकपणा आहे. मुलींची ती बोलण्याचालण्याची ढब, त्यांचे ते कुतूहलमय नानाप्रकारचे खेळ, त्यांच्या त्या रसभरीत ओंव्या, आणि आईबापांच्या तगाद्यानें, शाळेच्या धाकानें व अभ्यासाच्या काचानें मुलांच्या मानसिक आणि शारीरिक प्रकृतीमध्यें अल्पवयांत चटकर दिसून येणारा जो बदल तो ज्यांनां शिवला नसल्यामुळें निसर्गदेवतेचें हाडींमासीं खेळणारें तें प्रेमळ वास्तव्य ह्यांच्या योगानें, मुली हा सहृदय मनुष्याला एक चित्ताकर्षक विषय आहे. असो.

बाप बाहेरून आला असतां कधींकधीं या उघड्या नागव्या मुलीनें त्याला दोन्ही हातांनीं कवटाळावें. केव्हां दादा दादा ह्मणून प्रेमपूरित दृष्टीनें हांका माराव्या. तिची ती प्रेमळ दृष्टि पाहिली ह्मणजे बापाला वाटे कीं, आपल्या हृद्गत

प्रेमाचा ही चिमुकली पोर जसा काय मोबदलाच देत आहे. दुपारीं जेवावयाला गोदीनें बापाजवळ बसावें आणि कांहीं उडवाउडव वगैरे न करितां अगदीं व्यवस्थित रीतीनें जेवावें. खाण्यासाठीं पुढें आलेल्या वस्तूंतली थोडीशी बापानें गोदीसाठीं वगळली नाहीं, असें कधींच झालें नाहीं. बापाचा या मुलीशीं जो वागण्याचा नेमस्तसा प्रकार होता तोच आतां त्याला दिवसांतून कितीकदातरी तिच्या आठवणी करित आहे!

मंगळवारीं सकाळीं गोदी निजून उठली, तेव्हांच तिची रोजच्यासारखी हुषारी दिसली नाहीं. पोरीचें कांहींतरी बिघडणार, असें आईबापांस वाटलें. पण भलताच कांहीं प्रसंग ओढवणार, ही कल्पनाहि त्यांच्या मनास शिवली नाहीं. आणि तो दिवस तसाच गेला. गांवांत प्लेगच्या उद्भवाचीं चिन्हें दूर दूर दिसूं लागलीं तोंच गोदीचीं आईबापें गांवाबाहेर दरसालच्या जागीं जाऊन राहिलीं होतीं; आणि तीं दरवर्षाच्या मानानें बरींच आधीं. यामुळें भलतीसलती कल्पना करण्याला कारणहि नव्हतें. परंतु मंगळवारीं रात्रीं जेवायचे वेळीं गोदीनें अंगातलें काढलें नाहीं, तिला थंडी वाजूं लागली, अंग तापलें व मध्यरात्रीपूर्वींच तिला जबर ताप भरला, त्याबरोबर आईचें काळीज चरकलें. तापामध्यें गोदीचा ऊर धडधड जोरानें उडत होता. तरी थंडीवाऱ्याचा ताप असेल, या पलीकडे मनानें कांहीं घेतलें नाहीं. बुधवारीं सकाळीं गोदी आपले पायीं उठून बाहेर जाऊन आली, तेव्हां तिची अंमळ हुषारी दिसली. दुपारींहि एकदा ती आपले पायीं परसाकडे गेली; तरी ताप पुष्कळ होताच. त्यांतच भिऊन ती "आई आई," करून मोठ्यानें ओरडूं लागली व उडूं लागली. आईनें गच्च आवळून धरिलें, तरी तिची भीति व धडकी कमी होईना. तेव्हांच तिला वायु झाला असावा. त्यावर मात्रा वगैरे दिल्यावर वायूचा जोर कांहीं कमी झाला. तरी ताप हालला नाहीं. रात्रीं झोंपेमधून ती कांहीं भलतेंच बोले. तरी ती रात्र इतकी भयंकर वाटली नाहीं. गुरुवारीं सकाळीं ताप बराच कमी झाला, पण पुन्हा पुष्कळ भरला. अशक्तपणा फार झाला आणि तिचें बडबडणें फार सुरू झालें. असंगतपणाचें किंवा उगाच कांहींतरी तिच्या बोलण्यांत अखेरपर्यंत फारसें आलेलें नाहीं. यामुळें वायु ह्मणावा कीं नाहीं याचाहि संशय वाटे. पण वाताचा जोरच तिला फार बोलविण्यास कारण असावा. तिनें या दोन दिवसांत ओंव्या ह्मणण्याची शिकस्त केली. ती जे काय शब्द, अक्षरें वगैरे शिकली होती, तीं सगळीं तिनें ह्मटलीं. एक का दोन, किती सांगावें. तिला जें कांहीं विचारावें, ती जें कांहीं मागे, त्या कशांतहि तिचा

गाफीलपणा दिसला नाहीं. शनिवारीं सकाळीं ती चांगली उठून आपले हातीं दोन घांस जेवली. सकाळीं तिला दोनतीन शिंका आल्या. तापहि कमी झाला होता. अशीं बरींच हुषारीचीं चिन्हें दिसलीं. आणि पुढें दोनतीन तासांनींच त्या चालत्या बोलत्या पुतळीनें देह ठेविला !

हाय ! हाय ! ! प्राणोत्क्रमाणाच्या त्या पांचवर्षांच्या पोरीच्या असह्य यातना आईबापांनीं आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या ! तीनचार दिवस त्यांनीं जिवापाड मेहनत घेतली. औषधउपाय केले. प्लेग झटला नाहीं. त्याच्या संसर्गाच्या भीतीचें वारेंहि त्यांस शिवलें नाहीं. चार दिवसांत तीं तिच्याजवळून हाललीं नाहीं. पण अखेर जें व्हावयाचें तें झालें ! दीड वर्षांपूर्वीं ती दोन महिने पुष्कळ आजारी होती, त्या वेळींच तिची आशाहि सुटली होती; पण मनाला चटका लावणारे आपले गुण दाखविण्याकरितां त्यांतून ती जगली होती !

गोदीच्या वाणींत कांहीं विलक्षण प्रकारची गोडी असे. एकेक शब्द आणि वाक्य ती रेखल्यासारखें बोले. प्रसंगविशेषीं तिचें बोलणें उद्दामपणाचें असे, पण सामान्यतः तें मृदु, मधुर आणि ऐकणारास मोहून टाकणारें असे. तिला समजूं लागलें होतें, तथापि कोणाला कसें बोलावें आणि कसें बोलूं नये, हें तिला कांहीं कळत नव्हतें. कोणीं कांहीं सांगितल्याबरोबर ऐकलें पाहिजे, हें तिला समजूं लागलें नव्हतें. कांहीं कळतें कांहीं नकळतें अशा स्थितींत ती आलेली होती. बाल्यदशेचें जें स्वभावमाधुर्य तें ह्या उण्यापुऱ्या पांचवर्षांच्या पोरीमध्यें पूर्णपणें खेळत होतें. यामुळें तिचा प्रत्येक शब्द आणि तिची प्रत्येक कृति मोठी मोहक असे. तशांत ती बुद्धीची मंद नव्हती. जें कांहीं ऐके किंवा पाही तें ती हां हां ह्मणतां आपण होऊनच आपलेंसें करी. तिची नुसती नजर पाहिली ह्मणजेच ही पोर मोठी शहाणी व बुद्धिमान् असावी, असें वाटे. आधींच मुलांपेक्षां मुलींच्या वृत्तींत स्वभावतः असणारा मोहकपणा, आणि त्यांतहि या पोरीचे अंगचे कित्येक स्पृहणीय गुण या अनेक कारणांच्या संमिश्रणानें गोदी ह्मणजे बाल्यदशेची एक सुंदर पुतळी विधात्यानें निर्मिली होती. अशा गुणी मुलीच्या वियोगदुःखानें तिच्या आईबापांच्या अंतःकरणाची स्थिति काय झाली असेल, याची कल्पना त्यांच्याच सारख्या हतभागी आईबापांशिवाय दुसऱ्यास होणें नाहीं.

## गोष्ट २८ वी.

## अखेर बाई वळणावरच गेल्या.

सन १८९२ च्या नवंबर महिन्यांतली गोष्ट. मी त्यावेळीं वाळकेश्वरचे भागांत एका पोलीस चौकीवरील मुख्य नेटिव्ह पोलीस अमलदार होतों. आमच्या चौकीच्या शेजारींच शेट जगजीवनदास मनमोहनदास यांचा रहाण्याचा बंगला होता. जगजीवन शेटजींचा व्यापार बराच पसरलेला होता. पोलीसखात्यांत मी वरचे दर्जाचा अमलदार असून त्यांतून ब्राह्मण जातीचा असल्याकारणानें माझी व शेटजींची बरीच दोस्ती होती; इतकी कीं, एखादेवेळीं कामाच्या अडचणीमुळें मला चौकींतून घरीं जाण्यास उशीर झाल्यास त्या दिवशीं माझें जेवणसुद्धां शेटजींच्या बंगल्यांतच व्हावयाचें. शेटजींची उमर उतार ह्मणजे सुमारें ६०।६५ वर्षांची असून त्यांनीं नुकेंच तीनचार वर्षांपूर्वीं तिसरें लग्न केलें होतें. त्यांची बायको इतकी सुंदर होती कीं, तशी बायको लाखांतसुद्धां शोधून सांपडावयाची नाहीं. माझीसुद्धां उमर त्यावेळीं बहुतेक शेटजींच्या जवळजवळ असल्या कारणानें बंगल्यांत शेट असोत किंवा नसोत मला प्रेमकुंवरबाईकडे जाऊन गोष्टी बोलत बसण्यांत काडीचाहि संकोच वाटत नसे व ती माउलीसुद्धां मला केवळ बापाप्रमाणें मानून माझेवर प्रेम करित असे. तिचें वय यावेळीं सुमारें एकोणीसवीस वर्षांचें असेल. शेटजींच्या घरीं त्यांचे वैभवाप्रमाणें गाड्या, घोडे, चाकरमाणसें वगैरे बरींच होतीं. परंतु त्यांच्या खुद्द कुटुंबाचीं माणसें कायतीं तीं दोघेंच. नाहीं ह्मणावयाला प्रेमकुंवरबाईचा एक सोळासतरा वर्षांचा खुशालदास नांवाचा भाऊ त्यांचेजवळ रहात असे. शेटजींनां अद्याप संतान नसल्याकारणानें व प्रेमकुंवरबाईला भावाशिवाय माहेरचें असें दुसरें कोणीच नसल्यामुळें उभयतांचें प्रेम कायतें खुशालवर. प्रेमकुंवर ह्मणजे सद्गुणांची खाणच होती. शेटजी घरीं आल्यावर त्यांच्याशीं लडिवाळपणें गोष्टी बोलत बसणें, पोथ्यापुराणें वाचणें, व एकंदरींत आपल्या वैभवाचे आनंदांत काळाचा व संपत्तीचा सद्व्यय करणें, एवढाच कायतो त्यांचा व्यवसाय असे. फक्त त्यांनां एक मात्र व्यसन होतें, आणि तें खुशालचे वाजवीपेक्षां फाजील लाड करणें हें. याला व्यसन ह्मणण्याचें कारण, त्यांचे लाडाला खुशाल अगदीं अपात्र होता. तो दिवसभर भंगट, दारुबाज लोकांबरोबर फिरावयाचा व सारी रात्र नाटकें, तमाशे, वेश्यांचीं घरें, जुगारखाने धुंडायचा. याशिवाय तो कांहींच उद्योग करित नसे. या पोराच्या वर्तनाबद्दल मी शेटजींस व प्रेमकुंवरबाईस वारंवार सांगत असें. पण शेटजीतर तिकडे फारसें

लक्ष्यच देत नसत; आणि शेटाणीहि "आह्मांलातरी दुसरें कोण आहे? आहेत दोन दिवस पोरपणाचे. उद्यां एकदा दुकानांत जाऊं लागला, कीं येईल ताळयावर," असें कांहींतरी बोलून माझी समजूत घालित असत. आमच्या पोलिसांच्या तावडींतसुद्धां तो तीनचार वेळां सांपडला होता; पण जगजीवनशेट व प्रेमकुंवर बाई ह्मणजे आमच्या चौकींतील लोकांचे आईबाप, तेव्हां खुशालच्या एका केंसालाहि धक्का पोंचण्याची भीति नव्हती.

असो. वर सांगितल्याप्रमाणें सन १८९२ च्या नवंबरचे वीसबावीस दिवस गेले होते. मी सात दिवसांची किरकोळ रजा घेऊन कोकणांत घरीं गेलों होतों तो परत येऊन चौकीवर रुजू होऊन नुक्तीच कामासंबंधानें विचारपूस करित आहें, इतक्यांत शेटजींकडून माझ्या चौकशीसाठीं मनुष्य आला. यापूर्वीं सकाळ पासून बरेच वेळां माझ्या माहितीसाठीं शेटजींनीं मनुष्यें पाठविलीं होतीं, असें मला समजल्यावरून मी तसाच उठून बंगल्यावर गेलों. वर गेलों तों शेटजी माझ्या वाटेकडे डोळे लावून काळजींत गादीशीं टेंकून पडले आहेत व प्रेमकुंवरबाईसुद्धां जवळ बसून चितातुर मुद्रेनें पण मोठ्या लडिवाळपणानें त्यांची समजूत करित आहेत, असा देखावा नजरेस पडला. मला पाहिल्याबरोबर शेटजी बसले राहिले व मला आपलेजवळ बसवून घेऊन त्यांनीं प्रेमकुंवरबाईस दार बंद करून येण्यास सांगितलें. दारास कडी घालून त्या पुन्हा आमचे बाजूला येऊन बसल्यावर शेटजी ह्मणाले "मोरोपंत, काल संध्याकाळपासून मी तुमची एकसारखी वाट पहात आहें. तुह्मी आज खास येणार ह्मणून सांगून गेलां होतां, ह्मणून हिच्या आग्रहावरून मीं कशीबशी गेली रात्र काढली. नाहींतर कालचे कालच सर्व काम उरकून टाकलें असतें. तुह्मी रजेवर गेल्यावर मीहि दुसरे दिवशीं अमदाबादेकडे गेलों होतों, तो काल सकाळचे गाडीनें परत आलों. दुपारीं पेढीवर जाऊन पहातों तों हें पत्र तिथें मिळालें."

असें ह्मणून त्यांनीं माझे अंगावर एक कागद टाकला. मीं तो हातांत घेऊन वाचला. तो ब्यांकेकडून आलेला होता व त्यांत "तुमचेकडून तारीख १५ नवंबरचा, नंबर ३५३८ चा, रकम रुपये १०,००० चा चेक आलेला आमचेकडे तारीख १६ रोजीं वटला गेला आहे," असा ब्यांकेच्या नियमाप्रमाणें समज आलेला होता. कागद वाचून झाल्यावर मीं शेटजींच्या तोंडाकडे पाहिलें तों ते कपाळावर हात मारित ह्मणाले "हें त्या कारट्याचेंच काम! तुह्मीं आजपर्यंत आमची कानउघडणी केलीत ती जर आह्मीं वेळींच ऐकिली असती तर असें कां होतें?"

हें धाडसाचें कृत्य पाहून मीसुद्धां चकित झालों व विचारलें "पण, माझा यांत कांहीं समज नाहीं झाला शेट! या कागदाचा व त्या पोराचा काय संबंध?"

शेटजी तिरस्कारानें ह्मणाले "संबंध कसला घेऊन बसलेत माझे बोडक्याचा! मोरोपंत, मी इथें नाहीं अशी संधी पाहून त्या पोरानें माझी बनावट सही करून हा चेक वटविला, दुसरें काय?"

"पण त्यानेंच कशावरून? तुह्मांला कांहीं सुगावा लागला आहे कीं काय?"

शेटजी त्रासिक स्वरानें ह्मणाले "सुगावाच कशाला पाहिजे? तो नाहींतर दुसरें कोण येणार इथें?"

"तुमचें चेक बूक कुठें होतें?"

"इथेंच असतें खोलींत टेबलावर पडलेलें?"

"बरें, खुशाल कुठें आहे हो कुंवरबाई?"

प्रेमकुंवरबाई खालीं मान घालून बसलेल्या मजकडे पाहीनातसुद्धां. मधून मधून चोरून शेटजींकडेमात्र नजर टाकीत. मी बंगल्यांत आल्यावर प्रेमकुंवरबाई माझेजवळ बोलल्याशिवाय इतका वेळ स्तब्ध राहिल्या, अशी त्यांचे व माझे परिचयांत ही पहिलीच वेळ. त्यांतून मीतर आज घराहून आलेला. बायको-मुलांबद्दल विचारूनविचारून त्यांनीं माझें तोंड दुखविलें असतें. पण ती माउली आज मजकडे नुसती पाहीनासुद्धां! इतक्यांत शेटजी त्रासून ह्मणतात "असेल कुठेंतरी! जातो कुठें?"

हे शब्द शेटजींनीं उच्चारायला व बंगल्यांत पाऊल ठेवल्यापासून अगदीं पहिल्याप्रथम प्रेमकुंवरबाईंनीं वर मान करून माझा चेहरा क्षणभर निरखून पहायला, एक गांठ झाली. माझ्या प्रश्नाचें उत्तर दोघांपैकीं एकाकडूनहि येईना, ह्मणून मीहि त्यांचेकडे बारीक नजरेनें पहातच होतों. प्रेमकुंवरबाईंची व माझी दृष्टादृष्ट होतांच माझ्या मनांतील तर्काला पुष्टी आली व मी कदाचित् पोलीसच्या नात्यानें त्यांच्या भावाबद्दल चौकशी सुरू करीन अशा समजानें भीतीनें त्यांची अशी अवस्था झाली असावी असें माझ्या मनानें घेऊन मला त्यांची फार दया आली. यामुळें त्यांनां धीर यावा ह्मणून मीं ह्मटलें "कुंवरबाई, माझ्याबद्दल सुद्धां तुमच्या मनांत कुतर्क दिसतो, अं? कांहीं झालें तरी तुमच्या खुशालवर माझा हात कसा वाहील? पण आज त्यानें घरांतच हात मारला आहे; परंतु समजा, उद्यां जर बाहेर कुठें असेच गुण पाघळले, तर मग कसें बरें होईल? त्याचा आजच नको का कांहीं बंदोबस्त करून टाकायला? मला जर तुह्मी

आपल्या कुटुंबापैकीं एक समजत नाहीं, तर मला आतां बोलावलाततरी कशाला? शेटजींनीं काल संध्याकाळपासून माझी वाटतरी कशाला पाहिली? इतक्या दिवसांच्या परिचयावरून माझा इतकासुद्धां विश्वास नाहींना तुह्मांला?"

हे शेवटचे शब्द मी जरा रागानें व त्रासानेंच बोललों. माझें बोलणें ऐकतांच प्रेमकुंवरबाईच्या डोळ्यांतून घळकन् पाण्याचे थेंब गादीवर पडले, ते पाहून मलाहि माझ्या बोलण्याचा पश्चात्ताप झाला. इतक्यांत शेटजी ह्मणाले "हें पहा मोरोपंत, तुह्मी आजपर्यंत सांगत आलांत त्याप्रमाणें आह्मींच जर मूळापासून त्या पोरावर चांगली नजर ठेविली असती, तर आज अशी वेळ कशाला आली असती? आजपर्यंत कांहीं नाहीं तरी या पोराकरितां पांचदहा हजारांचे खळग्यांत मी आलेलों आहें. आज माझे खुशालला अमकेंच हवें, तमकेंच हवें, असें करतांकरतां त्याचेकरितां निराळी गाडी, दोन घोडे वगैरे सर्व कांहीं त्याची व्यवस्था आहे. रोकड पैसासुद्धां कधीं पन्नास, कधीं शंभर अशी त्यानें धुपणी लाविलीच होती. मीं कधीं देत नाहीं ह्मटलें मग हिच्यामागें त्रास. रडूनभांडून पैसे उपटायचा. मीतरी हिच्याकडे पाहून कानाडोळाच करित असें. वाटे कीं, जाऊंद्या, मलातरी आतां हिच्याशिवाय दुसरें कोण आहे? काल हें पत्र पाहिल्याबरोबर त्या रागाच्या सपाट्यांत ताबडतोब पोलिसांत खबर देणार होतों; परंतु तितक्यांत तुमची आठवण झाली. बरी मला त्यावेळीं बुद्धि झाली, नाहीं तर आतां इथें पोलिसाचा धिंगाणा सुरु होता, आणि मला हिचें हें दुःख पहावतें ना. आतां याचा अंतस्थ सुगावा लावा, आणि मग आपण त्या पोराची कांहींतरी व्यवस्था करूं."

शेटजींचें हें बोलणें ऐकल्यावर प्रेमकुंवरबाईनीं एक लांबचलाव सुस्कारा टाकला. पण चमत्कार हा कीं, त्या मजकडे वर मान करून नुसत्या पाहीनात; भावाच्या दुर्वतनानें त्यांनां दुःख झालें असेल असें वाटून मींहि त्यांच्या त्या वेळच्या वागणुकीकडे फारशी नजर दिली नाहीं.

आमच्या मुंबईत दोन प्रकारचे पोलीस असतात, हें सर्वांस माहित आहेच. आह्मी काळे कपडेवाले प्रसिद्ध पोलीस व दुसरे सफेत कपडेवाले गुप्तपोलीस किंवा डिटेक्टिव्ह. एकाच सरकारच्या हाताखालीं आमची चाकरी, पण आमचा आपापसांत मत्सर फार. जो गुन्हा आह्मांला सांपडत नाहीं, ज्यांत गुन्हेगाराच्या शिताफीपुढें आह्मांला हात टेकावे लागतात, असे सर्व गुन्हे गुप्तपोलीसाकडे जाऊन मग त्यांनीं त्यांत आपलें कसब लढवावयाचें, असा आमचा सर्वांचा समज. तेव्हां, एखादा गुन्हा आह्मांला न सांपडून त्यांनीं त्याचा शोध लाविला, ह्मणजे

आमचें नाक खालीं झालें. या गोष्टी तुह्मांला बाहेर कळत नसतात, ती आपली आमची एक 'अंदरकी बात' असते; तेव्हां जगजीवनशेटजींनीं अद्याप पोलिसांत खबर दिली नाहीं असें पाहून आपण एकटे या गुन्ह्याचा तपास लावणार, अशी मींतर मोठ्या हिंमतीनें कंबर बांधलीच. दुसरें, शेटजींच्या तर्काप्रमाणें चेक वटविणारा खरोखरच जर खुशाल असेल, तर ती गोष्ट षट्कर्णी होणें कोणालाहि इष्ट नव्हतें. तेव्हां त्याबद्दलचा तपास अर्थातच माझेशिवाय दुसरे कोणीं करून चाललाच नसता. मीं तें काम मोठ्या आनंदानें पत्करिलें, हें सांगावयास नकोच. मीं शेटजींला विचारलें "खुशाल आतां आहेतरी कुठें ?"

"काल रात्रीं जेवून बाहेर पडला आहे तो अद्याप आलाच नाहीं."

"बरें, तुह्मीं त्याला याबद्दल विचारलेंत तरी का ? "

"मीं नाहीं विचारलें. हिलाच सांगितलें होतें विचारण्याला; परंतु त्यानें सर्व गोष्ट नाकबूल केली, असें हिनें मला सांगितलें."

"तें चेकबूक आतां कुठें आहे ? "

शेटजींनीं बैठकीखालीं हात घालून तेथून बूक काढून तें माझ्या अंगावर टाकलें. मीं तें उघडून पाहिलें तो ब्यांकेच्या पत्राप्रमाणें त्यांत त्या नंबरचा चेक खरोखरच नव्हता.

त्यानंतर पुढें काय करावयाचें, याबद्दल शेटजींचें व माझें बराच वेळ बोलणें झालें. माझें व शेटजींचें बोलणें चाललें असतां फक्त दोन वेळां प्रेमकुंवरबाई थोडा वेळपर्यंत तेथून उठून गेल्या होत्या. एकदा खालीं चहा आणण्याकरितां व एकदा खोलींतून पानसुपारीचें ताट आणण्याकरितां. मी तेथून उठून जाईपर्यंत बाकी सर्व वेळ त्या आमचेजवळ आमच्या गोष्टी ऐकत बसल्या होत्या. पण नवल हें कीं, इतक्या वेळांत त्यांनीं तोंडांतून एक अक्षरसुद्धां काढलें नाहीं!

[ २ ]

दुपारीं बारा वाजतां मी व जगजीवनशेट असे उभयतां मिळून ब्यांकेचे ऑफिसांत गेलों व मॅनेजरसाहेबांस भेटून तो रद्द झालेला चेक शेटजींनीं पाहिला व त्यावरील सही पाहून तेहि जरा चपापले. सहीतर हुबेहुब त्यांच्या सहीसारखी दिसत होती. फक्त अक्षर जरा कांपतकांपत काढल्याप्रमाणें दिसलें. नंतर आह्मी चेक स्वीकारणाऱ्या कारकुनाजवळ गेलों. शेटजींची व त्याची ओळख होतीच. शेटजींनीं त्यास नमस्कार करून "या गृहस्थांस कांहीं माहिती पाहिजे आहे, ती मेहेरबानी करून द्या," असें माझेकडे बोट दाखवून त्याला सांगितलें

व ते आपल्या पेढीवर चालते झाले. मी पोलीसच्या पेहरावानें गेलों नव्हतों, सबब त्या कारकुनाच्या प्रश्नावरून मी शेटजींचा एक दोस्त आहें व चेकसंबंधानें कांहीं भानगड झाली आहे ह्मणून मला थोडी माहिती पाहिजे आहे, असें त्यास सांगितल्यानंतर त्याचें व माझें बोलणें सुरु झालें. मीं त्याला विचारिलें "जगजीवन शेटजींचा चेक तारीख १६ रोजीं ज्यानें तुमचेकडे हजर केला तो मनुष्य तुह्मांला आठवतो का ? "

हातांतील पेनाचा बुंधा कपाळावर टेकून शून्य दृष्टीनें क्षणभर विचार केल्यासारखें करून त्यानें उत्तर दिलें "आठवण? होय, कांहीं आहे आठवण. तो इसम वयानें अगदीं तरुण, अंगानें सडपातळ व मोठा देखणा होता. मिशी वगैरे कांहीं फुटलेली नव्हतीसें आठवतें. मुख्य आठवण राहिली ती त्याच्या हाताची. त्यानें जेव्हां माझ्या हातांत चेक दिला, त्यावेळीं त्याचा उजवा हात माझ्या चांगला नजरेस पडला. तो किती गोरा, नाजुक व गोंडस होता ह्मणून सांगूं ! अगदीं थेट एखाद्या सुंदर बायकोच्या हातासारखा ! बाकी, चेहेऱ्याचें मीं वर वर्णन केलें आहे खरें, पण या मधल्या जाळीमुळें त्याबद्दलची मला पक्की खात्री नाहीं."

"बरें, त्याचा पेहेराव कसा काय होता? "

"त्याची कांहीं फारशी आठवण नाहीं. पण गुजराथी जातीचा, मोठा टापटिपीचा साधा पेहेराव असावा."

"दुसरें कांहीं स्मरण आहे कीं नाहीं ? त्या इसमास ओळखण्यासारखी कांहीं एखादी खूण आठवते का तुह्मांला ? "

"दुसरें नाहीं कांहीं आठवत !"

"बरें आहे," असें ह्मणून मीं त्यास नमस्कार करून तेथून निघालों. परत येत असतां रस्त्यांत सहज खुशाल भेटला, त्यास मीं आपले गाडींत घेऊन आह्मी दोघेहि गोष्टी बोलतबोलत आमच्या चौकीपर्यंत आलों. रस्त्यांत त्याचें व माझें बरेंच बोलणें झालें, तें येथें सविस्तर सांगण्याची जरूरी नाहीं. फक्त त्यावरून माझी खात्री झाली कीं, या कामांत खुशालचा कांहीं हात नसावा. शिवाय, त्यांत एक मोठी आश्चर्यकारक गोष्ट मला कळली ती ही कीं, कुंवरबाईनीं खुशालास त्या चेकासंबंधानें कांहींसुद्धां विचारलें नव्हतें.

[ ३ ]

शेटजींच्या दिवाणखान्यांत मध्यभागीं एक मोठें वाटोळें मेज ठेवलेलें होतें व त्याच्यावर चिनीमातीच्या भांड्यांत फुलांचे गुच्छ ठेवलेले असून त्याशिवाय गुजराथी व मराठी वर्तमानपत्रें वगैरे पडलेलीं होतीं. मेजासभोंवार तीन खुर्च्या ठेविल्या होत्या व मध्यभागीं एक दिवा टांगलेला होता. त्या रात्रीं मीं जेवणखाण आटोपून बंगल्यांत गेलों. आंत गेलों तों शेटजी गादीवर सकाळप्रमाणें पडलेले होते, व प्रेमकुंवरबाई मेजाजवळील एका खुर्चीवर बसून हातानें कांहीं लोंकरीचें वीणकाम करण्यांत अगदीं गढून गेलेल्या दिसत होत्या. मी आंत शिरून दरवाजा पुन्हा लोटून घेतला व शेटजींचे बाजूला गादीवर जाऊन बसलों. आह्मी बसलें होतों ती गादी प्रेमकुंवरबाईच्या खुर्चीच्या पाठीमागें असल्या कारणानें आमचेवर अर्धवट अंधार पडला होता. मी तेथें जाऊन बसल्याबरोबर शेटजींनीं "कसेंकाय मोरोपंत, कांहीं लागला का सुगावा ?" असा प्रश्न केला.

पानसुपारीचें ताट पुढें ओढितओढित "नाहीं, चालू आहे अजून तपास," असा जरा लांब स्वरानें मीं जबाब दिला व पान खाण्यास सुरुवात केली. प्रेमकुंवर-बाईच्या चेहेऱ्यावर दिव्याचा प्रकाश चांगला पडला असल्याकारणानें माझी नजर पान खातांखातां त्यांच्या चेहेऱ्याकडे गेली, तों आतांपर्यंत इतक्या घाईनें चाल-लेलें काम जरा मंदावून त्यांचें लक्ष्य आपले हातांकडे नसून डोळ्यांचे कोपऱ्यांतून त्या मजकडे मधूनमधून पहात आहेत, असें माझ्या नजरेस आलें. बनावट चेका-संबंधानें माझें अद्याप ठाम मत कांहींच झालें नव्हतें. फक्त दुपारपासून माझ्या तपासांत ऐकलेल्या गोष्टींवरून मी कांहीं तर्क बांधित होतों. दिव्याच्या पूर्ण प्रकाशांत कुंवराबाईचा तो तेजःपुंज चेहेरा, एखाद्या भ्यालेल्या हरिणीप्रमाणें त्यांची वारंवार मजकडे नजर फेंकण्याची तऱ्हा वगैरे प्रकार पाहून माझ्या मनांत एकदम एक चमत्कारिक कल्पना आली, व त्या कल्पनेंत गढून गेल्यामुळें माझें हातांतील पान हातांतच राहून मी त्यांच्या चेहेऱ्याकडे एकसारखा टक लावून विचार करित क्षणमात्र बसलों.

मी कांहीं बोलत नाहीं असें पाहून शेटजी बसले राहिले व ह्मणाले "मग काय, आमचा पोराबद्दलचा तर्क खरा, कीं दुसऱ्या एखाद्या चाकर माणसाचें हे काम आहे ? मी सांगतों मोरोपंत, माझी जरा या चेक बुकासंबंधानें ढिलाईच झालेली आहे. त्यांतून माझ्या नोकरांपैकीं दोघां इसमांस चांगलें लिहितांवाचतां येत असून

माझी सही त्यांचे चांगली ओळखीची आहे. हें चेकबूक इथें वाऱ्यावरच पडलेलें असतें, तेव्हां त्यांनीं कधीं संधी साधिली असेल."

आतां मीं जरा सावधपणानें विचार करितकरित उत्तर दिलें "शेटसाहेब, यासंबंधीं माझा जो कांहीं तर्क चालतो, त्यावरून हें काम चाकरमाणसाचें असेल, अशी माझी मनोदेवता मला सांगत नाहीं."

हें वाक्य बोलतांना माझी दृष्टी सारखी प्रेमकुंवरबाईच्या चेहेऱ्याकडे होती. माझा जबाब ऐकून त्यांचा चेहेरा थोडा फिक्का पडला, असा मला भास झाला. माझें लक्ष्य त्यांच्याकडे नसून मी फक्त पान खाण्यांतच गुंतून गेलों आहें, असें बाहेरून दाखवित, या चेकबुकासंबंधानें व इतर दागदागिन्यांसंबंधानें आपल्या व आपल्या बायकोच्या निष्काळजीपणाबद्दल शेटजींचें जें गुऱ्हाळ चाललें होतें त्यांस हुंकार देत, मीं आपलें पान खाण्याचें काम चालविलें होतें.

शेटजींचें बोलणें पुरें झाल्यावर मीं अगदीं शांतपणें त्यांनां सांगितलें "शेटजी, तुमचें बोलणें मीं सर्व ऐकलें; परंतु मीं आपलें मत तुह्मांला अद्याप सांगितलें नाहीं; मी ब्यांकमध्यें [illegible] गेलों असतां मला तेथें कांहीं सुगावा लागला आहे."

यावेळीं प्रेमकुंवरबाईच्या चेहेऱ्यावर काहीं फिक्केपणा आला आहे असें मला वाटलें, व त्यांच्या हातांतील सुया खोळंबून माझ्याकडे त्या चोरून पहात आहेत, असें दिसलें. माझा संशय बळावत चालला; परंतु अद्याप मनाचा पक्का निश्चय ठरेना.

माझें बोलणें शेटजींस स्पष्ट समजावें या बहाण्यानें मीं एकेक शब्द सावकाशपणें उच्चारित ह्मटलें "ब्यांकेंतील कारकुनानें मला सांगितलें कीं, तो चेक एका मुलानें हजर केला. तो मुलगा अंगानें सडपातळ व रंगानें गोरा होता. त्याचा पोषाखहि नीटनेटका होता—"

प्रेमकुंवरबाईच्या चेहेऱ्यावरील फिकटपणा नाहींसा होऊन त्याच्यावर स्वाभाविक तजेला आला व त्यांच्या गालांतल्यागालांत हंसण्यानें त्यांचे ते पोंवळ्यासारखे लाल ओंठ रुंदावून त्यांनीं एकवार मोठ्या गर्विष्ठपणानें व तुच्छकारकमुद्रेनें माझेकडे नजर फेंकिली, असा मला भास झाला.

मी पुढें ह्मणालों "त्या कारकुनानें दुसरें असें सांगितलें कीं, त्या मुलाचे हात फारच नाजूक, गोरे, जणूंकाय एखाद्या सुंदर स्त्रीच्या हातासारखे गोंडस असे होते—"

मला असा भास झाला कीं, प्रेमकुंवरबाईनीं यावेळीं आपल्या हातांकडे पाहिलें; परंतु कदाचित् ही माझी कल्पनाहि असेल! इतक्यांत शेटजी ह्मणाले "मोरोपंत, ही तुमची सर्व कथा ऐकिली; पण यापासून तुमच्या कामाला काय उपयोग होणार?"

" कां, कांहीं उपयोग नाहीं ?"

" अगदीं कांहीं नाहीं !"

मी आतांपर्यंत माझी सर्व आशा ज्या दानावर ठेविली होती त्यासाठीं आतां फांसा टाकावयाचा असा मनाशीं बेत करून ह्मणालों "माझें ऐकातर खरें! ज्यानें तो चेक वटविण्याकरितां हजर केला त्याची एक विशेष खोड त्या कारकुनाच्या पूर्ण लक्ष्यांत राहिली होती ती त्यानें मला सांगितली. आणि ती खोड—खोड कसली, व्यंगच ह्मणायचें तें—तो इसम फारच तिरवा होता—"

"खोटें, अगदीं निव्वळ खोटें !" असे रागाचे शब्द एकदम आमचे कानीं आले.

हे वरील शब्द आमच्या कानीं पडावयाला व प्रेमकुंवरबाईच्या खुर्चीचें तोंड आमचेकडे फिरून आणि ती खुर्ची दाणकन् आपटून त्या आमच्यासमोर उभ्या रहावयाला, एकच गांठ पडली. त्यांच्या त्या वेळच्या स्थितीचें काय वर्णन करावें! रागानें डोळे लाल झालेले, गालांवर त्याच रंगाची छटा मारलेली, ओंठ कांपत असलेले, दोन्ही हाताच्या मुठी आंवळून त्या रागानें उगारलेल्या, अशा, एखाद्या क्रुद्ध झालेल्या नागिणीप्रमाणें फणाणत त्या आमचेसमोर जेव्हां मोठ्या ऐटीनें उभ्या राहिल्या, त्यावेळीं, त्या एखाद्या चित्रांतील सुंदर पण रागावलेल्या देवतेसारख्या दिसूं लागल्या.

प्रेमकुंवरबाई आमचेसमोर रागानें उभ्या राहिल्याबरोबर आह्मी दोघेहि एकदम दचकल्यासारखे झालों व माझी गोळी लागू पडलेली पाहून मला त्यांतलेत्यांत आनंद होऊन हंसूं आलें. दहापंधरा सेकंदपर्यंत अशी स्थिति झाली; परंतु लागलीच शेटजी गादीवर बसले राहून आश्चर्यकारक मुद्रेनें पत्नीला विचारतात "अं, हें काय! तुला कायग त्याची माहीत ?"

शेटजींनीं असा प्रश्न विचारतांच प्रेमकुंवरबाई झोंपेंतून जाग्या झाल्यासारख्या होऊन शुद्धीवर आल्या. त्यांच्या अंगांतील वारें नाहींसें झालें व सौंदर्याच्या गर्वानें आपण फसलों, असें त्यांला वाटलें. आतां काय उत्तर द्यावें हें न सुचून त्या अगदीं बावरल्यासारख्या गोंधळून गेल्या व माझेकडे एकवार रागानें पाहून कांपतकांपत ह्मणाल्या " कांहीं नाहीं, कांहीं नाहीं. मीं हें सहज थट्टेनं म्हणाल्यें."

शेटजी ताडकन् गादीवरून उठले व दुसऱ्या एका खुर्चीवर जाऊन बसून मेजावर हात आपटून रागानें ह्मणाले " तें कांहीं नाहीं! तूं खोटें बोलतेस! यासंबंधानें तुला पुरी माहिती आहे, अशी माझी खात्री होते. नाहींतर मोरोपंतांच्या

बोलण्यावर इतक्या रागानें उठून बोलली नसतीस. हं, सांग खरें काय तें; खरें सांग, ह्मणजे तुझ्या हातून कांहीं जरी झालें असलें तरी मी क्षमा करीन."

शेटजींनां इतके रागावलेले पाहून प्रेमकुंवरबाई अगदीं भिऊन गेल्या व मी तेथें बसलेला आहें याचें भान न राहून त्यांनीं धावत जाऊन शेटजींचे पायांस गच्च मिठी घातली व आपल्या अश्रूंनीं त्यांचे पायांस स्नान घालून स्फुंदतस्फुंदत ह्मणाल्या "मला क्षमा करा, मी सर्व खरं सांगत्यें. मीं एकटीनंच हें सर्व कृत्य केलं."

"काय! तूं?"

"होय, मीं. आपण अमदाबादेकडे गेल्यावर त्या पोरानं तर मला कसं अगदीं भंडावून सोडलं. पहिल्या दिवशीं माझेजवळचे शंभर रुपये मीं त्याला दिले; पुन्हा दुसरे दिवशीं पुन्हा तेंच. मी त्याला कितीतरी रागावल्यें, बोलल्यें, तरी कांहीं इलाज चालेना. माझ्या पायाशीं कपाळ फोडून घेऊं लागला काय, छाती बडवूं लागला काय, अगदीं अनर्थ करून सोडला! कांहींकेल्या ह्मणून ऐकेना. आपण इथं नव्हतां, आणि असतां तरी आपणाजवळ पैसे मागण्याची माझी छातीहि झाली नसती. कारण, नुकतेच आपण अशाच कारणावरून मजवर रागं भरलां होतां, ह्मणून तीहि भीति माझे मनांत होती. शेवटींतर त्यानं अगदीं जीव देण्याची भीति मला घातली. तेव्हां ममतेमुळं मला रहावेना. उद्यां तुला कसंतरी करून पैसे देईन, असं सांगून तो दिवस मीं कसातरी घालविला. पण रोजच्याप्रमाणं तो त्या रात्रीं जेवण्याससुद्धां आला नाहीं, तेव्हां मी फार घाबरल्यें. त्या भीतीनं माझी विचारशक्ति सर्व नाहींशी झाली. रात्रभर झोंप येईना, ह्मणून दुःखानं व्याकुळ होऊन सहज खोलींत पडल्यें होत्यें, तों आपलं चेक बूक समोरच माझ्या नजरेस पडलं. आणि हेंच चेक बूक जर माझं असतं तर किती चांगलं होतं, असं मला वाटूं लागलं. मनांत कल्पना येण्याचाच अवकाश, याच बुकावर आपली सही करून पैसे आणावे असं वाटूं लागलं व चांगल्या विचारांस एकदम फांटा मिळून देवाची, आपली किंवा मनाची भीति न वाटतां, मीं आपली सही आपले कागदांतून शोधून काढून ती कांहीं वेळ गिरवून त्या चेकावर आपली सही घातली."

"ऊठ," शेटजी मध्येंच त्रासानें ह्मणाले. "माझ्या पायां नको पडूं. उठून सर्व हकीगत सांग."

त्या उठून उभ्या राहिल्या. मला तेथें थांबणें आतां कसेंसेंच वाटूं लागलें व मीहि "शेटजी, मी जरा बाहेरून जाऊन येतों," असें कांहींतरी सांगून तेथून

उठलों. प्रेमकुंवरबाईची ती दीनासारखी केंविलवाणी मुद्रा पाहून मलासुद्धां त्यांची फार कींव आली; परंतु त्या नवराबायकोंचा संवाद आपण ऐकणें हें योग्य नाहीं, असें वाटल्यामुळें मी उठून दाराशीं जाणार इतक्यांत प्रेमकुंवरबाईंनीं मला हांक मारून ह्मटलें "मोरोपंत, आजपर्यंत आपणांस मीं आपल्या बापाप्रमाणं मानिलं आहें; माझे हातून घडलेल्या अपराधाबद्दल मला पूर्ण पश्चात्ताप झाला आहे तेव्हां याबद्दल मला जें शासन इकडून व्हायचं असेल तें ऐकण्यास आपण इथं असलां तरी कांहीं हरकत नाहीं. उलट, आपण आजपर्यंत माझी कान-उघडणी करित असून मीं आपलं ऐकिलं नाहीं याची मला चांगली आठवण राहून पुन्हा असं पाप करण्यास माझं मन धजणार नाहीं."

माझी तेथें रहाण्याची इच्छा नाहीं असें माझ्या मुद्रेवरून ताडून त्या पुन्हा ह्मणाल्या "तुह्मी आतां जाणारच तर जा; परंतु जाण्यापूर्वीं मला एक शंका आली आहे तिचं निवारण करा. चेक वटविण्याकरितां गेलेला इसम अगदीं तिरवा होता, असं जें तुह्मीं धडधडित खोटं सांगितलंत, तें कां ?"

मी दारांतून मागें फिरून मेजाजवळ त्यांचे समोरचे अंगास येऊन उभा राहिलों आणि ह्मणालों "कुंवरबाई, ज्या गोष्टींबद्दल साधारण मनुष्याचे मनांत कल्पनासुद्धां येत नाहीं, त्या गोष्टी आमच्या धंद्यांत आह्मांस फार मदत करितात. मीं आतां खोटें कां सांगितलें, याची जास्त चर्चा करण्याची कांहीं जरूरी नव्हती; फक्त तुह्मी विचारतांच ह्मणून सांगतों. आज दुपारीं ब्यांकेंत जाईपर्यंत चेक बनावट केल्याबद्दल मला कोणाचाच वहीम आला नव्हता; फक्त सकाळच्या शेटजींच्या माहितीवरून खुशालचा थोडासा संशय आला होता. ब्यांकेंतील कारकुनानें चेक वटविणाऱ्या इसमाचें जें वर्णन केलें, तें खुशालशीं मुळींच जुळेना. शेवटीं त्यानें त्या इसमाच्या हाताचें वर्णन करतांना त्याचा हात एखाद्या सुंदर स्त्रीच्या हाताप्रमाणें गोंडस, नाजूक व गोरा असा होता असें जेव्हां तो सहज बोलून गेला, तेव्हां तुमची मूर्ती माझ्या डोळ्यांसमोर येऊन त्या कारकुनानें केलेलें त्या इसमाचें वर्णन व विशेषतः त्याचे हाताबद्दलचें वर्णन तुमच्याशीं यथायोग्य जुळेल, असा माझा तर्क झाला व त्याच वेळीं, तुमची खुशालवर असलेली ममता, मी तुह्मांस वारंवार सांगत असतांसुद्धां माझें न ऐकतां तुह्मीं त्या पोराचे हट्ट पुरविण्यासाठीं चालविलेला उधळेपणा, आजपर्यंत तुमचेवर कधींहि संकट आलें असतां माझेजवळ कसलाहि पडदा न ठेवितां मन मोकळें करून वागत असून आज सकाळीं तुह्मीं माझ्याशीं ठेविलेलें विचित्र वर्तन,

या चेकाबद्दल प्रसिद्धपणें शोध न चालवितां अंतस्थ रीतीनें त्याबद्दलचा तलास लावण्याकरितां शेटजींनीं मला सकाळीं सांगितलें असतां त्या गोष्टीनें तुमचे मनास समाधान न वाटून तुह्मीं लांबचलांब सोडिलेला सुस्कारा, या सर्व गोष्टींचें मला एकदम स्मरण झालें, व तुह्मीं पुरुषवेष घेतल्यास त्या कारकुनाचें वर्णन तुमच्या स्वरूपाशीं तंतोतंत जुळेल, अशी माझी खात्री झाली; परंतु ही फक्त माझ्या मनाची कल्पना असल्याकारणानें, खरी गोष्ट कशी उघडकीस येते याच्या मी मोठ्या काळजींत होतों. दुपारीं घडलेली सर्व हकीगत शेटजींनां आतां सांगत असतां माझी हकीगत ऐकतेवेळीं तुमच्या मनाची चाललेली चलबिचल मीं ताबडतोब ताडली, व स्त्रीजातीस अनुरूप असा जो तुमच्या सौंदर्याचा तुह्मांला अभिमान आहे त्याला जर थोडेंसें डंवचिलें तर तुह्मांला घडलेल्या गोष्टीचें भान न राहून खरी गोष्ट तुमचे तोंडांतून पटकन् बाहेर येईल असें मला वाटलें. माझी कल्पना खरी ठरली, हें आतां घडलेल्या गोष्टीनें सिद्ध झालेंच आहे व आणखी त्याच्यायोगानें दुसरीहि एक गोष्ट प्रत्ययास आली."

यावर प्रेमकुंवरबाईंनीं [illegible] उत्सुकतेनें विचारिलें "आणि ती कोणती?"

मीं जरा तीव्र विनोदाच्या लहरींत येऊन ह्मटलें:—

"उत्कर्षानें अन्य विकारां दडपुनियां, स्वस्थान
वसवी स्त्रीजनवृत्तीमाजीं रूपसंपदभिमान !

भलीं धूर्तता, भलें कपटही जरी मानसीं जागे,
तरीहि त्यांचा स्वरूपगर्वापुढें टिकाव न लागे !"

## गोष्ट २९ वी.

## सती डांगा.

विष्णुपुरचा मल्लवंशीय राजा दुर्जनसिंह याचा रघुनाथसिंह हा ज्येष्ठ पुत्र होता. राजा दुर्जनसिंहाच्या मृत्यूनंतर इसवी सन १७०२ या वर्षी रघुनाथसिंह गादीवर आला. अगदीं लहान वयांत एवढ्या मोठ्या ऐश्वर्याचा मालक झाला असतांहि, आणि एका अवाढव्य राज्याचीं सर्व सूत्रें एकट्याच्या हातीं आलीं असतांहि त्याला लहानपणींच पित्याकडून योग्य शिक्षण मिळाल्यामुळें तो मितव्ययी, क्षमाशील, नम्र आणि अत्यंत धर्मशील असा होता. आणि या सद्गुणांबरोबरच त्याच्या अंगच्या पराक्रमानें आणि रणनैपुण्यानें अगदीं अल्प काळांतच चोहोंकडे त्याचें नांव गाजलें होतें. गादीवर आल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यानें एकाएकीं मेदिनीपूर जिल्ह्यांतील चेतो या नांवाच्या किल्ल्याला वेढा घातला. चेतोचा राजा सभासिंह आणि त्याचा रणधुरंधर सेनापती उस्मानखां, हे दोघेहि रघुनाथसिंहाबरोबर तीन दिवसपर्यंत फार शौर्यानें व धैर्यानें सारखे लढत होते. परंतु अखेरीस बिचारे पराभव पावून धारातीर्थी पतन पावले.

राजा सभासिंहास एकहि पुत्रसंतान नव्हतें. परंतु त्याला चंद्रावती या नांवाची एक अत्यंत सद्गुणी आणि सुंदर कन्या होती. चंद्रावतीच्या बाळपणांतच तिची आई निवर्तली. त्यावेळीं सभासिंहाचें कांहीं अधिक वय झालें नव्हतें. पुनर्लग्न करून घेण्यास अद्याप त्याला कसलीच हरकत नव्हती. परंतु त्यानें तसें केलें नाहीं. चंद्रावती हीच आतां त्याच्या सर्व सुखांचें व आशांचें केंद्रस्थान होऊन बसली होती. त्यानें तिचें अत्यंत प्रेमानें व आस्थेनें लालनपालन करून राजकुमारीस योग्य असें शिक्षण तिला दिलें होतें. आपला पिता आणि सेनापती उस्मानखां रणांत पडल्याची बातमी तिच्या कानीं पडतांच, एखाद्या भित्र्या भागुबाईसारखें पितृवध करणाऱ्या आपल्या शत्रूस शरण न जातां वीरकन्येप्रमाणें त्याच्याशीं दोन हात करून पित्यामागोमागच आपणहि स्वर्गी जावें, असा तिनें कृतसंकल्प केला. परंतु आप्तगोत, इष्टमित्र इत्यादिकांच्या अत्याग्रहामुळें तिला आपला विचार बदलावा लागला. चंद्रावतीचें अजूनपर्यंत लग्न झालें नव्हतें. आपल्या मनाप्रमाणें उत्तम सद्गुणी सुपात्र जांवई न मिळाल्यामुळें सभासिंहानें अद्याप तिला लग्नावांचून ठेविलें होतें.

सभासिंहानें रणांगणांत देह ठेवल्यावर राजा रघुनाथसिंहाचा मार्ग अगदीं निष्कंटक झाला. त्यानें सभासिंहाच्या विशालाक्षी नांवाच्या कुलदेवीची दशभुजा

सुवर्णमूर्ति, कित्येक मोठमोठ्या पितळेच्या तोफा, राजकुमारी चंद्रावती व मृत सेनापति उस्मानखां याची अल्पवयस्का पत्नी लालबाई या सर्वांना आपल्याबरोबर घेऊन तो विष्णुपुरास परत गेला. विष्णुपुरास आल्यावर त्यानें फार समारंभानें चंद्रावतीचें पाणिग्रहण केलें. पित्याच्या दुःसह कोपानलानें चंद्रावतीचें सुकोमल हृदय अद्यापपावेतों तुषाग्निप्रमाणें धगधग जळत होतें; परंतु मनाजोगता नवरा मिळाल्यामुळें लवकरच त्याच्या प्रेमपूर्ण स्नेहवारीचें सिंचन झाल्यावर तो शोकाग्नि पार विझून जाईल असें तिला वाटत होतें. परंतु तसेंतर झालें नाहींच; उलट पतीच्या विरागरूपी प्रबळ अनिलद्वारें तो शोकाग्नि दिवसेंदिवस अधिकाधिकच पेट घेऊं लागला. रघुनाथसिंह चंद्रावतीवर मुळींच प्रेम करित नव्हता. त्यानें तिला कधींहि सप्रेम दृष्टीनें पाहिलें नाहीं. तो तिजबरोबर कधींहि गोड शब्द बोलला नाहीं. कालक्रमानें जेव्हां त्याचें पुण्यबळ संपत आलें, तेव्हां त्याला त्याचे एकएक सद्गुण सोडून जाऊं लागले. चंद्रावती जरी अलौकिक रूपलावण्यसंपन्न आणि अत्यंत पतिपरायण होती, तरी लालबाईच्या सौंदर्यानें आणि कृत्रिम अनुरागानें राजा अगदीं उल्लू बनून चंद्रावतीस अजीबात विसरून गेला. विष्णुपुरच्या किल्ल्याच्या पूर्वोत्तर कोनांत रघुनाथसिंहानें लालबाईकरितां एक अत्युत्तम सुंदर आणि भव्य असा वाडा बांधविला. त्याच्या सभोंवतीं त्यानें एक फारच सुंदर, रमणीय आणि मनोहर बाग करविला. या नवीन वाड्यांतच लालबाईच्या सुखसहवासांत आणि ऐषआरामांत आपल्या आयुष्याचे दिवस घालविण्याचा त्याचा क्रम कित्येक दिवसांपासून चालला होता. जेवावयास मात्र कायतो चंद्रावतीच्या महालांत तो जातयेत असे. परंतु त्यावेळींदेखील चंद्रावतीस त्याच्यासमोर येण्याची सक्त मनाई होती. असें असल्यामुळें अगदीं अल्पकाळांतच त्याची अपकीर्ति वणव्याप्रमाणें चोहोंकडे पसरली. परंतु तो अत्यंत दुर्दांत आणि प्रबल प्रतापी असल्यामुळें त्याच्या या निंद्य वर्तनाचा उघडउघड निषेध करून व दोन शब्द सांगून त्यास ताळ्यावर आणण्यास प्रत्यक्ष त्याच्या नातलगांची अथवा इष्टमित्रांचीहि छाती होत नव्हती. त्याच्या या स्वेच्छ, अविचारी आणि धर्मनिषिद्ध वर्तनास कोणाकडूनहि आळा न मिळाल्याकारणानें तो दिवसानुदिवस अधिकच खालीं वहावत चालला. लालबाईविषयींची त्याची प्रीति उत्तरोत्तर अधिकाधिक वाढत जाऊन शेवटींतर तो पुरतेपणीं तिच्या हातांतलें बाहुलें बनून गेला. तिच्यापायीं सर्व तनमनधन अर्पून व स्वकर्तव्यपराङ्मुख होऊन तो या नव्या महालांतच कालक्रमणा करूं लागला.

या अवकाशांत लालबाईला दोन पुत्र झाले. ते जसजसे मोठे होऊं लागले, तसतशी लालबाईची उच्च आशालताहि शाखाप्रशाखांनीं विस्तार पावूं लागली. चंद्रावतीस हा वेळपावेतों एकहि मूलबाळ झालें नव्हतें; आणि पुढेंहि पण होण्याची आशा नव्हती. अर्थात्, राजा रघुनाथसिंहाच्या मृत्यूनंतर आपलेच पुत्र गादीचे वारस होणार, असें लालबाईस वाटत असे; परंतु तितक्यांतच आपल्या पुत्रांखेरीज आणखी दुसरा कोणी गादीचा हक्क सांगावयास पुढें येणार तर नाहींना, अशी तिला भीति पडली. ही चिंता तिच्या मनांत उद्भवल्या दिवसापासून ती अगदीं अस्वस्थ झाली होती. आपण राजमाता कशा होऊं? राजा रघुनाथसिंह वैष्णव–कुलोत्पन्न असल्यामुळें हिंदुधर्माचा; त्याचे आत्मीय स्वजन आणि प्रजागण हेहि वैष्णवधर्माभिमानी; आणि इकडे आपण तर यवन आणि आपले पुत्रहि अर्थात् यवन. मग आपल्या मनाप्रमाणें कसें घडून यावें? वैष्णवधर्मावलंबी कुटुंबगण आणि प्रजाजन एखाद्या यवनास आपला राजा करतील, ही अगदींच असंभवनीय गोष्ट होय. याकरितां राजा जिवंत असतांच त्याचेकडून या गोष्टीचा पूर्णपणें बंदोबस्त करून घेतल्यास पुढें कांहीं अडचण होणार नाहीं, असा विचार करून एके दिवशीं तिनें फूलजान नांवाच्या प्रिय सहचरीस आपला मनोभाव व्यक्त करून दाखविला. लालबाईपेक्षां फूलजानची बुद्धि अधिक प्रखर होती. फूलजानीलासुद्धां आजचा विषय विशेष महत्वाचा आणि जरा कठिणहि वाटला. दोघींनीं अनेक वेळपर्यंत बराच तर्कवितर्क केला, व शेवटीं ही गोष्ट राजाच्या कानांवर घालून आपलें इच्छित कार्य करण्यास त्यास हरप्रकारें प्रवृत्त करावें, असें ठरविलें.

एके दिवशीं राजा प्रेमभरांत येऊन लालबाईशीं थट्टाविनोद करित बसला होता. इतक्यांत लालबाईच्या एका मुलानें येऊन राजाच्या गळ्यास मिठी मारिली. आपल्या प्रियतमेसह प्रेमालाप करित असतां त्यांत त्या पोरानें विघ्न उत्पन्न केलेलें पाहून राजानें त्यास किंचित् तिरसटपणानें एकीकडे सारलें. कित्येक दिवसांपासून लालबाई राजावर कांहींतरी दोषारोप करतां येण्याचें कारण हुडकित होतीच. आज तिला उत्तम संधि मिळाली. तिनें राजावर खूप रागावल्याचा खोटा आविर्भाव करून मुलाला कडेवर घेऊन तेथून निघून जाण्याची बतावणी केली. राजास लालबाईच्या रागाचें कारण कळून येण्यास कांहीं फारसा उशीर लागला नाहीं. तो अत्यंत काकुळतीस येऊन तिची परोपरीची विनवणी करूं लागला. परंतु त्यामुळें लालबाईच्या कोपाचें किंवा अभिमानाचें यत्किंचित्हि शांतवन

झालें नाहीं. उलट तिचा क्रोध द्विगुणित झाला. ती भयंकर गर्जना करून ह्मणाली "महाराज, हाच पुत्र जर त्या आपल्या लाडक्या पट्टराणीच्या पोटीं आला असता, तर आपण असं निष्ठुर वर्तन कधींहि केलं नसतं. तो माझा पुत्र असल्या-मुळंच आज आपण असे कठोरहृदयी बनलां!"

लालबाईचे असे नानातऱ्हेचे वाक्प्रलाप ऐकून राजा अत्यंत विषण्ण झाला. त्यानें तिची अनेक प्रकारें क्षमा मागितली. परंतु लालबाईच्या क्रोधाची शांति ह्मणून कशानेंहि झाली नाहीं. तेव्हां तो हळूच पलंगावरून उठला. त्यानें लाल-बाईचें सुकोमल करयुगल आपल्या वक्षःस्थळावर ठेवून व केंविलवाण्या दृष्टीनें तिजकडे पाहून तो ह्मणाला "प्यारी, माझा अपराध झाला असल्यास क्षमा कर. मीं त्याला सहजींच दूर केलें. जाणूनबुजून मीं हें केलें नाहीं. तूंच पहा, जो तुझा मुलगा तो माझा नाहीं काय? अगदीं क्षुल्लक कारणावरून माझें प्रेम त्याजवर नाहीं असें तूं समजतेस ही तुझी चूक आहे. तुझ्या मनांत अद्यापिहि माझ्या प्रेमाविषयीं संशय असेल तर मला काय पाहिजे तें करावयास सांग. हं, चल बोल; उशीर लावूं नकोस. आत्तांच्या आत्तां करून टाकतों."

"महाराज," लालबाई ह्मणाली "या आपल्या सर्व तोंडादेखतच्या गोष्टी आहेत. मी कांहीं बोळ्यानं दूध पीत नाहीं बरं. मीं कांहींहि केलं तरी पट्टराणीची व माझी बरोबरी मुळींच होणार नाहीं. तिच्या इतकं मजवर आपलं प्रेम कधींहि बसणार नाहीं, हें मला पुरतेपणीं कळतं. आपण वैष्णवकुळांत जन्म घेतलेला आणि आपली पट्टराणीहि वैष्णवी. इकडे मी तर यवनी व माझे पुत्रहि पण यवनच. तेव्हां आपल्या विचारें मी अगदीं अपवित्र व भ्रष्ट आहें."

राजा हतबुद्ध झाला. लालबाईच्या मनांत आज कांहींतरी डाव साधावयाचा आहे, आणि हा वेळपर्यंत केलेलें भाषण फक्त त्या हेतूची प्रस्तावना आहे, असें तो समजून चुकला. तो ह्मणाला "प्यारी, आज हें भलतेंसलतेंच काय बोलतेस? तुला यवनी समजून मीं कधींतरी तुझा तिरस्कार केला आहे? तुझ्याकरितां मीं राज्यावर, प्रजेवर, स्त्रीवर इतकेंच काय परंतु कुलधर्मावरहि पाणी सोडलें. तरी पण तुझी कुरकुर आहेच? तुझ्या मनांत काय आहे तेंतरी सांगशील कीं नाहीं?"

लालबाईनें विचार केला कीं, पुष्पाचें आतां अधिक मर्दन करूं नये. तसें केल्यास त्यापासून दुर्गंधच बाहेर पडणार, सुगंधाची वृद्धि होणार नाहीं; याकरितां आतां जास्त वाद करण्यांत हंशील नाहीं, असा पोक्त विचार करून व राजावर एक सप्रेम कटाक्ष फेंकून ती ह्मणाली "महाराज, आपल्या कुलरीतीप्रमाणें

पाहिलं तर आपला ज्येष्ठ पुत्रच राजमुकुट धारण करण्यास सर्वस्वी अधिकारी. आपल्याला दुसऱ्या राणीपासून कांहीं पुत्रसंतान झालं नाहीं. अर्थात्, आपल्यानंतर आतां माझा मुलगाच आपले राज्याचा पूर्ण हक्कदार आहे; परंतु आपण व आपले आप्तस्वकीय सर्वच हिंदु धर्माचे. आपणासमोर माझ्या पोराचा कांहीं चांगला बंदोबस्त झाला नाहीं तर पुढं त्याची धडगत दिसत नाहीं. याकरितां जर आपलं मजवर आणि माझ्या पुत्रांवर पूर्ण प्रेम असेल, तर त्याला आपल्या देखत गादीवर बसवावं."

लालबाईचें हें विचित्र भाषण श्रवण करून राजा वज्रपात झाल्याप्रमाणें स्तंभित झाला. बराच वेळपर्यंत त्याच्या मुखांतून शब्द फुटेना. तो लालबाईचा कावा समजला. परंतु उपयोग काय? तिच्या मोहिनीमंत्रानें तर तो अगदीं मुग्ध, हतबुद्ध आणि धर्मज्ञानशून्य झाला होता. एक क्षण लालबाईविषयीं त्याचे मनांत तिरस्कार उत्पन्न झाला. परंतु क्षुद्र व चंचल जलतरंगाप्रमाणें लागलीच त्याचा लोप झाला. अशा प्रकारच्या विनंतीस नुसती अनुमति देणेंहि अत्यंत अनुचित आणि पापकर्म आहे, असें त्याला वाटलें; परंतु सध्याच्या क्रुद्ध लालबाईसमोर तसें स्पष्ट बोलून दाखविण्याइतकें त्याच्यांत मानसिक धैर्य नव्हतें. तो अत्यंत विनीतभावानें म्हणाला "प्यारी, तूं ह्मणतेस तसें करण्याला मी एका पायावर तयार आहें; परंतु हें आबालवृद्धांस नावडणारें कृत्य मी कसें करूं. तूंच पहा, माझे राज्यांत सर्व लोक झाडून वैष्णवधर्माचे आहेत. प्रातःकाळ होतांच दीडशेंपेक्षांहि अधिक इतक्या देवतादिकांची पूजा झालीच पाहिजे, असा आमचा कुलधर्म आहे. अर्थात्, अशा स्थानाचा यवन राजा करणें, ह्मणजे आह्मीं होऊनच आपलें हिंदुत्व नष्ट करून घेण्यासारखें नाहीं काय? आणखी, माझे नातलग आणि प्रजाजन हेहि कांहीं इतके नेभळे किंवा नामर्द नाहींत. ते ही गोष्ट मुकाट्यानें—त्यांच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत—कधींहि घडूं देणार नाहींत. मी असें असें करणार आहें असा जर त्यांनां नुसता संशय आला, तर ते एकदम कट करून माझ्याविरुद्ध भयंकर बंड उभारण्यासहि मागेंपुढें पहाणार नाहींत. करितां, तूं हा भलताच नाद घेऊं नकोस. आपलें दोघांचें चांगलें व्हावें अशी जर तुझी इच्छा असेल, तर हा नाद सोड. हें अविचाराचें आणि अन्यायाचें कृत्य करायास मला सांगूं नकोस. आमच्या कुलाच्या चिरसांप्रदायाप्रमाणें दुसरा कोणी राजा झाला, तरी पण तुझ्या मुलांनां कांहीं कमी पडणार नाहीं. त्यांचा मी योग्य बंदोबस्त करीन."

राजाच्या तोंडून हे असम्मतिसूचक शब्द निघाले मात्र, तोंच लालबाई क्रोधानें अत्यंत संतप्त व अंध होऊन ह्मणाली "महाराज! आपणच आत्तां ह्मणालां होतांना, कीं मजवर व माझ्या पुत्रांवर आपलं अत्यंत प्रेम आहे ह्मणून? त्या प्रेमाचं हेंच चिन्ह काय? माझे पुत्र यवन असोत कीं आणखी कोणी असोत; परंतु मी जीवंत असतां माझ्या पुत्रास दूर सारून राजा रघुनाथसिंहाच्या शिरावरील मुकुट धारण करायास पुढं कोण सरतो, तें पहात्यें! जो राजा स्वताच्या राज्यांतील लोकांनां ताब्यांत ठेवण्यास असमर्थ, त्यानं राज्यतरी कां करावं? हें वीरपुरुषाचं काम नाहीं. भीरु मनुष्याचं अथवा तस्कराचंच हें काम होय. मला हा वेळपर्यंत वाटत होतं कीं, राजा रघुनाथसिंह हा खरोखरच 'सिंह' या पदवीस अगदीं योग्य आणि वीरपुरुष आहे; परंतु आतां भ्रमाचा भोपळा फुटला. खरं खरं काय आहे तें आतां मला पक्कं समजून चुकलं आहे. केवळ राजकुळांत जन्म पावल्यामुळंच आपण 'सिंह' पदवी धारण केली आहे; परंतु खरं पाहिलं तर आपण कोल्ह्यापेक्षांहि भ्याड आणि बलहीन आहां. प्रसिद्ध, बलाढ्य व स्वतंत्र राजकुलांत आपला जन्म झाला आहे; आपण स्वतः आपले मुखत्यार आहां; आपणांस कुणीहि आळा घालणारा नाहीं; असं असतां आज अगदीं यःकश्चित् कारणाकरितां आपणास दुसऱ्याच्या तोंडाकडे पहावं लागावं— तस्मात् धिक् तुमचं तें वीरत्व! धिक् तुमचें साहस!! आणि धिक् तुमची ती 'सिंह' पदवी!!! आपल्या प्रियजनांनां बरोबर घेऊन आपण सुखांत व आनंदांत खुशाल दिवस कंठावे. मीहि माझ्या मनास वाटेल तिकडे जात्यें. दोन्हीं मुलं बरोबर घेऊन मी खुशाल आपल्या नांवानं दारोदार भिक्षा मागत हिंडत फिरेन!"

याच्या थोडा वेळ अगोदर राजा रघुनाथसिंहाच्या अंगांत खरोखरच सिंह-शक्तीनें संचार केला होता; परंतु लालबाईचें तें तिरस्कारपूर्ण वाक्य श्रवण करून तो शृगालापेक्षांहि शृगाल बनला. तें शेवटचें वाक्य ऐकून त्याला मेल्याप्रमाणें झालें. तिच्याकरितां त्यानें या जगांतील सर्व कठोर यातना अगदीं निमूटपणें सहन केल्या असत्या; परंतु लालबाईचें मुखकमल एक क्षणहि म्लान झालेलें दिसलें तर त्याला चारी दिशा एकदम अंधकारमय होऊन जात. ह्मणून तिच्याशीं अधिक भाषण न करतां तो संमतिदर्शक आवाजानें ह्मणाला "पण तूं मला अगदींच वेडी दिसतेस. या अगदीं क्षुद्र गोष्टीसाठीं हा एवढा गडगडाट कशाला? कोणाचेंहि मन न दुखवितां आपला तर कार्यभाग होईल, असा एखादा मला सदुपाय सुचीव."

लालबाईच्या मनांत ही अभिलाषा आज नव्यानेंच उत्पन्न झाली नव्हती. कित्येक दिवसांपूर्वी तिचें बीजारोपण होऊन आजपर्यंत या अभिलाषांकुराचें सारखें संगोपन चाललें होतें; आणि आतांतर त्या अंकुराचा एक प्रचंड वृक्ष बनला होता. त्याचीं मुळें अंतःकरणांत फार खोल गेलीं होतीं. जेव्हांपासून राजानें चंद्रावतीच्या मंदिरांत जाण्याचें टाकलें, आणि ज्या दिवशीं लालबाईला राजापासून पहिलेंच पुत्ररत्न झालें, तेव्हांपासूनच राजमाता होण्याची प्रबळ महत्वाकांक्षा तिचे मनांत उद्भवली होती. आपणास युक्ति सुचवावी, अशी राजानें तिची विनंति केल्यावर ती स्मित करून एक मधुर कटाक्ष फेंकून ह्मणाली "महाराज! योद्धे पुरुष अश्व आणि अस्त्र चालविण्यांत मात्र निपुण असावे व बुद्धि आणि चातुर्याच्या कामांत त्यांनीं अगदीं हात टेंकावे, ही किती दुःखाची गोष्ट! या अगदीं यःकश्चित् गोष्टींत आज राजा रघुनाथसिंहाची बुद्धि चालूं नयेना? महाराज, हें मला पूर्वींच ठाऊक होतं, कीं ज्याप्रमाणं या गोष्टीची कल्पना मला सुचवावी लागेल, त्याचप्रमाणं तिचा उपायहि पण सुचवावा लागेल. आणि असं समजून मीं आधींच एक उपायहि योजून ठेविला आहे. मी सांगत्यें त्याप्रमाणं कराल, तरच ठीक होईल. आपण कट्टे वैष्णवधर्मी, आणि ह्मणूनच आपली प्रजाहि कट्टी वैष्णवधर्मावलंबी आहे. आपला जो धर्म, तोच आपल्या लोकांचा असल्यामुळं आपण जो धर्म स्वीकाराल, तोच धर्म आपले लोक स्वीकारतील. आज आपण हिंदु, तर तेहि हिंदु. उद्यां आपण मुसलमान झालां तर तेहि मुसलमान झालेच ह्मणून समजावं. याकरितां, आपण मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली ह्मणजे तेहि मुसलमान होतील; आणि मग सर्व कांहीं यथास्थित होईल."

दुराचरणी स्त्रियांची बुद्धि जितकी तीक्ष्ण तितकीच प्रलय करणारी असते. पुष्कळ वेळां ती पुरुषांनां अगदीं अगम्य आणि अचिंतनीय असते. ज्याप्रमाणें निर्जीव कळसूत्री बाहुल्यांनां तमासगीर आपल्या हातांत दोरी धरून स्वेच्छानुसार नाचवितो, त्याप्रमाणेंच बुद्धिहीन नेभळ्या पुरुषाला कुटिल चतुर स्त्रिया आपल्या बोटावर हवातसा नाचवितात. आधींच जर राजा रघुनाथसिंह इतका वाद न वाढवितां, लालबाईनें आपल्या उद्देशाची प्रस्तावना करतांच त्याला आपली संमती देऊन नंतर कांहीं वेळानें युक्तीयुक्तीनें तिला सर्व समजावून सांगता, तर बहुधा सर्व यथास्थित झालें असतें; परंतु तसें वेळींच न केल्यामुळें तो आतां तिच्या भयंकर क्रोधानलाला बळी पडला होता. वैष्णवचूडामणि वीर हमीर याच्या उज्ज्वल व निर्मल कुलांत त्याचा जन्म झाला होता. अर्थात् आपला प्राणहि खर्ची

टाकून आपल्या प्रजेचा धर्म रक्षण करणें, हें त्याचें परम कर्तव्य होतें; परंतु दुःखाची गोष्ट कीं, तसें करण्याचें तर एकीकडेच राहिलें, उलट प्रजेचा धर्म भ्रष्ट करून तिला महम्मदीधर्माची दीक्षा कोणत्या युक्तीनें देतां येईल, या विवंचनेंतच तो सध्या गढून गेला होता! त्याला आपल्या कर्तव्याकर्तव्याचें विस्मरण झालें होतें. तो लालबाईस ह्मणाला "प्यारी, माझ्या लोकांस मुसलमान कसें करतां येईल? तूं एखादी युक्ति हुडकून काढली आहेस का?"

लालबाई तत्काळ ह्मणाली "महाराज, तुमच्या हिंदु लोकांत सर्वांत श्रेष्ठ असे काय ते ब्राह्मण. त्यांनां जर यवन करतां आलं, तर इतर जातींची कांहींच काळजी नको. ते आपोआपच मुसलमान होतील. आपण एखादा दिवस नेमावा व त्या दिवशीं ब्राह्मण लोकांनां दोन प्रहरच्या भोजनाचं निमंत्रण द्यावं. मी आमच्या मुसलमान लोकांनीं उपयोगांत आणिलेल्या मातीच्या भांड्यांत भोजनाचे सर्व पदार्थ तयार करवीन. ब्राह्मणांनां इथंच जेवावयास बोलवावं. अर्थात् माझ्या घरीं आमच्याच लोकांनीं शिजविलेलं अन्न त्यांनीं भक्षण केल्यानं ते धर्मभ्रष्ट होऊन आपोआपच मुसलमानधर्मांत येऊन पडतील, आणि तसं झालं ह्मणजे मग आपल्या दोघांच्याहि मनकामना अगदीं सुलभ रीतीनं परिपूर्ण होतील."

लालबाईचें हें विलक्षण बुद्धिकौशल्य पाहून राजा विस्मित झाला. त्यानें तिची अत्यंत प्रशंसा केली व भोजनाकरितां एक दिवस नेमून आपल्या राज्यांतील सर्व ब्राह्मणांनां आणि इतर ज्ञातींतील प्रमुखप्रमुख लोकांनां भोजनाचें लगेच आमंत्रण दिलें.

नेमलेल्या दिवशीं असंख्य ब्राह्मणांच्या आणि इतर सरदारदरखदारांच्या झुंडीच्या झुंडी राजवाड्यांत येऊन थडकल्या. चौदापंधरा हजार मंडळी तेथें जमली. त्यांच्यापैकीं कित्येकांनां राजाच्या दुष्ट हेतूची बातमी आधींच लागली होती; ती आतां सर्वांस कळून सर्वजण फार घाबरून गेले. धर्मनाशाच्या भयानें त्यांचीं मनें अतोनात क्षुब्ध झालीं. भयानें सर्व हवालदिल झाले. कांहीं वेळपर्यंत त्यांनीं परस्परांत तर्कवितर्क केला, परंतु धर्मरक्षण करण्याचा त्यांनां कोणताच उपाय सुचेना. शेवटीं अनन्योपाय होऊन ते सर्वजण राणी चंद्रावतीकडे हें वर्तमान निवेदन करण्यास गेले.

राणीस या संबंधांत कांहींच ठाऊक नव्हतें. किल्ल्यांत एकदम इतके लोक जमलेले पाहून तिनें आश्चर्यचकित होऊन आपल्या दासीस या बाबतींत विचारिलें. दासीनें तिला इत्थंभूत हकीगत सांगून ब्राह्मणांची विनंतीहि कळविली.

ही भयंकर वार्ता ऐकून राणी विजेचा धक्का बसल्याप्रमाणें भयभीत झाली. दासीच्या बोलण्यावर तिचा एकाएकीं विश्वास बसेना. तिनें आपला दीर गोपाळसिंह यास बोलावून त्या हकीगतीच्या खरेपणाविषयीं आपली खातरी करून घेतली. गोपाळसिंह ती बातमी सांगत असतांना एकसारखा ढळढळ रडत होता. त्याला यापूर्वींच आपल्या वडील भावाची दुष्ट इच्छा समजून आली होती. तो वयानें लहान, तथापि कट्टा वैष्णवधर्मी होता. आपल्या सर्व लोकांचा धर्मनाश होण्याची वेळ आलेली पाहून त्यानें आत्महत्या करण्याचा कृतनिश्चय केला. गोपाळसिंह या वेळीं राणीचे पाय धरून ह्मणाला "वहिनी, या वेळीं कांहीं युक्ति काढून प्रजेचा धर्म रक्षण कराल, तरच तरणोपाय आहे. नाहीं तर—" पुढें त्याच्यानें बोलवेना. त्याचा कंठ दाटून आला.

राणीहि फार घाबरली. तिला कांहींच युक्ति सुचेना. राजा कधीं तिचें मुखावलोकनहि करित नसे, असें असतां आज त्याच्या अनुमतीखेरीज त्याच्या सन्मुख जाऊन त्याचें मन कसें वळवावें? यदाकदाचित् धाडस करून ती राजासमोर गेली आणि दोन शब्द बोलली, तरी पण काय? राजानें तिचें ह्मणणें ऐकलें असतें काय? तो आपल्या दुष्ट विचारापासून परावृत्त झाला असता काय? तिला याची बिलकूल आशा नव्हती. तिनें आपल्या मनाशीं नानाप्रकारचे विचार केले व अखेरीस राजाची भेट घेण्याचेंच ठरविलें. ती गोपाळसिंहास ह्मणाली "भावजी, मीं पुष्कळ दिवसांपासून—पुष्कळ दिवसांपासून कां, लग्न झाल्यापासूनच ह्मणाना—तिकडचे पाय पाहिले नाहींत. आज मीं पक्का निश्चय केला आहे कीं, तिकडच्या पायांचं शेवटचं दर्शन घेऊन हा पापमय देह पवित्र करावा. जर मी परत आल्यें नाहीं, तुमच्या बंधूच्या प्रज्वलित कोपानलानं दग्ध होऊन जर का मला देहविसर्जन करावं लागलं, तर त्यांच्यावर तुह्मी रागावूं नका. मी वीरपत्नी आहें. या ब्राह्मणलोकांचा धर्म रक्षण करण्यांत ह्या पापमय देहाचा बळी पडला, तर त्यापेक्षां आणखी दुसरी आनंदाची गोष्ट कोणती आहे? विशेषतः जिला पतिप्रेम कधीं ठाऊक नाहीं, तिला जगूनतरी काय करायचं आहे? याकरितां, तुह्मी माझी चिंता करूं नका. तुह्मीं या पवित्र कुलांत जन्म घेतला आहे. याकरितां जिवंत राहून ब्राह्मणांचा धर्म नष्ट झालेला आपल्या डोळ्यांनीं पाहूं नका. प्रथम राजाच्या पायीं पडून त्यांच्याजवळ धर्मभिक्षा मागा. जर त्यांत यश मिळालं नाहीं तर प्रजा आणि सैन्य यांच्या साह्यानं धर्माचं रक्षण करा. ते लोकहि राजाच्या दुष्ट हेतूनं आधींच क्षुब्ध झाले आहेत. परंतु इतक्यावरहि जर कुणीं साह्य दिलें नाहीं तर स्वतः हातांत

समशेर घेऊन भावाशीं भांडून आपला धर्म राखा. भावजी, धर्माचं रक्षण झालं, तर तुह्मांला कोटिकोटि पुण्य लाभेल. तुमचं परलोकीं मंगल होईल." इतकें ह्मणून राणी एक क्षणाचाहि विलंब न करतां राजाकडे निघून गेली.

इकडे नव्या महालांत अगदीं धामधूम उडून राहिली होती. लालबाई असंख्य दासदासींनां आपल्या हाताखालीं घेऊन नानाप्रकारचीं पक्कान्नें तयार करण्यांत दंग झाली होती. आज तिचा केवढा आनंदाचा दिवस होता! आपला मुलगा राजा होऊन आपण राजमाता होणार, या सुखप्रद विचारानें ती अत्यंत वेडी झाली होती. ती आज आटोकाट परिश्रम करित होती, परंतु त्याचें तिला कांहींच वाटत नव्हतें. भूक, तहान आणि श्रम ती अजीबात विसरून गेली. दासदासींनीं आज सहस्र अपराध केले, तरीदेखील त्यांनां तत्काळ क्षमा होत होती. पूर्व जन्मीं संचित केलेलें आपलें सर्व पुण्य आज फळास येणार, असेंच तिला वाटत होतें. हें जग अनंत सुखांचें भांडार आहे असें तिला दिसूं लागलें. हां हां ह्मणतां दोनप्रहरची वेळ झाली. परंतु अद्यापिहि ब्राह्मण वगैरे मंडळी आली नाहीं, हें पाहून लालबाई राजाच्या खोलींत जाऊन त्याला ह्मणाली "महाराज, आपले ब्राह्मण कुठं आहेत? माझ्याकडून सर्व तयारी झाली. आतां त्यांनां कां बोलावित नाहीं?"

राजा ह्मणाला "मला वाटतें, सर्व लोक वाड्यांत येऊन बसले असतील. मी तिकडे जाऊन त्यांनांहि घेऊन येतों."

असें ह्मणून तो लागलाच वाड्याकडे निघाला. तेथें जातांच असंख्य ब्राह्मण मंडळी त्याच्या दृष्टीस पडली. ब्राह्मणांनींहि त्याला पहातांच आदरपूर्वक उठून आशीर्वाद दिला. राजा त्यांनां प्रणाम करून तत्काळ अंतःपुरांत गेला. अंतःपुरांत 'पंचताल' नांवाच्या प्रासादांत तो भोजन करित असे. भोजन, पाटपाणी वगैरेची सिद्धता राणी चंद्रावतीच करित असे. परंतु राजा तेथें असतांना त्याच्या सम्मुख येण्यास राणीला अगदीं मनाई होती. राजा भोजनगृहांत प्रवेश करून पहातो तों राणी तेथें उभी आहे. तिला पाहून तो अतोनात संतप्त होऊन क्रुद्ध स्वरानें ह्मणाला "काय ह्मणून तूं इथें आलीस?"

राणी विनयपूर्वक ह्मणाली "कुलस्त्रियांनां आपल्या पतिसमोर येण्यास कोणती हरकत आहे?"

यावर राजा संतापून ह्मणतो "साधारण लोकांची गोष्ट निराळी. परंतु वीरपुरुषांसमोर त्यांच्या स्त्रियांनीं बोलावल्याशिवाय येतां कामा नये."

"वीरांगनेला आपल्या पतीसमोर येण्यास कोणतीच हरकत नाहीं."

"तूं वीर पुरुषाची कन्या नव्हेस व ह्मणून वीरांगना नाहींस!"

"वीराची कन्या नसल्यें ह्मणून काय झालं? मी वीरपुरुषाची पत्नी आणि ह्मणूनच मी वीरांगना आहें."

राजा किंचित् थांबून ह्मणाला "मग तुझी युद्ध करण्याची इच्छा आहे कीं काय?"

"महाराज, आपण माझे पति आहां. नाहींतर आज आपण आरंभिलेल्या कार्याकरितां आपणाबरोबर युद्ध करणं हेंच वीरांगनेचं कर्तव्य होतं."

"पति कोण अथवा पत्नी कोण याकडे अशा वेळीं लक्ष्य देऊं नये. जो युद्धांत यशस्वी होईल तोच पति आणि हरेल ती स्त्री."

"जर आपणच हरलां तर मग आपण—" राणी पुढें बोलली नाहीं.

राजा ह्मणाला "स्तब्ध कां झालीस? बोलेनास पुढें? बोल, मग आपण काय?"

"महाराज, दासीला क्षमा करा. श्रेष्ठ अशा वैष्णवकुलांत जन्मलेला वीर पुरुष आज केवळ एका यवनीच्या सांगण्यावरून असंख्य ब्राह्मण लोकांचा धर्म नष्ट करावयास सिद्ध झाला, तो वीर असतांहि स्त्रीपेक्षां स्त्री नाहीं काय?"

राजाचे नेत्र एकदम रक्तवर्ण झाले. त्याचें सर्व शरीर संतापातिरेकानें कांपूं लागलें. ते मर्मभेदक शब्द तो सहन करूं शकला नाहीं. एका हातानें त्यानें राणीचे केंस ओढून धरले व दुसऱ्या हातांतील तरवार वर उगारली. राणी किंचिन्मात्र भ्याली नाहीं. ती शांतपणें ह्मणाली "स्वामिन्! आणखी एक पळाचाहि उशीर लावूं नका. याच क्षणीं हें मस्तक या पापमय देहापासून वेगळं करा. स्वर्गाचीं द्वारं आज मजकरितां उघडलीं आहेत हें या वेळीं मला स्पष्ट दिसत आहे. दुःखाची गोष्ट इतकीच कीं, लहानपणापासून मला शस्त्र धरणं ठाऊक असतांहि आज एका भीरु मनुष्याचे हातून माझे प्राण जात आहेत. प्रिया! आपण माझे पति, परम गुरु आहां. असं जर नसतं, तर आपल्या हातांतील तरवार माझे हातांत आज किती यशकर्ती झाली असती, हें आपणास स्पष्ट दिसून आलं असतं."

हें ऐकतांच राजानें राणीची वेणी सोडून ह्मटलें "वीरांगने! युद्धाकरितां हातांत शस्त्र घे. तूं वीर आहेस. युद्ध केल्यावांचून वीराचा प्राणनाश करणें हा माझ्यासारख्या वीराचा धर्म नाहीं."

राणी ह्मणाली "महाराज! मी आपल्यापाशीं वीर नाहीं. मी आपली दासी आहें. दासीचा सर्व अपराध क्षमा करून आजच्या संकल्पापासून विरत व्हा. प्राणप्रिया, दासीची ही मनकामना पूर्ण करा. पवित्र पितृकुलाला कलंकित करूं नका!"

इतकें ह्मणून राणीनें राजाचे लागलेच पाय धरले. परंतु तो दुष्ट तिला दूर लोटून ह्मणाला "पापिणी! मला स्पर्श करूं नकोस. आत्तांच्या आत्तां इथून काळें कर. नाहींतर या शस्त्रानें क्षणांत तुझे तुकडे तुकडे करून टाकीन!"

राणी उठून बद्धांजली करून ह्मणाली "नाथ, अज्ञानाप्रमाणं करूं नका. आपल्या उज्ज्वल कीर्तीस कलंक फासणाऱ्या या निंद्य कर्मापासून मागं सरा."

राजा अतिशय क्रुद्ध होऊन ह्मणाला "पापिष्टे! चांडाळणी! या क्षणीं माझ्या पुढून चालती हो. वीर पुरुषांनीं जें एक वेळ करायचें ह्मटलें तें करण्यास ते प्राणाकडेहि पहात नाहींत. जरी आज माझे सर्व पितर स्वर्गांतून पदच्युत होऊन नरकांत गेले, जरी आज माझ्या या कृत्यानें आकाशपाताळ एक झालें, तरी रघुनाथसिंहाच्या प्रतिज्ञेचा आतां भंग होणार नाहीं."

राणी ह्मणाली "मीहि पण तेंच सांगत्यें. वीर पुरुषांनीं आपली प्रतिज्ञा भंग होऊं देतां कामा नये. परंतु अशा कामांत प्रतिज्ञाभंग झाला तरी दोष नाहीं. उलट त्यापासून आपली कीर्तिच वाढणार आहे. आणि त्याबरोबरच आपल्या कुलधर्माचं आणि सत्यपरायणतेचंहि रक्षण होईल." इतकें ह्मणून राणीनें पुनः राजाच्या पायांवर लोळण घेतलें.

राजा राणीस स्पर्श न करितां दूर उभा राहून कर्कश स्वरानें ह्मणाला "या क्षणीं तू इथून काळें कर. आणि पुनः जर का अशीच येऊन मधें लुब्रेपणा करूं लागलीस तर पक्कें याद राखून ठेव कीं, या क्षणीं हा सगळा ब्राह्मणसमुदाय या मल्लवंशासह एका पळांत नष्ट करून माझा मार्ग मी निष्कंटक करीन."

राजा अगदीं मतिभ्रष्ट झाला आहे असें राणी समजून चुकली. कांहीं केलें तरी तो आतां शुद्धीवर येणें अशक्य आहे असें पाहून ती रडतरडत आपल्या अंतःपुरांत परतली. तेथें गोपाळसिंह तिची मार्गप्रतीक्षा करित होताच. त्याला साद्योपांत हकीगत निवेदन करून राणी ह्मणाली "आतां कुलधर्माचं रक्षण कोणत्या उपायानं करावं? राजे तर इतक्या निकरावर आले आहेत कीं, आतां धर्मरक्षण करणं आपणास अत्यंत दुर्घट आहे."

गोपाळसिंहहि किंकर्तव्यविमूढ होऊन अगदीं स्तब्ध उभा होता. इतक्यांत ब्राह्मण बाहेरून ओरडूं लागले "माते, आमच्या धर्माचें रक्षण कर. या घोर नरकयातनांपासून आह्मांला वांचीव."

राणी करुणाजनक स्वरानें ह्मणाली "अहो पुण्यशील ब्राह्मणांनों! आपला धर्म मी कोणत्या युक्तीनं रक्षण करूं? मला कांहींच सुचत नाहीं. ब्राह्मणांनों, खरें खरं

सांगा, कीं आपला धर्मनाश होत असतांना तो या डोळ्यांनीं स्वस्थपणं बसून पाहिला तर त्याला कांहींच प्रायश्चित्त नाहीं काय ?"

ब्राह्मण एकदम ओरडून ह्मणाले "नाहीं! नाहीं! निवारण करण्याचें सामर्थ्य अंगांत असतां धर्मनाश घडूं देणें भयंकर पाप आहे. त्याला चिरकाल नरकवास हेंच प्रायश्चित्त, अन्य प्रायश्चित्त नाहीं!"

"निवारण करण्याचा उपाय कोणता तो लवकर सांगा."

"पतिहत्या! राजाचे प्राण घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं."

डोक्यावर एकदम वीज कडाडल्याप्रमाणें राणी स्तंभित होऊन कानांवर हात ठेवून ह्मणाली "पतिहत्या ? भयंकर पातक! प्रभो रक्षण कर! धरित्री माते, द्विखंड होऊन या क्षणीं मला उदरांत घे! ब्राह्मणांनों, पुनरपि ही गोष्ट बोलूं नका."

ब्राह्मण गोंगाट करून ह्मणाले "साध्वीनें पतिहत्या केल्यास घोर पातक आहे, ही गोष्ट खरी; परंतु त्याचा विचार या वेळीं नाहीं. अशा वेळीं पतिहत्त्या केल्यास पातक नाहीं. आणि पातकच लागल्यास त्याला प्रायश्चित्तहि आहे."

"तें प्रायश्चित्त कोणतं?"

"प्राणनाश अथवा सहगमन."

"कुलांगना धर्मरक्षणार्थ मृत्यूला भीत नाहीं!"

"तरमग देहत्यागरूपी प्रायश्चित्तद्वारा धर्मरक्षण कर."

"त्याला मी तयार आहें. परंतु पतिहत्येपासून लागणाऱ्या पापाचं प्रायश्चित देहत्याग करून जर पूर्ण झालं नाहीं तर तुह्मी सर्व त्या पापाचे वांटेकरी व्हाल, एवढं मात्र लक्ष्यांत असूं द्या."

इतकें ह्मणून राणी गोपाळसिंहाकडे वळून ह्मणाली "भावजी, या क्षणीं तिरंदाज लोकांस बोलवावयास कोणी मनुष्य पाठवा. राजे पंचताल महालांत भोजन करित बसले आहेत. अशा वेळीं तिरंदाज लोक बाण सोडून त्यांचा प्राणनाश करतील."

गोपाळसिंह कानांवर हात ठेवून ह्मणाला "वहिनी, हें काय भलतेंच ? तूं हें काय ह्मणतेस? राजा माझा वडील भाऊ ना ? तो मला पित्याप्रमाणें आहे. त्याचा वध करण्यास मी साह्य होऊं काय? वहिनी, मी तुझे पाय धरून एवढीच विनंति करितों कीं, हें दुष्ट कर्म करण्यास मला आज्ञा करूं नकोस."

"भावजी, भित्र्याप्रमाणं करूं नका. राजे तुमचे वडील बंधु खरे, परंतु माझे तर ते पति आणि उपास्यदेवता आहेत; परंतु प्रसंग दुर्धर पडला; काय करावं ? दुसरा इलाज नाहीं. धर्माचं रक्षण करण्याकरितां ह्मणून मी हें घोर पाप

करावयास तयार झाल्यें आहें. आपण कांहीं काळजी करूं नका. हें पाप आपणास भोंवणार नाहीं. तें मला एकटीलाच भोगावं लागेल. आतां तुह्मी आणखी विलंब करूं नका. ही संधी जर घालविली, तर कुलधर्मरक्षणाचे सर्व उपाय थकलेच ह्मणून समजा. करितां आपल्या वंशाच्या कीर्तीस उचित असं धाडस करा. मी तुह्मांला आईप्रमाणं आहें. मला पुत्र नाहीं; लहानपणीं मीं तुमचं पुत्राप्रमाणं लालनपालन केलं आहे. याकरितां मातेची अवज्ञा करूं नका."

गोपाळसिंह अगदीं लहान असतांच त्याची आई निवर्तली होती. चंद्रावतीनेंच त्याला लहानाचा मोठा केलें होतें. गोपाळसिंहाचीहि चंद्रावतीवर मातेप्रमाणें भक्ति असे. यामुळें राणीची ती भयंकर आज्ञा उल्लंघन करण्यास तो असमर्थ होता. त्यानें तिरंदाज लोकांस बोलाविलें. गोपाळसिंहाचा हुकूम ऐकतांच तिरंदाज लोक किल्ल्यांत सत्वर येऊन दाखल झाले. राणीच्या आज्ञेनें एकानें पंचताल महालाखालीं उभें राहून राजाच्या कपाळाचा नेम धरून एक तीव्र बाण सोडला. तो बाण सूं सूं करित राजाच्या ललाटप्रदेशीं जाऊन रुतला. राजा शरविद्ध झाल्यामुळें अत्यंत वेदना भोगूं लागला. मल्लवंशीय रघुनाथसिंहावर तीर सोडण्याचें साहस करणारा असा या राज्यांत कोण मनुष्य आहे, अशा अर्थपूर्ण दृष्टीनें तो चोहींकडे पाहूं लागला. खालच्या भागीं दृष्टी जातांच, आपल्याच राज्यांतील कांहीं तिरंदाज लोक आपल्यावर आणखी शरसंधान साधित आहेत, असें त्याला दिसलें. त्यानें तत्काळ हातांत खड्ग घेऊन एकदम खालीं उडी घेतली. परंतु खालीं हरिणें कोंडून ठेवण्याचा बांबूंचा पिंजरा होता त्यावर तो पडला आणि त्याचें अंग जागोजाग छिन्नविच्छिन्न झालें. इकडे, तिरंदाज लोकांनीं त्याच्याजवळ जाऊन त्याजवर बरेचसे तीर सोडून तत्काळ त्याचा प्राण घेतला.

राजाच्या मृत्यूची वार्ता हां हां ह्मणतां जिकडेतिकडे पसरली. गोपाळसिंह ती खबर ऐकून ओक्साबोक्सीं रडूं लागला. राणीनें त्याचें फार प्रयासानें शांतवन केलें. इकडे तिनें लालबाईस बोलावूं पाठविलें. तिच्या भरणपोषणाचा चांगला बंदोबस्त करून द्यावा, अशी चंद्रावतीची अत्यंत इच्छा होती; परंतु लालबाई आली नाहीं. आपल्या ऐन आनंदाच्या दिवशीं राजाच्या वधाची ही भयंकर वार्ता ऐकून ती अतिशय भयभीत झाली. चंद्रावतीच्या बोलावण्याकडे तिनें दुर्लक्ष्य करून ती पळून गेली. राणी चंद्रावतीनें आपल्या कुलधर्माप्रमाणें गोपाळसिंहास स्वताच्या हातानें राजतिलक लाविला व त्याला सिंहासनावर बसविलें. नंतर तिनें आपल्या अंगावर उत्तमोत्तम वस्त्रालंकार घातले, आणि आपले आप्तस्वजन

आणि प्रजाजन यांना राजाच्या उत्तरक्रियेची व्यवस्था करावयास सांगितलें. त्याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर राणी चंद्रावती शिबिकेंत बसली. राजाच्या मृतदेहाच्या मागोमाग ती शिबिका चालविण्यांत आली. राजाचा मृतदेह स्मशानांत चितेवर ठेविल्यावर राणी शिबिकेंतून खालीं उतरली. आप्त मंडळींनीं चितेस अग्नि लावण्यास राणीला सांगितलें; परंतु तिनें तें ऐकिलें नाहीं. गोपाळसिंहासच चितेस अग्नि देण्यास सांगून ती चितेवर जाऊन बसली. नंतर तिनें आपल्या हृदयसंतापहारक जीवनसर्वस्व जीवितेश्वराला हृदयाशीं घट्ट धरलें आणि उच्च स्वरानें रोदन करित ती म्हणाली "हे जीवितेश्वरा ! या दुष्ट पापिणीला आपल्या पवित्र चरणीं स्थान द्या. कुलस्त्रियांच्या दृष्टीनं आज मी अघोर पातकी ठरल्यें आहें. आजपर्यंत या भारतवर्षांत असं भयंकर पाप कोणत्याहि कुलस्त्रीनं केलं नसेल. प्राणप्रिया ! जीविताधारा ! आपल्या कृपेवांचून या कपाळीं आलेला हा असह्य नरकवास कधींहि टळणार नाहीं ! नाथ! आपल्या जिवंतपणीं आपल्याला या हृदयाशीं आलिंगून धरण्याचं विधात्यानं या अभागिनीच्या खडतर अदृष्टांत लिहिलं नाहीं. आपला हा मृतदेह हृदयाशीं धरून या जन्मींच्या सकल कामना मीं पूर्ण करून घ्याव्या, असाच ईश्वराचा संकेत दिसतो."

हा करुणास्पद आणि शोकजनक देखावा पाहून सर्व लोकांचीं अंतःकरणें अगदीं हळहळून गेलीं. गोपाळसिंहानें रडतरडतच त्या चंदनकाष्ठसुसज्जित चितेस अग्नि दिला. क्षणोक्षणीं त्या चितेंत घृताहुति पडूं लागल्या. अग्नीहि जणूं काय त्या सतीच्या देहस्पर्शानें आपणास पवित्र समजून अधिकच प्रज्वलित झाला. वाद्यांच्या भीषण नादानें आणि तेथें जमलेल्या सर्व मंडळीच्या आर्तस्वरानें चारी दिशा दुमदुमून गेल्या व एकच कोलाहल झाला. पहातांपहातां राजाच्या देहासह त्या साध्वीचा देहहि जळून भस्म झाला! तेव्हांपासून हें स्थान **'सतीडांगा'** या नांवानें प्रसिद्ध आहे.

* * * * * *

आपल्या अंगावरील बहुमूल्य अलंकार समर्पण करणाऱ्या देशभक्त जपानी स्त्रियांप्रमाणें ऐहिक भोगसुखांसच केवळ नव्हे, तर देशोद्धारासाठीं आणि प्रजेच्या धर्मरक्षणासाठीं पतिहत्येसारखें अघोरकर्म करून पारलौकिक सुखांसहि जलांजली देण्यास सिद्ध झालेल्या राणी चंद्रावतीसारख्या प्रातःस्मरणीय स्त्रियांस वंदन असो !

**'शांताराम.'**

## गोष्ट ३० वी.

# दृढ प्रतिज्ञा.

Beauty cannot last; but yet
certainly again it maketh
Virtue shine and Vices blush.

—*BACON.*

"दामूअण्णा, मी या बाबतींत तुझें कांहींएक ऐकणार नाहीं. बस्स, माझा कदा निश्चय झाला तो झाला. मीं एकजात लग्न ह्मणून करणार नाहीं. विनाकारण आग्रह करण्याच्या भरीस पडूं नको."

"हें पहा नारायण, तुझें अजून पोरवय आहे. लग्नावांचून राहिल्यानें मनुष्यास णकोणत्या व कसकशा अडचणी येतात, त्याची तुला कल्पनासुद्धां नाहीं."

"दामूअण्णा तूं कांहीं जरी सांगितलेंस, तरी माझा बेत फिरणार नाहीं. मीं सगळ्या ष्टींचा पूर्णपणें विचार केला आहे. लग्न केल्यापासून सुख होईल ह्मणतोस, र मी विचारितों कीं, आतांच मला सुख काय कमी आहे? काळजी वहाण्यास क्यावर आईबाप आहेत. तुझ्यासारखे जिवासजीव देण्यास तयार असणारे कळ स्नेही आहेत. कपडालत्ता, जेवणखाण, रहाण्याचें ठिकाण वगैरे सर्व कांहीं व्यानुकूल्यतेमुळें साध्य आहे. मला कधींतरी तूं दुःखी किंवा विचारांत बसलेला हिला आहेस काय? मग, असा माझा सुखांत असलेला जीव दुःखी समजून, ला सुखसंपादनार्थ मुद्दाम संसारपाशांत मीं कां बरें अडकवावा? ाज पंधरावीस रुपयांत मीं मुंबईचा माझा सगळा खर्च आटोपून, दरमहा वीस चवीस रुपये संग्रहीं ठेवतों. आजउद्यां केव्हांतरी घरच्या मंडळीस ह्या रकमेची रज लागेल. मग लग्न करून मुद्दाम दृष्टि आकुंचित करून घेऊन संसार ह्मणजे क मी व माझी बायको असें समजून भावी काल्पनिक संसारसुखासाठीं का रक्ताच्या नातलगांना दुःखांत टाकणें, मला बरें दिसत नाहीं. आहे तें नाहीं सें समजावयाचें व नसल्याच्या बळेंच पाठीमागें लागून तें आपलें ह्मणावयाचें त्याच्या चैनीप्रीत्यर्थ अकटोविकट श्रम करून जिवाची उगीच ओढाताण रावयाची, यांत काय अर्थ?"

"नारायण, उगीच अनुभवावांचून कोणतीहि गोष्ट चांगली किंवा वाईट रविणें योग्य नाहीं. तूं हल्लीं दुःखीच आहेस, असें माझें ह्मणणें नाहीं; परंतु लग्न ल्यानंतर हल्लीं आहेस त्यापेक्षां जास्ती सुखी तूं कशावरून होणार नाहींस? दैव तुझ्या सुखांत भर घालून दुःखाचा वांटा मागणाऱ्या सुलक्षणी पत्नीच्या

साह्यानें ह्या दुस्तर संसाराचें अधिक सुखानें तुला मार्गक्रमण करतां यावयाचें नाहीं काय ? अरे; एकदा लग्न करूनतर पहा; .मग सुखसागरांत मग्न झाल्यावर आमची आठवणसुद्धां विसरशील !"

"इकडे पहा दामूअण्णा, सगळया गोष्टींचा अनुभव घेऊं ह्मटलें तर हें सर्व आयुष्यदेखील पुरणार नाहीं. अनुभवासाठीं ह्मणून लग्न केलें व अनुभवांतीं आपण चांगलें केलें नाहीं असें ठरलें, मग नावडत्या बायकोला अन्नवस्त्र देऊन काय सोडचिठ्ठी द्यावयाची ह्मणतोस ? उपदेश चांगला आहे, परंतु त्याप्रमाणें वागणें हितावह नाहीं, एवढेंच. बरें, घटकाभर कल्पना कर कीं, मी लग्न करण्यास तयार झालों, तर खात्रीलायक सुखाचा मार्ग सांपडेलच ह्मणून कशावरून ? उद्यां लग्न केल्यावर मुंबईंतच बिऱ्हाड केलें तर काय होईल बरें? मुंबईंतील घरांचें एकसारखें वाढत चाललेलें भाडें; भाजीपाला, दाणागोटा इत्यादिकांची महर्गता; कापडांच्या रोज नवीननवीन निघणाऱ्या फॅशनी व त्यांच्या प्रचंड किंमती ह्याखालींच जीव बेजार होऊन शिलकी पैसे सर्व संपून, अडचणीच्या वेळीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाण्याची पाळी येणार. बरें, बायकोला घरीं पाठवून इथें काटकसरीनें राहून पैसे जमवीन ह्मटलें, तर तिचें घरीं चालावें कसें ? आज वर्षानुवर्ष ओरड चालली आहे कीं, सासवा फार वाईट, त्या सुनांचे हाल करतात. ह्या ओरडीस आरंभ झाला त्या वेळच्या गरीब बिचाऱ्या गांजलेल्या सुना आतां आजेसासवा सुद्धां झाल्या असतील, पण सासवांबद्दलची ओरड आपली कायमच ! सासूसासरा ह्मणजे केवळ शत्रू व नवऱ्याचें घर ह्मणजे एक परक्याचें घर, ही कल्पना तिच्या हाडींमासीं खिळलेली. तिला नेहमीं वाटावयाचें कीं, मीं सासूबाईच्या डोळ्यांत सलतें. जरा सासू कांहीं बोलली कीं, लागलीच त्याचा रिपोर्ट आईपाशीं जावयाचा व मग त्याला तिखटमीठ लागून, त्याची एक हृदयद्रावक कहाणी बनावयाची ! माहेर ह्मणजेच कायतें आपलें मायेचें ठिकाण, सासरीं आपलें असें कोणी नाहीं, असें तिला वाटतें. माहेरीं आईजवळ आपल्या सासूच्या निर्दयपणाबद्दल बारीकसारीकसुद्धां वर्णन करित असतांना, आपल्या आईनें त्याच वेळीं आपल्या भावजईवर चालविलेला कठोर शब्दांचा भडिमार तिच्या ध्यानींसुद्धां नसतो. तिला असें कळत नाहीं कीं, आपल्याला सासरीं हक्कानें मीठभाकर मिळेल पण माहेरीं मिळालेली गोड बासुंदी जरी असली तरी ती आज मिळाली ह्मणून उद्यां हक्कानें मागतां येणार नाहीं. मग, ज्या घरांत आपल्याला हक्कानें कोणतीहि गोष्ट मिळवितां येते, तेथील मंडळी ह्मणजे शत्रू व जेथें नुसतें रहाण्यास मिळालें

तर मेहेरबानगी तेथलीं माणसें मायेचीं समजणें, ह्मणजे असें समजणारांचा ह्या वेडेपणा किंवा तिला असें शिकविणारांचा वाजवीपेक्षां जास्त शहाणपणा, हें कळत नाहीं."

"ह्मणजे! हें सास्वांसुनांचें पुराणच का तुला लग्नाची दहशत घालित आहे?"

"तेंच एक कारण नव्हे. आणखीहि बरींच कारणें आहेत. मी तुला स्पष्ट सांगतों कीं, मला पुन्हा आग्रह करण्याच्या भरीस पडूं नको. ह्या कामांत मला बाबांनींसुद्धां बराच आग्रह केला, पण माझा निश्चय कांहीं मी ढळूं देणार नाहीं."

[ २ ]

बडोदा रेलवेच्या ग्रँटरोड स्टेशनावरून पांचसहा मिनिटांचे अंतरावर एक नवीनच बांधलेली चाळ होती. आजूबाजूनें फारशी वस्ती नसल्या कारणानें तेथील जागा स्वच्छ असून तेथें मोकळी हवा खेळत असे. त्या चाळीच्या तिसऱ्या मजल्यावरील एक स्वतंत्र गाळा नारायणराव व त्यांचे स्नेही यांनीं घेतला होता. ऱ्या मंडळीचा नित्यक्रम ह्मटला ह्मणजे सकाळीं कोणी फिरावयास जाण्यांत, कोणी लायब्ररींत, तर कोणी वाचनांत वेळ घालवावा. दहा वाजतां खानावळींत जेवून कोणी शाळेंत, कोणीं कॉलेजांत, तर कोणी ऑफिसांत जावें. सायंकाळीं परत बिऱ्हाडीं आल्यावर जेवण्यास जाण्यापूर्वीं सर्वांनीं एकत्र जमून गोष्टी करित बसावें. त्या गोष्टींत साऱ्या जगांतील घडामोडींचा विचार व्हावयाचा. सार्वजनिक प्रश्न, सार्वजनिक संस्था ह्यासंबंधानें चर्चा चालून त्यावर ठराव पास व्हावयाचे. नंतर जेवण आटोपून प्रत्येकजण आपापल्या व्यवसायास लागावयाचा. ह्या कारणानें त्या गाळ्याला 'गव्हमेंट हाऊस' अशी विनोदानें संज्ञा प्राप्त झाली होती. ही सर्व मंडळी गुण्यागोविंदानें व एक दिलानें राहून त्यांचे दिवस फार आनंदानें जात असत. ह्यांपैकीं कोणी आजारी पडल्यास ते त्याची उत्तम प्रकारें शुश्रूषा ठेवीत. चाळींतील इतर मंडळीलासुद्धां ह्या मंडळीचा फार उपयोग होत असे. तेथें कोणाला केव्हां कसलीहि जरूर पडो, त्याला मदत करण्यास ही मंडळी सदैव एका पायावर तयार असे. त्यामुळें चाळींतील सर्व मंडळीचा ह्या नारायणराव-प्रभृति मंडळावर फार लोभ असे. सारांश, अशा प्रकारें सर्व तऱ्हेनें सुख प्राप्त होत असल्यामुळें नारायणरावांनीं डोक्यांत घेतलेल्या वेडाला दुप्पट बळकटी आली. परंतु परमेश्वरी सूत्र कांहीं निराळेंच असतें. मनुष्याच्या पाठीमागें एकसारखें सुख लागलें तर त्याला त्याची किंमत वाटेनाशी होते. कालेंकरून मग तो

विनाकारण स्वताला दुःखी समजून घेतो. ह्मणून परमेश्वर मधूनमधून सुखालयीं गाढ निद्रिस्त असलेल्या मनुष्याला दुःखांजनाचे वळसे देऊन शुद्धीवर आणतो.

हळूहळू मुंबईंत प्लेगला सुरुवात झाली. आरंभीं सांगितल्याप्रमाणें दामूअण्णा व नारायणराव या उभयतांचा सायंकाळीं समुद्रकांठीं झालेला संवाद होऊन फारसे दिवस झाले नव्हते. आपली जागा स्वच्छ व हवाशीर आहे तेव्हां येथून कोठेंहि बाहेर जाण्याची आवश्यकता नाहीं, असा 'गव्हर्मेंट हाऊस' मध्यें ठराव पास झाला होता; परंतु त्यांच्या दुर्दैवानें ठराव अमलांत आणणें न आणणें बाहेर गांवच्या त्यांच्या वडील माणसांच्या हातांत होतें. बाहेर दूर त्यांनां वस्तुस्थितीपेक्षां मुंबईंतील प्लेगचें स्वरूप फार भयंकर वाटून, कोणीं तारा पाठवून तर कोणीं स्वतां येऊन आपापल्या नातलगांनां घेऊन गेले होते. जरूर होती ते बाहेरून पास काढून रोज मुंबईंत येत असत. शेजारची बिऱ्हाडकरू मंडळी दादर, माटुंगा वगैरे ठिकाणीं झोंपडीं घालून तेथें रहाण्यास गेली होती. रहातां राहिले एकटे नारायणराव. आईबाप दूर दक्षिण कोंकणांत. नोकरी सरकारी असून अशी विलक्षण कीं, लढाई सुरू झाल्यामुळें सकाळीं जाऊन परत यावयास त्यांनां रात्रीचे सातआठ वाजत. ह्यामुळें त्यांनां मुंबई सोडून दूर जातां येईना. जवळपास कोणाकडे जाऊन अगोदरच अडचणींत असलेल्या लोकांनां संकटांत घालणें, हें त्यांच्या उदार व मानी स्वभावास परवडेना. तेव्हां 'गेला तो दिवस आपला; उद्यांचें हरि जाणे,' असा विचार करून मोठ्या नेटानें नारायणराव तेथेंच राहिले. मंडळी गेल्यामुळें काम नाहीं, शिवाय प्लेगची भीति, ह्मणून नोकरलोक आपापल्या गांवीं पळाले. वस्ती कमी झाल्यामुळें खानावळहि उठली. आतां मात्र नारायणरावांला फारच त्रास होऊं लागला. खोली स्वच्छ ठेवणें, कपडेलत्ते धुणें, विलायती चूल विकत घेऊन फुरसतीअंतीं वेळींअवेळीं कसेंबसें तिजवर अन्न उकडून खाणें, खरकटीं भांडीं घांसणें वगैरे सर्व कामें त्यांचेवरच पडलीं. ऑफिसांत कामाचा अतिशय त्रास, आजूबाजूस प्लेगचा धडाका उडाल्यामुळें काय होईल, काय नाहीं ह्मणून कावरेंबावरें झालेलें मन, आणि नोकरचाकर, स्नेहीसोबती कोणी जवळ नसल्यामुळें पडलेली बिऱ्हाडाची सगळी दगदग, ह्यांच्या योगानें त्यांचा जीव अगदीं वैतागून गेला होता. जरा कोठें डोकें दुखूं लागलें, किंचित् अंग गरम झालें, कुठच्यातरी सांध्यांत थोडें दुखूं लागलें, कीं बापड्यांची नुसती त्रेधा उडून जावी! घरून वडिलांचीं एकदम निघून येण्याविषयीं वारंवार पत्रें येत; पण त्या वेळेस लढाई असल्यामुळें नारायणरावांस बिलकूल रजा मिळेना. वेळेवर अन्न नाहीं,

बिऱ्हाडाच्या कामाचा एकट्यावरच बोजा पडलेला, व ऑफिसांततर कामाचा अतिशय रगाडा. ह्यामुळें पित्त तापून त्यांचें डोकें दुखूं लागे व अशा रीतीनें केत्येक रात्रीच्या रात्री त्यांनां झोंपेवांचून काढाव्या लागत. बरें, राजिनामा देऊन व पुढील हवाला परमेश्वरावर टाकून घरीं निघून जावें, तर अशा वेळीं राजिनामा मंजूर न होतां उगीच वरिष्ठांची गैरमर्जी होऊन त्यांजकडून त्रास व्हावयाचा. अशा विकट प्रसंगांत नारायणराव सांपडले होते.

आज रविवारचा दिवस असल्यामुळें आज जरा उशिरां ह्मणजे एकदोन वाजतां नारायणरावांनां ऑफिसांत जावयाचें होतें. त्या दिवशीं मोठ्या सकाळींच त्यांच्या वडिलांचे स्नेही माधवराव ह्मणून गिरगांवांत रहात होते, ते नारायणरावांनां भेटण्यासाठीं आले. नारायणरावांच्या वडिलांचें त्यांनां आलेलें पत्र दाखवून ते ह्मणाले "नारायणराव, तुमच्या वडिलांचा व माझा बाळपणापासून निकट स्नेह असल्यामुळें तुमच्या हिताकडे लक्ष्य देणें हें माझें कर्तव्य आहे. जोंपर्यंत तुमचें ठीक चाललें आहे असें मला वाटत होतें, तोंपर्यंत मीं स्वस्थ होतों; परंतु आतां ह्यापुढें इथें रहाणें हें अगदीं वेडेपणाचें आहे, असें मी समजतों. मी माटुंग्याला एक चांगलें सोईवार झोंपडें काढलें आहे, तेथें सर्व सामान बरोबर घेऊन तुम्ही आतांचेआतां माझ्याबरोबर आलें पाहिजे. कोणतीहि सबब मी ऐकणार नाहीं. हल्लीं लोकल गाड्याहि पुष्कळ असल्यामुळें व स्टेशनापासून आमचें झोंपडें दूर नसल्याकारणानें तुह्मांला वेळेवर तेथूनसुद्धां ऑफिसांत येतां येईल. मी कांहीं तुह्मांला घेतल्यावांचून इथून हालणार नाहीं."

नारायणरावांचा निरुपाय झाला. त्यांनां माधवरावांपुढें एक अक्षरहि काढतां येईना. वडिलांचे जिवलग स्नेही आपल्यासाठीं मुद्दाम कळकळीनें आले व बरोबर त्यांनीं वडिलांचें पत्रहि आणिलें होतें. मग करतात काय? निमूटपणें त्यांच्या बरोबर माटुंग्यास रहावयास गेले.

[ ३ ]

माधवरावांस मुंबईतच एका मोठ्या व्यापारी कंपनींत नोकरी होती. त्यांनां पगार दरमहा तीनशें रुपये होता. माधवराव व सरस्वतीबाई हें जोडपें फार प्रेमळ असून त्या दोघांमध्यें अधिक उदार व कनवाळू कोण, याची जणूंकाय स्पर्धा लागली होती! त्यांनां गोदावरी नांवाची एकुलती एक मुलगी होती. ती गुणांनीं व रूपानें लाखांत एक अशी होती. बरोबरच आहे; अशा चांगल्या आईबापांची, त्यांच्याच शिक्षणांत वाढलेली मुलगी निराळी कशी होणार? दुसरें कांहीं अपत्य

नसल्याकारणानें आईबापांचा तिजवर फारच लोभ असे. गोदावरी आतां उपवर झाली असल्यामुळें तिला योग्य स्थळ कसें मिळेल, ह्याची माधवराव व सरस्वतीबाई ह्यांनां फार काळजी लागली होती. मुलींसंबंधानें कुलशील, चालरीत, रूपरंग वगैरे पहाण्याचे प्रकारांत हुंड्याच्या हांवीचीहि भर पडल्यामुळें परीक्षकांची नजर फिरली ह्मणून पुष्कळ तेजोमय हिरे कोळसे भासूं लागले आहेत. अशा हिऱ्यांस योग्य अशा कोंदणांत बसविण्यास त्यांच्या मालकांस फारच त्रास पडत आहे. घरीं धड खायाला नसलें तरी चालेल, पण बाहेर ऐट करून एखाद्या शाळेंत अगर नशिबानें कॉलेजांत नांव घातलें ह्मणजे झालें! मग 'सिव्हिल सर्व्हंट, बॅरिस्टर किंवा डॉक्टर व्हावयास मला विलायतेस जावयाचें आहे,' ही सबब, अडलेल्या एखाद्या उपवर झालेल्या मुलीच्या बापापासून त्याच्या सामर्थ्यापलीकडे कर्ज काढवून पैसे उकळण्यास पुरी होते! अशा अनेक कारणांनीं माधवराव अगदीं जिकिरीस आले होते. कोणत्याहि बाजूनें नांव न ठेवतां येण्याजोगी उत्तम, सुलक्षणी अशी आपली मुलगी असून तिला अनुरूप वर मिळूं नये, ह्याबद्दल त्या सच्छील दांपत्यास राहून राहून आश्चर्य वाटे व दुःख होई. गोदावरीहि चांगली समजूतदार होती. आपण आपल्या मातापितरांचें एक काळजीचें स्थान होऊन बसलों आहों, ह्मणून तिलाहि फार वाईट वाटे. स्वतांविषयींचे विचार तिच्यासुद्धां मनांत येत. परंतु आपलें दुःख तिनें कधींहि बाहेर दर्शविलें नाहीं. माधवरावांनीं तिला घरींच लिहावाचावयाला शिकविलें होतें. स्वतः ते व सरस्वतीबाई तिला नेहमीं चांगलीं पुस्तकें वाचून दाखवीत, व चांगल्या माणसांचीं उदाहरणें तिच्यापुढें ठेवीत. गृहिणी होण्यास योग्य व आवश्यक असें गृहशिक्षण सरस्वतीबाईनीं मोठ्या काळजीनें गोदूस दिलें होतें. अशा गुणांचें चीज करणारा पती आपल्या गोदूला कसा मिळेल, ही काळजी त्या दांपत्यास सारखी लागली होती. नारायणरावांनांच जामात करण्याचें त्यांच्या मनांतून फार होतें. त्यांची त्यांनां लहानपणापासून माहिती असल्यामुळें आपल्या मुलीला हाच वर योग्य आहे, असें माधवराव व सरस्वतीबाई ह्या दोघांनांहि वाटत होतें व ह्यासंबंधानें त्यांनीं नारायणरावांच्या वडिलांकडे गोष्टसुद्धां काढली होती. परंतु "पोरगा फार हट्टी आहे. मुलींच लग्न करणार नाहीं ह्मणतो. पुष्कळ प्रयत्न केले पण त्याच्या डोक्यांतलें वेड कांहींकेल्या जात नाहीं. तो आमचें कांहीं ऐकणार नाहीं," असें त्यांनीं कळविल्यामुळें माधवरावांचा नाइलाज झाला. त्यांच्यानें स्वतां नारायणरावांजवळ ही गोष्ट काढवेना. कारण सोक्षमोक्ष करून एकदम एखादे वेळेस नकार घेण्याचें धाडस

त्यांच्यानें करवेना. परंतु त्यांनीं नारायणरावांवरून दृष्टि न काढतां दुसऱ्या पुष्कळ ठिकाणीं तपास केला, पण कांहींना कांहीं अडचणी येऊन त्यांनां योग्य स्थळ सांपडलें नाहीं. इतर गोष्टींकडे लक्ष्य देऊन घटकाभर मुलीच्या लग्नाचा विचार सोडून दिला व तत्संबंधीं काळजी थोडी दूर सारूं ह्मटलें, तरी गोदावरीवरून वर्षें लोटावयाचीं थोडींच राहतात ! ती दिवसानुदिवस जशी वाढूं लागली, तशी तिजबरोबर तिच्या आईबापांची काळजीहि वाढूं लागली, आणि त्याचा परिणाम गोदावरीच्या प्रकृतीवरहि दिसून येऊं लागला. गोदावरी बाहेरून जरी आनंदी मुद्रा धारण करी, तरी तिच्या मनाला बिलकूल स्वास्थ्य नसे. आपल्या हितासाठीं निरपेक्ष बुद्धीनें रात्रंदिवस झटणाऱ्या आईबापांच्या अगोदरच त्रस्त झालेल्या मनाला आपल्याला दुःखी पाहून जास्त दुःख होऊं नये ह्मणून ती फार प्रयत्न करी. आपणाला मनाजोगता पती मिळून आपली व आईबापांची काळजी दूर व्हावी, ह्मणून ती मनोभावानें ईश्वराची प्रार्थना करित असे. अशा रीतीनें दिवस जात असतांना मुंबईस प्लेग सुरू झाला, माधवरावांनीं माटुंग्यास जागा भाड्यानें घेऊन एक झोंपडें काढलें व ते नारायणरावांसहित तेथें रहाण्यास गेले.

४

माटुंगा स्टेशनापासून माधवरावांच्या झोंपडींत जाण्यास सातआठ मिनिटें लागत. माधवरावांनीं जागा चांगली प्रशस्त घेऊन झोंपडींत होतांहोईल तितकी घरासारखी सोय केली होती. वरून उन्हाचा त्रास होऊं नये ह्मणून वरच्या तक्त्यांवर झावळ्या घालून त्यावर गवत पसरलें होतें. झोंपडीबाहेर काम्पाउंड करून मुद्दाम पैसे खर्चून शौचकूप, नळ, वगैरे स्वतंत्र व्यवस्था करून घेतली होती. शेजारींच एक पोलीस चौकी असल्यामुळें चोरांची वगैरे भीति मुळींच नव्हती. हेंच हल्लीं नारायणरावांचें रहाण्याचें ठिकाण. त्यांनां पहांटेस उठून पहिल्या गाडीनें ऑफिसांत जावें लागे. ते उठण्यापूर्वींच हातपाय धुण्यासाठीं बंबांत गरम पाणी तयार असे. तेथेंच जवळ एक पाट ठेविलेला असून शेजारीं दोन गरम पाण्यानें भरलेले तांबे व हात तोंड धुण्यास पानावर राख राखुंडी असे. नजिकच स्नानाचे जागीं दगडाजवळ एक गरम पाण्यानें भरलेलें घंगाळ, व एक थंड पाण्याची कळशी आणि साबण असून तेथल्याच दांडीवर टॉवेल व चुण्या काढलेलें धोतर असे. इकडे मधल्या खणांत गारेच्या टेबलावर एका ल्हानशा तरडींत गंध, आरसा वगैरे असून उपहारार्थ फराळाचे जिन्नस व चहा असे. नंतर ऑफिसांतल्या कागदांचें पाकिट घेऊन नारायणराव गाडीवर जाण्यास

निघत त्यावेळीं झोंपडीच्या एखाद्या खिडकींत कोणी उभें असल्याचा त्यांनां सहज भास होई. पाकीट जरा जड कां लागतें ह्मणून गाडींत जाऊन उघडून बघतात तों त्यांत एका स्वच्छ पांढऱ्या रुमालांत बांधलेला एक लहानसा डबा आढळे. आपल्यासाठीं माधवरावांकडील मंडळी उगीच फार त्रास घेते, हें पाहून त्यांनां वाईट वाटे. पण ऑफिसांत गेल्यावर दुपारीं एक दिडाच्या सुमारास अतिशय काम व भूक ह्यामुळें दमून गेल्यामुळें मधल्या रजेंत डब्यांतला फराळ खाऊन व वर थोडें पाणी प्याल्यानंतर पूर्वींचा थकवा जाऊन पुन्हा काम करण्यास त्यांनां उत्तेजन येई. ह्यावेळीं माधवरावांच्या घरच्या मंडळीचा दूरदर्शीपणा पाहून त्यांनां फार आनंद होई. माटुंगा स्टेशनावरून माधवरावांच्या झोंपडींत जाण्याचा रस्ता शेतवडींतून असल्यामुळें रात्रीं परत जातांना मोकळी स्वच्छ हवा लागून नारायणरावांला फार हुषारी येत असे. खाणावळींतील ठराविक प्रकारच्या अन्नानें त्यांचा आहार अगदीं कमी झाला होता. पण इकडे आवड नावड आपोआप ओळखून माधवरावांच्या घरांतील प्रेमळ मंडळीनें भोजनाचे केलेले निरनिराळे प्रकार रुचकर लागून त्यांच्या प्रकृतीस मानवत. त्यांनां वेळेवर भूक लागूं लागली. त्यांचें पित्तप्रकोपामुळें वारंवार डोकें दुखणें बंद झालें. रोज रात्रीं माधवराव नारायणरावांबरोबर जेवावयास बसत. सरस्वतीबाई सकाळीं स्वयंपाक करीत ह्मणून, किंवा शिक्षण देण्यासाठीं ह्मणून, रोज संध्याकाळीं जेवण करण्याची पाळी गोदावरीची असे. सरस्वतीबाई स्वतां जवळच उभ्या राहून मुलीच्या स्वयंपाकावर व वाढण्यावर देखरेख करीत; अथवा आपल्या मुलीची व्यवस्था व टापटीप पहात उगीच कौतुकानें उभ्या असत. सरस्वतीबाईंच्या हाताखालीं तयार झालेली गोदावरी स्वयंपाक करण्याच्या कामांत फारच निष्णात झाली होती. ती वाढीत असतांना माधवराव मधूनमधून तिनें केलेल्या पदार्थांची रुची घेऊन योग्य अशी त्यांची प्रशंसा करून तिला उत्तेजन देत. पण एखादे वेळेस एखाद्या पदार्थाबद्दल जेव्हां ते नारायणरावांचें मत विचारीत, तेव्हां त्यांची तारांबळ उडे. त्यांच्या तोंडांतून स्पष्ट शब्दसुद्धां बाहेर येत नसत. पण ते स्तुतिपर शब्द नारायणरावांच्या मुखांतून किती जरी हळू निघाले तरी ते गोदावरीला स्पष्ट ऐकूं येत व तिच्या कानांत सारखे गुणगुणत रहात. स्वयंपाकघरांतून बाहेर वाढण्यासाठीं नारायणरावांच्या पानाकडून माधवरावांच्या पानाकडे व तेथून परत स्वयंपाकघरांत जातांना गोदावरी शुक्राच्या चांदणीसारखी चमकत असे. आईबापांचा पूर्णपणें संपादन केलेला विश्वास व लोभ, टापटीप

व्यवस्थेशीरपणा, काम करण्याची हौस, मनाचा मोठेपणा व कनवाळूपणा, ाचनानें व उपदेशानें विकास पावलेली विचारशक्ति, परोपकार करण्याची सर्गिक आवड, व ह्याशिवाय तिच्या इच्छेविरुद्ध हजारों लहानसहान गोष्टींनीं गोचर होणारें आपणावरील तिचें अत्युत्कट सात्विक प्रेम वगैरे हळूहळू सर्व ारायणरावांस दिसूं लागलें. आपली कळकळ बाळगून आपलेवर प्रेम करणाऱ्या टरोडवरील चाळींतील स्नेह्यांच्या वर्तनाहून येथला प्रकार त्यांनां कांहीं निराळाच ासूं लागला. चाळींतील स्नेहीवर्ग आपण सांगूं तें काम वाटेल तेव्हां करण्यास यार असे खरा; पण आपणाला कोणत्या गोष्टीची आवश्यकता आहे व आपली च्छा काय आहे हें न सांगतां आपोआप कळून त्याप्रमाणें वागण्याची एकदम ासर्गिक स्फूर्ति उत्पन्न होण्यास दोन अन्तःकरणांची ऐक्यता असावी लागते, : त्यांनां आतां कळून आलें. सुखी होण्यास नुसता पैसा किंवा स्नेहीमंडळ पुरेसें ोत नाहीं. सुकुमार देहधारी व कोमल मनाचे कांहीं दैविक प्राणी परमेश्वरानें त्पन्न केलेले आहेत; त्यांच्या मदतीवांचून खरें व पूर्ण सुख चिरकाल मिळणें ाक्य नाहीं; असें त्यांनां वाटूं लागलें.

[ ५ ]

ुके दिवशीं रात्रीं जेवतांना वेळ पाहून माधवरावांनीं गोदावरीच्या लग्नाचा ्षय काढला. गोदावरी त्यावेळीं वाढित होती. तिचा चेहरा एकदम गोरामोरा ोऊन गेला. माधवरावांनीं मुलगी आतां फार मोठी झाली, तिला लवकरच योग्य थळ पाहिलें पाहिजे, अशी सुरुवात करून आपण केलेल्या अनेक निष्फळ यत्नांचा हृदयद्रावक पाढा वाचला व मग ते म्हणाले "खरंच कारे नारायण, ुझा लग्न न करण्याचा निश्चय कायम झाला आहे?"

ा प्रश्न ऐकून नारायणरावांला एकदम गहिंवर आला. त्यांनीं वर मान केली ों गोदावरी कायसें वाढण्यासाठीं त्यांचे पानाजवळ आली होती तिची व त्यांची ृष्टादृष्ट झाली. अश्रुपूरित केंविलवाणा गोदावरीचा तो मुखचंद्रमा दृष्टीस पडतांच ारायणरावांचे अंतःकरणांत प्रकाश पडला. आपल्या अंतःकरणाशीं एकरूप ालेल्या अंतःकरणाच्या स्वामिणीबद्दल त्यांच्या मनांत प्रेमभाव उत्पन्न झाला. ा दोन प्रेमळ व सात्विक मनांचा संयोग झाल्यामुळें नारायणरावांला दिव्यदृष्टि ाप्त झाली व आपल्या हृदयांत विराजमान झालेल्या त्या कोमल कुमारिकेच्या ानाची स्थिति त्यांच्या एकदम पूर्णपणें ध्यानांत आली. त्यांच्याहि डोळ्यांतून ाश्रु वाहूं लागले. आलेला हुंदका त्यांनीं मोठ्या कष्टानें आंवरला. विनाकारण

आपण इतके दिवस माधवरावांस व त्यांचे मंडळीस त्रास दिला म्हणून त्यांचें मन त्यांनां फार खाऊं लागलें. आपला निश्चय पार गुंडाळून ठेवून ते गहिंवरून ह्मणाले "असलें अमूल्य रत्न आपण मला अर्पण करणार हाच उलट आपला मजवर उपकार आहे. मी हें जिवापलीकडे जपून ठेवीन. खरोखर मला ह्याची किंमत आजवर कळली नव्हती. ह्याची योग्यता किती आहे हें मला आतां पूर्णपणें कळलें आहे. हें रत्न अर्पण केल्याबद्दल मीं आपणांला कधींहि पश्चात्ताप होऊं देणार नाहीं."

सरस्वतीबाईचा आनंद गगनांत मावेना. नारायणरावांच्या वडिलांची माधवरावांनां पूर्वींच परवानगी मिळाली होती. आपणावरील मोठें काळजीचें ओझें दूर झालें ह्मणून त्यांनां फार बरें वाटलें. गोदावरीच्या मनाची स्थिति कशी वर्णन करणार? तिला आतां पूर्णपणें ओळखणारा एक नारायणच ती जाणे!

झालें. प्लेगचे दिवस निघून गेले व त्यांबरोबर माधवराव व सरस्वतीबाई ह्यांचा संकटकाळहि संपला. पुढें लवकरच सुमुहूर्तावर नारायणराव व गोदावरी ह्यांचा विवाह झाला. नारायणरावांच्या सर्व स्नेह्यांनीं येऊन लग्नमंडप सुशोभित केला. नारायणरावांच्या वडिलांनीं मोठ्या प्रेमानें सुनेचें नांव लक्ष्मी ठेविलें. लक्ष्मीनें आपल्या सुस्वभावानें सर्व सुनांबद्दल सरसकट ठरविलेलें वाईट मत नारायणरावांस आपल्या उदाहरणानें बदलण्यास लाविलें. निदान नारायणरावांनीं घालून दिलेल्या नियमाला कांहीं अपवाद असतात, हेंतरी तिनें त्यांनां स्पष्ट रीतीनें दर्शविलें. नारायणराव आतां आपल्या प्रेमळ पत्नीच्या सहवासांत सुखानें दिवस घालवूं लागले. मात्र दामुअण्णानें थट्टेनें ह्मटल्याप्रमाणें ते आपल्या स्नेह्यांस विसरले नाहींत. कोणीहि स्नेही भेटण्यास आला असतां, ह्या लक्ष्मीनारायणास अकृत्रिम आनंद होत असतो.

* * * * * *

अर्जुन संकटांत पडलेला पाहून ज्याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णांनीं 'शस्त्र हातांत धरणार नाहीं' ह्मणून केलेली प्रतिज्ञा मोडिली, त्याचप्रमाणें दीन, कोमल, गुणी बाला गोदावरी संकटांत पडलेली पाहून नारायणानें आपली प्रतिज्ञा मोडिली!

## गोष्ट ३१ वी.
## झोंपडींतील प्रेम.

अगदीं फुटक्या तिनसांजची वेळ. हरबा पोवार हळूहळू आपल्या झोंपडीचा रस्ता सुधारित होता. बिचाऱ्यानें कसब्यांत सारा दिवस मोलमजुरीचे काबाडकष्ट करून अवघे तीन आणे कमाविले होते. आज हरबा हेलपाटी करण्याकरितां रोजच्याप्रमाणें गेला होता खरा, परंतु त्याचें चित्त कामांत नव्हतें. तें, तापानें फणफणून व ऊर्ध्वानें बेजार होऊन झोंपडींत खाटेवरील घोंगडीच्या रकट्यावर अत्यवस्थ पडलेल्या धाकट्या साळीकडे गुंतून राहिलें होतें. शून्य मनानें कसेंतरी बिगाऱ्याचें काम दिवसभर करून, हरबा आतां तीन आणे पदरीं बांधून आपल्या मकाणाकडे जात होता. अलीकडे हरबाची प्रकृती बरेच वर्षे ढांसळली होती, आणि आतां कमाई चांगलीशी न झाल्यामुळें या तीन आण्यांत चार पोरांचें व बायकोचें पोट कसें भरावें आणि त्यांतहि आजारी पडलेल्या धाकट्या साळीच्या औषधपाण्याची किंवा वैद्यबोवांनां आणण्याची कशी तजवीज लावावी, ही काळजी त्याच्या रक्ताचें पाणी करून सोडित होती. घरीं केव्हां पोंहचेन व त्या पोरीला केव्हां पाहीन अशी हरबाला अत्यंत उत्कंठा लागली होती; परंतु कुटुंबाच्या पोषणापुरतीहि कमाई आपल्या हातून होत नाहीं व आपली पोरगी मरत असतांहि आपल्या हातून औषधपाण्याची तजवीज घडत नाहीं, ही कल्पना मनांत येऊन उद्वेग, निराशा व संकोच यांचा उद्भव त्याच्या अंतःकरणांत झाला होता व त्याचें पाऊल झपझप उठत नव्हतें.

हरबाची खोपटी कसब्यापासून सुमारें दीड मैलावर होती. त्याच्या मालकीचा असा एक वीतभरहि जमिनीचा तुकडा नव्हता. कसब्यांत जागा भाड्यानें घ्यावी, तर त्याच्या मिळकतीच्या तिसऱ्या हिश्शाची भाड्यांतच चांदी आटणार ! तेव्हां त्यानें कसब्यापासून दीड मैलावर एक लहानसें शेत मक्त्यानें केलें होतें व तेथेंच मांडवबजा चार मेडींचें झोंपडें एका माळावर उभें करून त्यांत तो आपला निर्वाह कसातरी करून घेत असे.

प्रथम प्रथम हरबाचें ठीक जुळलें होतें. नवरा बायको दोनच सडीं माणसें होतीं, तोंपर्यंत मोलमजुरी करून त्यांचा सुरेख गुजारा होई. परंतु पुढें जसजसा पोरवळा वाढून कुटुंबविस्तार होऊं लागला, वारंवार दुष्काळाचीं सालें भेटी देऊं लागलीं, व दुखण्याबाण्याचा पाय घरांत शिरूं लागला, तसतशी या कुटुंबाची अगदीं दैना उडत चालली. अशा प्रकारच्या संकटांचीं लागोपाठ सहासात

वर्षे आल्यामुळें हरबाला जो एकदा हिसका बसला त्यांतून तो कांहींकेल्या सांवरेच ना! सालोसाल मुलांची पलटण व खर्चाच्या बाबी सारख्या वाढत्या प्रमाणावर, आणि अनेक कारणांमुळें कमाई मात्र उतरत्या प्रमाणावर! एकंदरींत कर्जाचा खाडा जो एकदा पडला, तो कालक्रमानें जास्त जास्त खोलच होत गेला. हरबाच्या नशीबीं दुःखांत सुख इतकेंच होतें कीं, त्याची बायको सुस्वभावी, पापभीरु, प्रेमळ व कामसू होती. तिला कधीं धुसपुस किंवा भांडणतंटा ह्मणून कसा तो मुळींच माहीत नव्हता. पोरवळा वाढण्यापूर्वीं ती नवऱ्याच्या बरोबरीनें कमाई करित असे. परंतु आतां कुटुंब फारच वाढल्यामुळें व अद्याप हातभार लावण्यासारखीं कोणतींहि मुलें न झाल्यामुळें आणि दुखण्याच्या रूपानें अवदशेचा पाया घरांत शिरल्यामुळें, तिला आतां घरचेंच काम पुरे पुरेसें होत असे; परंतु ती कधींहि कुरकुर करित नसे किंवा असंतोष दाखवित नसे. घरचें व मुलांबाळांचें काम आटोपून तिला जो कांहीं रिकामा वेळ सांपडे, तितक्या वेळांत जवळच्या रानांतून फाटें लांकूड आणावयाचें, कोणाचें दळणकांडण करावयाचें व अशा प्रकारचीं दुसरीं अल्पस्वल्प कामें करून संसारगाडा हांकावयाचा हा तिचा क्रम असे. नवऱ्याची कमाई कमी असो वा जास्ती असो, ती त्याशीं अत्यंत प्रेमभावानें वागत असे. त्याचा उपमर्द करणें किंवा त्रासिकपणाचें वर्तन ठेवणें किंवा तुसट बोलणीं बोलणें, हें तिच्याहातून कधींहि घडलें नाहीं.

असो. आरंभीं सांगितल्याप्रमाणें हरबा शून्यमनानें व श्रान्त मुद्रेनें हळुहळू आपल्या झोंपडीचा मार्ग आक्रमित होता. कसबा सोडून तो सुमारें सव्वा मैल गांवाबाहेर आला होता व त्याची झोंपडी केवळ हांक दीड हांक इतक्याच अंतरावर होती. सूर्य अस्ताला जाऊन त्याचा संधिप्रकाशहि बहुतेक नाहींसा झाला होता. वातावरण धूसर होऊन सृष्टिस्वरूप अस्फुट झालें होतें. रस्त्याच्या उजव्या हाताला असलेलें भुरटें रान व त्याच्या पलीकडची गर्द झाडी व डोंगरांची रांग अगदीं पातळ पडद्यांत झांकल्याप्रमाणें दिसत होती. परंतु हरबाचें या गोष्टींकडे मुळींच लक्ष्य नव्हतें. त्याचें मन चिंताविव्हळ झालें होतें. डोळे शून्य दृष्टीनें वारंवार अव्यक्त प्रकाशांत गुरफटलेल्या रस्त्याच्या डाव्या हाताकडे दूरवर असणाऱ्या झोंपडीकडे वळत होते. एक लुकलुक करणारा दिवा झोंपडीची जागा स्पष्ट दाखवित होता. त्या दिव्याजवळ मुलीला मांडीवर घेऊन बसलेली व काळजीनें सुकलेली एक बाई होती. ती तितक्या अंतरावरून जरी हरबाला

दिसत नव्हती, तरी तिची मूर्ती व तो झोंपडींतील एकंदर देखावा यावेळीं हरबाच्या मनांत घोळत होता, हें आम्ही खात्रीनें सांगतों.

अशा रीतीनें हरबा रस्त्यानें चालला आहे, तोंच त्याला पायाला कसलीशी ठोकर लागून तो जमिनीवर कोलंडला. त्यासरशीं झटकन भानावर येऊन मोठ्या प्रयासानें स्वताला सांवरून आपण कशाला अडखळलों हें नीट पहाण्याकरितां म्हणून तो खालीं वांकला, तों त्याच्या दृष्टीला एक लोळ गोळा होऊन अस्ताव्यस्त पडलेला मनुष्य दिसला! हरबानें निरखून पाहिलें, तों तो इसम मृतप्राय झालेला आहे असें त्याला वाटलें व त्याची कांहींच हालचाल नाहीं हें पाहून तर हरबाची शंका दृढच झाली. क्षणैक हरबाला आपल्या स्वताच्या दुःखाचा विसर पडला व "अरेरे, बिचारा गरीब प्राणी!" असे दुःखोद्गार त्याच्या तोंडांतून बाहेर पडले. नंतर भूतदयेनें प्रेरित होऊन शक्य असल्यास त्या दुर्दैवी प्राण्यास साह्य करावें म्हणून तो खालीं बसला व त्या इसमाचा हात त्यानें आपल्या हातांत धरला. हरबा लागलाच चमकला. कारण तो हात म्हणजे काल्यासारखा गार होता. तेव्हां त्याला धुगधुगी तरी आहे कीं नाहीं हें पहाण्याकरितां हरबानें त्याचा अंगरखा वर करून पाहिला, छातीला हात लाविला, पण जीवंतपणाचें कांहींच चिन्ह आढळून आलें नाहीं. हा मनुष्य कोण असावा याचा हरबाला कांहींच अंदाज होईना. परंतु तो मुसलमान व चांगला श्रीमंत होता, असें त्याच्या पोशाखावरून स्पष्ट होत होतें. हा मेलेला इसम कोणीतरी श्रीमंत मुसलमान आहे, हें लक्ष्यांत येतांच हरबाला एक नवीच काळजी डंवचूं लागली!

ते दिवस म्हणजे ऐन मुसलमानी अंमलाचे. मुसलमानी सत्तेंत बेबंदशाईचा काय रंग उडत असे, तें इतिहासज्ञांस विदितच आहे. ज्याच्या हातीं ससा तो पारधी! जिकडे तिकडे अरेरावी! मुसलमानांच्या सर्व प्रकारें चालावयाच्या मिजासी, आणि हिंदूंच्या हरतऱ्हेच्या हालअपेष्टा व परोपरीच्या मानहानी! हिंदूंचे दिवसाढवळ्या जरी खून पडले, तरी कधीं कधीं त्यांची दाद ना फिर्याद, तसेंच चेपून जात असे! हिंदू म्हणजे काय हरामजादे! मेले तर जाहलममध्यें गेले! पण मुसलमानाचा जर का एखादा खून झाला आणि खुनी मनुष्य सांपडला नाहीं, तर काय? आकाशपाताळ अगदीं एक होऊन जावयाचें! आसपासच्या हिंदू रहिवाशांवर सरसकट गदा फिरावयाची! खुनी मनुष्य सांपडेपर्यंत आसपासच्या हिंदूंनींच खून केला असें गृहित धरण्यांत येत असे व मग त्यांची जी कांहीं हेलपाटणी, हिसकाहिसक व जाचणूक होत असे, ती कांहीं विचारूंच

नये. लष्करी अंमलच तो! कोणालातरी धरावयाचा, कांहींतरी पुरावा द्यावयाचा व फौजदारांनीं आणि काजींनीं द्यावयाचे हिंदू सैतानांनां बळी! तेव्हां या सर्व भावी गोष्टी हरबाच्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभ्या राहिल्या व आतां पुढें काय करावें या विवंचनेंत तो पडला. कसबा मागें मैला सव्वामैलावर राहिला. आसपास आपल्या झोंपडीशिवाय कोणाचीहि वस्ती नाहीं. तेव्हां उद्यां खरा गुन्हेगार न सांपडला तर ही सर्व तोहमत आपल्यावरच येणार, कदाचित् तशाच दुसऱ्याहि हिंदु लोकांनां विनापराध विटंबना सहन कराव्या लागणार व अखेर 'चोर सुटून संन्यासी सुळावर लटकण्याचा प्रकार' पहाण्याचें बहुधा नशिबीं येणार, हें हरबा तत्काळ समजून चुकला. ही संकटपरंपरा टाळण्याला काय युक्ति करावी या विचारांत तो क्षणभर गुंगला. नंतर त्याचा कांहींतरी निश्चय झालासें दिसलें व जरा रस्त्यांत खालींवर बघून कोणीहि माणूस आसपास नाहीं अशी त्याची खात्री झाल्यावर त्यानें त्या प्रेताला मोठ्या प्रयासानें उचलिलें व तो रस्त्याच्या उजव्या बाजूकडील भुरट्या रानांत घुसला. प्रेताला अर्धवट उचलीत व अर्धवट जमिनीवरून फरफटित हरबा सुमारें शंभर सवाशें कदम गेला. तेव्हां त्याला एक खड्डा आढळला. खड्ड्याच्या तोंडाशीं उभें राहून हरबानें तें प्रेत कसेंतरी त्यांत लोटून देण्याकरितां जरा अधिक उंच उचलण्याचा प्रयत्न चालविला. इतक्यांत प्रेताच्या अंगरख्याखालीं कांहीं कठिण, रांठ वस्तू असल्याचा त्याला भास झाला. तत्क्षणीं हरबाच्या मनांत एक चमत्कारिक कल्पना उद्भवली व त्याची छाती धडधडूं लागली. कारण ती वस्तू पैशाची पिशवी होती. या वेळपर्यंत हरबाच्या मनाला द्रव्याचा विचारहि शिवला नव्हता. परंतु ती द्रव्याची पिशवी पहातांच त्याच्या तोंडाला आतां पाणी सुटूं लागलें. हरबा पापभीरू होता, पण तो पैशांच्या अडचणींतहि होता. त्याची मुलगी घरीं अगदीं मरणोन्मुख होऊन पडली होती. तिचे प्राण वांचवायचे, ह्मणजे वैद्यबोवांनां आणिलें पाहिजे व वैद्यबोवांनां आणावयाचें ह्मणजे पिशवींत कांहींतरी नाणें खुळखुळलें पाहिजे, हेंहि तो पूर्णपणें समजून होता. त्यानें आपल्या मनाशीं असा कोटिक्रम केला कीं "या मेलेल्या माणसाबरोबर हा पैका आपण खळग्यांत टाकून दिला, तर त्याचा त्याला काय उपयोग? बरें आपण जर हा पैका घरीं नेला, तर तो मरणाच्या तोंडीं पडलेल्या एका दीन पोरीला वांचवण्याच्यातरी कामीं येईल. अशा वेळीं हें नाणें प्रेताबरोबर टाकणें निव्वळ मूर्खपणाचें व निर्दयतेचें होईल. ईश्वरीसंकल्पच असा दिसतो, कीं हा बिचारा मुसलमान

अकस्मात् प्राणांस मुकावा व आमच्या साळीचे प्राण वांचावे." असा विचार करून हरबानें ती पिशवी आपल्या कमरेला बांधली व प्रेत खाड्यांत लोटून दिलें. नंतर त्यावर घाईघाईनें थोडींशीं पानें वगैरे पसरून तो ह्मणाला "बाबारे, तूं इथें सुखानें रहा आणि आमच्या हिंदू लोकांच्या राशीस येऊं नकोस." असें ह्मणून हरबा त्या ठिकाणाहून चटकन् फिरला व आतां एक प्रकारच्या उल्हासानें उत्तेजित होऊन तडक आपल्या झोंपडीकडे गेला. त्यावेळीं चांगलाच काळोख पडून सुमार अर्धा प्रहर रात्र झाली होती.

झोंपडीचा दरवाजा अर्धवट उघडा होता. हरबानें उजव्या हातानें दरवाजा लोटला व आंत पाऊल टाकून तो मोठ्या आनंदानें आपल्या बायकोस उद्देशून ह्मणाला "अग ए! ऐकलेंस का? आतां तूं अगदीं स्वस्थ अस. उद्यां सकाळींच वैद्यबोवांना घेऊन येतों." असें ह्मणून हरबा झोंपडींतल्या एका कोपऱ्यांत असलेल्या खाटेजवळ गेला.

हरबाची बायको—लक्ष्मी—ही त्या खाटेच्या गातावर सचिंत मुद्रेनें बसली होती. नवरा घरीं दमूनभागून आला ह्मणजे त्याला पेजपाणी तरी तयार करून ठेवलें पाहिजे ह्मणून तिनें नुकतीच चूल पेटवून त्यावर गाडग्यांत पाणी तापत ठेविलें होतें. पण इतक्यांत साळीच्या अंगाची तापानें लाही उडाल्यामुळें व 'पाणी पाणी' ह्मणून ती कंठशोष करित असल्यामुळें लक्ष्मीनें तिला एक घोंटभर पाणी आणून दिलें व काम करण्याचें मुळींच सुचत नाहींसें झाल्यामुळें तेथेंच खाटेच्या गातावर हातावर गाल टेंकून अगदीं चिंताग्रस्त होऊन शून्य दृष्टीनें त्या तापानें फणफणलेल्या व उष्ण ऊर्ध्वश्वास सोडणाऱ्या पोरीकडे पहात बसली. दुसरीं मुलें केंव्हांच भाकरीतुकडा खाऊन घोंगड्यांच्या रकटांवरून घोरत पडलीं होतीं. त्यावेळीं सर्वत्र शांतता असून साळीचें कण्हणें व भात्याप्रमाणें तिच्या फुफ्फुसाचें चाललेलें अव्याहत सोसावणें याशिवाय कांहींच ऐकूं येत नव्हतें. पोरीची ती तळमळ पाहून लक्ष्मीचें हृदय अगदीं तुटत होतें. ती दुःखानें व काळजीनें इतकी व्यग्र झाली होती कीं, चूल बहुतेक विझत आली होती हें तिच्या लक्ष्यांत आलें नाहीं किंवा आपल्या नवऱ्याला नेहमीपेक्षां आज फाजील उशीर झाला याचेंहि तिला भान राहिलें नाहीं. असो. अशा स्थितींत ती असतांना हरबानें दार लोटलें व वरील आनंदाचे शब्द उच्चारले तेंव्हां विजेचा धक्का लागल्याप्रमाणें लक्ष्मी दचकून उठली व हर्षातिरेकानें

उद्गारली "अं काय ह्मणतां, काय ह्मणतां ? जय भवानी माते, हेच शब्द खरे कर नि माझ्या पोरीला जीवदान दे. खरंच का उद्यां वैद्यबोवांनां आणणार ?"

बायकोची ही उत्सुकता व हा आनंद पाहून हरबाला तशा प्रसंगांतहि कौतुक वाटलें. परंतु बायकोच्या प्रश्नाला उत्तर देण्यापूर्वीं आधीं खालीं वांकून खाटेवर पडलेल्या साळीचा मुका घेऊन ते ह्मणाले " बाळ, उद्यां करतों हो तुला बरी. पोरीचें नशीब बरें दिसतें आहे ! उद्यां उतार पडेल हो तुला, कांहीं घाबरूं नको."

हें ऐकून ती धाकटी साळी किंचित् हंसली व अशा प्रकारें तिनें आपलें समाधान व्यक्त केलें. नंतर हरबा बायकोकडे वळून ह्मणाले " उद्यां वैद्यबोवांनां आणायला काय हरकत आहे ? "

" हरकत ? हरकत कसली ? आठ दिवसांपूर्वींच वैद्यबोवा आले असते, तर नकोका होते ? पण त्यांनां पैसे हवेत ना ? तिथं तर घोडं अडलं आहे ?"

" त्याची नको काळजी आतां. पोरीच्या दैवानें आपल्याला तूर्त पैशांची वाण नाहीं !" असें ह्मणून हरबानें कमरेची पिशवी काढून बायकोला दाखविली. ती पिशवी पहातांच लक्ष्मी आश्चर्यचकित होऊन उत्सुकतेनें ह्मणाली " हे एवढे पैसे कुठून आणिलेत ?"

" ते मला वाटेंत सांपडले."

" पण हे दुसऱ्याचे पैसे आपण घेणं चांगलं का ? आणि हे आपल्याला पचावे तरी कसे ? हें परक्याचं द्रव्य आपल्याला कांहींतरी संकटांत लोटील."

" पण मी कांहीं कोणाचा खून केला नाहीं कीं कुठें चोरी केली नाहीं."

" तरी पण, पैसा दुसऱ्याचा ना ? तें अगदीं वीष आहे, त्याला न शिवणंच बरं नव्हे का ?"

" वेडे, आपण कोणालाहि अपकार न करितां किंवा कोणालाहि न फसवितां आपल्या हातांत इतके पैसे यावे, यांत कांहींतरी ईश्वराचा हेतु दिसत नाहीं का ? ईश्वरानें आपल्याला अवचित जें साह्य केलें आहे, त्याकडे पाठ करणें ह्मणजे पापच नव्हे का ? हे पैसे कांहीं मीं पापकृत्यानें मिळविले नाहींत. ते ईश्वरीलीलेनेंच माझ्या हातीं आले आहेत. अहाहा ! या पैशांचा आपल्याला या वेळाला किती उपयोग आहे, पहा बरें ! ती पोर पाहिलीसना कशी मृत्युपंथाला लागली आहे ? ही पैशांची पिशवी ह्मणजे तिच्याकरितां परमेश्वरानें धाडलेली अमृताची कुपीच नव्हे का ?"

ह्या शेवटच्या शब्दांचा लक्ष्मीच्या मनावर चांगलाच परिणाम झाला. आपल्या पोरीला पहावयाला वैद्य यावे, तिला उतार पडावा, ती पूर्वींप्रमाणें नाचूंबागडूं लागावी, आपल्याला पुन्हा सुखशांतीचे दिवस यावे, वगैरे सुखगोष्टींची आशा तिच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली व द्रव्याभिलाषाचा पगडा तिच्यावरहि बसला! झालें. दुसऱ्या दिवशीं वैद्य आणावयाचे, पोरीला औषधपाणी चांगलें सुरू करावयाचें, वगैरे बेत कायम झाले.

[ २ ]

दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें हरबा सकाळीं एक प्रहर दिवस आल्यावर वैद्यबोवांना आणण्याकरितां निघून गेला. हरबा बाहेर पडून रस्त्याला लागेपर्यंत लक्ष्मी दरवाजांत उभी राहून त्याचेकडे सारखी पहात होती व त्यानें हातीं घेतलेल्या कामगिरींत यश लाभो ह्मणून मनांतल्या मनांत देवाची करुणा भाकित होती. नवरा हमरस्त्याला लागल्यावर ती घरांत आली, व नंतर थोडें पेजपाणी करून तें साळीला बावापुता करून तिनें पाजिलें. साळीचा ताप आतां उतरला होता व थोडें पेजपाणी पोटांत गेल्यावर तिला जरा बरें वाटूं लागलें यावर लक्ष्मीनें तिला हळुहळू थोपटण्याला व एक प्रेमळ गाणें ह्मणण्याला आरंभ केला. त्या नादांत साळीला बराच आराम पडून तिचा जरा डोळाहि लागला. तेव्हां घरांतला वावर करण्याला लक्ष्मीला चांगलीच मोकळीक सांपडली. तिनें पडवींत जाऊन पुन्हा जाळ केला व चुलीवर पाणी चढविलें. तेव्हां घरांतलीं लांकडें संपलीं आहेत, ही गोष्ट तिच्या लक्ष्यांत आली. आज जवळजवळ आठ दिवस झाले, तिला घरांतून बाहेर कसें तें पडण्याला फुरसतच मिळाली नव्हती. चार पांच पोरांची उस्तवार करावयाची ह्मणजे कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. आणि तशांत साळीच्या दुखण्यानेंतर ती अगदीं जखडून टाकल्यासारखीच झाली होती. पण ती पोर आतां खाऊनपिऊन निजली आहे, तेव्हां या संधीला जरासें बाहेर जाऊन थोडींशीं लांकडें आणावीं, असें तिच्या मनांत आलें; आणि तसें करणें अगदीं जरूरहि होतें. कारण कोंपऱ्यांत नेमकीं एक कीं दोनच लांकडें शिल्लक होतीं. तेव्हां लक्ष्मीनें आपल्या मोठ्या मुलांना साळीकडे लक्ष्य ठेवावयाला सांगून व घरांतून कोठेंहि जाऊं नका असें बजावून, पडवीच्या निवाचा कोयता व दोरी काढली व ती झोंपडीच्या बाहेर पडली. लवकरच हमरस्ता ओलांडून ती त्या भुरक्या रानांत शिरली व ठिकठिकाणच्या जाळक्यांना व झाडांच्या फांद्यांना कोयता लावून सर्पण जमवित चालली. अशा रीतीनें लांकडें गोळा करित करित कर्मधर्म-

संयोगानें ती त्या पूर्वीच्या खड्ड्याशीं आली. तेथें कांहींतरी जमिनीवरून फरफटत खड्ड्याजवळ नेल्याच्या खुणा तिच्या दृष्टीस पडल्या. अर्थात् तिची जिज्ञासा एकदम चवताळली व ती त्या खाड्याजवळ जाऊन आंत डोकावून पाहूं लागली. आंत दृष्टि फेंकल्याबरोबर ती एकदम चमकली व भीतीनें चार पावलें मागें सरली ! पानांनीं व काटक्यांनीं अर्धवट झांकलेलें असें एक प्रेत तिच्या नजरेस पडलें; परंतु तत्क्षणीं तिच्या मनांत कांहींतरी चमत्कारिक कल्पना आली. तिचा चेहरा गंभीर व भयभीत झाला व ती पुन्हा किंचित् थरथरत त्या खाड्याच्या तोंडाजवळ गेली व आंत निरखून पाहूं लागली. तों मुडद्याच्या अंगावरील ते मोलवान कपडे पाहून तिला आपल्या नवऱ्यानें रात्रीं आणलेल्या पैशांच्या पिशवीची आठवण झाली. तिला भयंकर संशयपिशाचिकेनें पकडलें व तिच्या हृदयाचा अगदीं थरकांप झाला. आपल्या नवऱ्यानें हा खून करून—एका श्रीमंत मुसलमानाचा खून करून—डल्ला मारला, ही कल्पना तिच्या मनाला तीव्र विषारी शल्याप्रमाणें टोंचूं लागली व ही सर्व गोष्ट उघडकीस आली ह्मणजे आपल्या कुटुंबाची काय दुर्दशा व वाताहात उडेल त्याचें भयजनक चित्र तिच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. हा खून उघडकीस आला, तर आपल्या कुटुंबाचा उच्छेद होईल, आपल्या नवऱ्याची अब्रू जाऊन तो सुळावर लटकून मरून जाईल, वगैरे घोर कल्पनांनीं तिच्या डोक्यांत अगदीं काहूर उडवून दिलें. हें प्रेत येथून काढिलें व दूर कोठेंतरी नेऊन टाकिलें, तर कदाचित् हा खून लपेल व आपल्या नवऱ्याची अब्रू व जीवित सुरक्षित होतील, असा विचार तत्क्षणीं त्या दुर्दैवी स्त्रीच्या मनांत आला व तिनें तो लागलाच अंमलांत आणण्याचा उपक्रम केला. ती लागलीच त्या खळग्यांत उतरली व कसेंतरी कडेपोटावर तें प्रेत तिनें बाहेर ओढून काढिलें व मोठ्या प्रयासानें ओढितओढित तें दूर रानांत नेऊन एका जाळींत चांगल्या रीतीनें लपवून ठेविलें. नंतर भीतीनें गांगरून तिनें तेथून पळ काढिला. पूर्वस्थळीं आल्यावर जीं काय थोडींशीं लांकडें जमलीं होतीं तीं व कोयता हीं घेऊन लक्ष्मी कशीबशी एकदाची घरीं आली. वाटेंत तिच्या मनांत अर्थात् तो मुडदा व त्याच्याशीं आपल्या नवऱ्याचा संबंध यासंबंधानेंच विचार एकसारखे घोळत होते. एक मन तिला सांगे कीं, असें निर्दय मांगाचें कृत्य आपल्या घरधन्याच्या हातून कधींच घडावयाचें नाहीं; पण लागलेंच दुसरें मन सांगे कीं, द्रव्यलोभ फार कठिण आहे. तो कोणाला कशी भुरळ घालील याचा नेम नाहीं ! एकंदरींत तिचें मन

द्विधा झालें होतें व संशय, भीति आणि वहीम यांनीं तिला अगदीं ग्रासून टाकिलें होतें.

[ ३ ]

लक्ष्मी घरीं आली, तरी हरबा किंवा वैद्यबोवा यांचें मुळींच ठिकाण नव्हतें. आपल्या अस्वस्थ मनाला कांहींतरी शांतता यावी, ह्मणून लक्ष्मी लागलीच घरकाम करूं लागली. पण चित्त थाऱ्यावर नसल्याकारणानें कोणतेंच काम नीट होईना. कोठें कांहीं खुट् झालें कीं ती एकदम दचके. साळी कोठें जरा कण्हली, किंवा एखादें मूल धावलें तर आपल्याला कोणी धरायला नाहींना आलें, अशी तिची भावना होऊन ती हातची वस्तू टाकून ताडकन् उठे व कावऱ्याबावऱ्या नजरेनें इकडेतिकडे पाही. एखादें पोर ओरडलें, तर कोणी फौजदारचे शिपाईच आपल्या नवऱ्याला हांका मारित आहेत असा तिला भास होई व तिचें सर्वांग लटलटूं लागे. अशा स्थितींत ती असतांना एक मोठें लांकूड चुलींत शिरेना ह्मणून तें ती कोयत्यानें फोडूं लागली. इतक्यांत एका मुलानें पुढील-दार कोठें सहज वाजविलें, त्यासरशी लक्ष्मी इतकी घाबरली, कीं तिचा कोयतीचा नेम चुकून तिच्या पायावर लागला व त्यांतून भराभर रक्तस्राव होऊं लागला. तेव्हां लक्ष्मीनें चपळाई करून जखमेवर थंड पाण्याची धार धरिली व नंतर तिनें ती जखम ओल्या फडक्यानें बांधली. तरी पण रक्तस्राव चांगलासा बंद झाला नाहीं. यावर लक्ष्मीनें कसेंबसें घरांतलें काम आटोपलें, पोरांनां भाकरीचा तुकडा खाऊं घातला, साळीला पेजपाणी पाजलें व आपण नवऱ्याची वाट पहात बसली. नवऱ्याला इतका उशीर कां झाला, हें तिला मुळींच कळेना. त्याला वाटेंतच शिपायांनीं पकडला नसेलना, अशीहि भीति तिला जाचूं लागली. तिला कसें तें मुळींच चैन पडेना. सगळें घर अगदीं खावयाला आलें. ती पुन्हा पुन्हा दाराशीं जाई, दूरवर रस्त्याकडे नजर फेंकी, नंतर कोठेंहि नवऱ्याचें व वैद्याचें लक्षण दिसत नाहीं ह्मणून निराशेचा उसासा टाकी, व परत येऊन साळीच्या खाटेवर सचिंत बसे. अशाप्रकारें मध्यान्ह उलटून गेली, तरी वैद्याचा किंवा हरबाचा पत्ता नाहीं! लक्ष्मीची आतां मात्र पांचांवर धारण बसली. आपल्या नवऱ्याला सरकारी अधिकाऱ्यांनीं खास पकडलें असावें, असें तिला वाटूं लागलें व आतां पुढें काय करावें हें तिला मुळींच सुचेना! तिच्या खाटेपासून दरवाजापर्यंतच्या येरझारा मात्र वाढत चालल्या. एका खेपेला ती अशीच दारांत उभी असतांना रस्त्यावरून दोन मनुष्यें झोंपडीकडे येतांना तिला

दिसलीं. ते हरबा व वैद्य असावेत असा तिचा तत्काळ समज होऊन तिचा चेहरा आनंदानें खुलला व आपल्या नवऱ्याला घरीं सुखरूप आणल्याबद्दल ती कृतज्ञतापूर्वक खंडोबाला व भवानीला मनांतल्या मनांत आठवूं लागली. परंतु ते दोन इसम जसजसे जवळ येत चालले व त्यांच्या मूर्ती जसजशा स्पष्ट दिसूं लागल्या, तसतसा तिचा आनंद मावळूं लागला व अखेर तिच्या छातींत धडकीच भरली. कारण ते इसम दुसरेतिसरे कोणी नसून फौजदाराचे शिपाईच होते!

फौजदाराच्या शिपायांनां पाहिल्याबरोबर लक्ष्मीच्या हृदयाला डागणी लागल्यासारखें झालें व आपला नवरा या वेताळांच्या तडाख्यांत सांपडणार, अशी तिची बालंबाल खात्री झाली. नवऱ्याच्या संकटाची कल्पना मनांत उद्भवतांच लक्ष्मीचें मन अगदीं कालवलें, तिची आंतडीं अगदीं पिळूं लागलीं व निष्कपट पतिप्रेमाला एकदम उकळी आली. नवऱ्याला वांचविण्यासाठीं आपण हातपाय हालविले पाहिजेत; त्याकामीं आपण आपल्या शक्तीचा अगदीं आटापेट केला पाहिजे, असें तिला वाटूं लागलें. अखेर तिनें मनांतल्या मनांत असा निश्चय केला कीं "काय होईल तें होओ, आपलं स्वताचं कांहीं झालं, तरी त्यांच्या नखालासुद्धां धका लागूं द्यायचा नाहीं. प्रसंगच आला तर स्वतावरच खुनाचा आरोप घ्यायचा नि मृत्यूला तोंड द्यायचं, पण त्यांचे प्राण वांचवायचे!" अशी एकदा मनाची दृढ भावना झाल्यावर लक्ष्मीचें चित्त स्थिरावलें व ती निर्विकार व शांत मुद्रेनें तेथेंच दारांत उभी राहिली.

शिपाई जवळ आले व त्यांतील एकानें तिच्याकडे अगदीं करडी, कठोर नजर लावून विचारिलें "तुझा घरधनी कुठें आहे?"

लक्ष्मीनें हळूच लीनतेनें पण संथ व स्पष्ट स्वरानें उत्तर दिलें "ते शहरांत गेले आहेत."

"कशाकरितां गेले आहेत शहरांत?"

"वैद्याला आणायला."

हें उत्तर ऐकतांक्षणींच त्या शिपायांनीं एकवार तिच्याकडे, त्या भिकार झोंपडीकडे व अखेर एकमेकांकडे आश्चर्यचकित व संशयपूर्ण दृष्टीनें पाहिलें. नंतर त्यांपैकीं एकानें पुन्हा तिच्याकडे नजर रोंखून खोंचून विचारलें "पण वैद्याला द्यायला त्याजवळ पैसे कुठून आले?"

यावर लक्ष्मीनें कांहींच जबाब दिला नाहीं. ती आपली खालीं पहातच उभी राहिली. त्यावर त्या शिपायानें जरा हांसून कठोर स्वरानें विचारिलें "कां, उत्तर

कां देत नाहींस ? तुझें तोंड कशानें धरलें ? चल, बोल लवकर, का दाखवूं चवदावें रत्न ? ”

“ त्यांना पैसे सांपडले. ” असें लक्ष्मी अडखळत अडखळत बोलली.

“ अस्सें, अस्सें ! आणि ते कुठें सांपडले ? ” अशी शिपाईबुवांनीं मान डोलवित पृच्छा केली.

“ मला तें नाहीं ठाऊक. पण तुह्मांला ही चौकशी कशाला पाहिजे ?”

यावर त्या शिपायानें तिच्याकडे अगदीं हृदयभेदक नजर रोंखून आस्ते, आस्ते उत्तर दिलें “ हें पहा, या जवळच्या रानांत एक खून झालेला मुडदा आढळला आहे व आह्मांला या घरांतील माणसांचा संशय आहे. ”

हे शव्द ह्मणजे लक्ष्मीवर वज्रपातच होते. तिचें डोकें भ्रमूं लागलें व ती मटकन् खालीं बसली; परंतु तिच्या तोंडांतून असे शव्द अर्धवट व अस्पष्ट बाहेर फुटले कीं “ त्यांचा नाहीं हो कांहीं गुन्हा, ते अगदीं निर्दोष आहेत !”

यावर “ असेल तसें, इथें कोण लेंक नाहीं ह्मणतो !” असे शिपाईबोवांनीं उदार दिलानें उद्गार काढिले व ते तिच्याकडे लक्ष्यपूर्वक पाहूं लागले. त्याची नजर जेव्हां तिच्या पायाकडे गेली तेव्हां तो एकदम दचकला व आपल्या सोबत्याकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहून त्याला जरा बाजूस घेऊन गेला व लक्ष्मीच्या कडे पहात पहात तो त्याचेबरोबर कांहीं हळूहळू खलबत करूं लागला. हें पाहून लक्ष्मी चपापली व आपल्याकडे हा असें कां बघतो याचें तिला गूढ पडलें. परंतु तिची दृष्टी आपल्या पायाकडे वळल्याबरोबर तें कोडें उकललें. कारण तिच्या सकाळच्या जखमेंतून पुन्हा रक्तस्राव होऊं लागला होता.

इतक्यांत तो शिपाई पुन्हा जवळ आला व “ तुला आमच्या बरोबर ताब-डतोब आलें पाहिजे, ” असें लक्ष्मीला बरेंच दरडावून बोलला. लक्ष्मीनें भावी परिणामावर नजर देऊन आपलें मन पुन्हा वज्रासारखें दृढ केलें व एकवार साळीचें प्रेमानें चुंबन घेऊन आणि मोठ्या मुलाला घरांत ठेवलेलें पेजपाणी तिला मधूनमधून देण्याविषयीं बजावून ती शिपायांबरोबर निघून गेली.

[ ४ ]

शिपायांनीं तिला नेऊन चावडीवरच्या कोठडींत सुमारें दोन घंटे कोंडून ठेविली. थोड्या वेळानें फौजदारसाहेब आल्यावर तिला एका दिवाणखान्यांत नेलें. तेथें एका सुंदर बैठकीवर काजीसाहेब बसले होते. ते उतार वयाचे होते व त्यांच्या नैसर्गिक गंभीर व शांत चेहऱ्याला त्यांच्या त्या लांब, फेनशुभ्र, छातीवर घांसणाऱ्या

दाढीनें फारच भारदस्तपणा आला होता. लक्ष्मीनें दिवाणखान्यांत पाऊल ठेविल्याबरोबर एकवार इकडे तिकडे नजर फिरवून पाहिलें, तों काजीच्या समोर बऱ्याच अंतरावर हात जोडून उभा असलेला हरबा तिच्या दृष्टीला पडला व तिच्या छातींत एकदम धस्स झालें. इतक्यांत फौजदारानें हरबाकडे बोट दाखवून "त्याचेजवळ उभी रहा," ह्मणून दरडावून सांगितलें व लक्ष्मी एक अक्षरहि न बोलतां हरबाच्या डाव्या बाजूला खालीं मान घालून उभी राहिली. नंतर फौजदारसाहेबांनीं आपल्याकडे सकाळीं सुमारें दीड प्रहर दिवस आला असतां एक श्रीमंत मुसलमान गृहस्थ नाहींसा झाल्याची वर्दी कशी आली, त्यावर तपास करण्यासाठीं शिपाई कसे पाठविले, कांहीं शिपायांनां एके ठिकाणीं रस्त्यावरून रानांत कांहीं फरफटत नेल्याचा कसा संशय आला, त्यावरून ते रानांत कसे शिरले व अखेर एका जाळींत प्रेत कसें सांपडलें, हरबाजवळ पैशाची पिशवी सांपडल्यावरून त्याला कसें पकडण्यांत आलें, वगैरे इत्थंभूत माहिती काजींनां सांगितली. काजींनीं सर्व हकीगत मान हालवित डोलवित ऐकून घेतली व नंतर हरबा व लक्ष्मी यांकडे वळून दोघांनांहि एकदम उद्देशून बोलण्यास सुरुवात केली.

काजीसाहेब ह्मणाले "हरबा आणि लक्ष्मी, खून झालेल्या मनुष्याचें प्रेत तुमच्या घरापासून थोड्याच टप्प्यावर सांपडलें आहे. आसपास दुसरें कोणाचेंहि रहाण्याचें ठिकाण नाहीं. त्यामुळें तुमच्यावर साहजिक संशय येतो. आतां हें कृत्य तुमच्यापैकीं एकानेंच कोणीं केलें किंवा तुह्मी दोघांनींहि संगनमतानें केलेंत, हें कळत नाहीं. पण आमचा फारसा वेळ फुकट जाऊं नये व आह्मांला विनाकारण त्रास पडूं नये, ह्मणून गुन्हा कबूल करण्याची मी तुह्मांला सवड देतों. कारण आतां आढेवेढे घेऊन किंवा खोटें बोलून निभाव लागणें किंवा गुन्हा छपणें शक्य नाहीं. हरबाजवळ मयताची पिशवी सांपडली आहे व लक्ष्मीला पायावर जखम झालेली आहे. पिशवींतील कागदांवरून ती मयताचीच आहे, हें शाबीत झालें आहे. लक्ष्मीच्या जखमेवरून तिनें कांहींतरी हाणमार केली आहे हें उघड आहे. हं, आटपा तर. तुमच्यापैकीं कोणीं मयताला मारला?"

तेव्हां लक्ष्मी धिम्या व स्पष्ट आवाजानें ह्मणाली "सरकार मी खुनी आहें."

आणि खरेंच, त्यावेळीं तिचे मुद्रेकडे ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून पाहिलें, त्यांनां त्यांनां तिच्यावर गुन्ह्याचा ठसा स्पष्ट उमटलेला दिसला व तिच्या अपराधाबद्दल सर्वांची बालंबाल खात्री झाली. हरबाहि क्षणभर आश्चर्यानें स्तंभित होऊन

तिच्याकडे टक लावून बघत राहिला व नंतर लागलीच जणूं काय शुद्धीवर येऊन तिला ह्मणाला "काय ह्मणतेस ? तूं—"

इतक्यांत त्याला फौजदारांनीं व काजीसाहेबांनीं दाबिलें. "खबरदार, अक्षर बोलशील तर. नाहीं तर, लावूं पाठीला वादी नि तोंडाला तोबरा !"

हें ऐकतांच हरबा दगडासारखा स्वस्थ राहिला.

नंतर काजी लक्ष्मीला ह्मणाले "तूं खून केल्याचें कबूल करतेस तर ?"

"हो सरकार."

"बरें या कामीं तुझे कोणी साथीदार होते का ? कीं एकटीनेंच हें काम उरकलेंस ?"

"एकटीनेंच, सरकार."

"ठीक. तुझ्या नवऱ्याचा त्यांत कांहीं हात होता का ?"

"छे ! काडीचाहि नाहीं."

"अच्छा ! तूं त्या मनुष्याला कशानें मारलास ?"

"धोंड्यानें"

"असें. खून करण्यांत तुझा काय मतलब होता ?"

"माझी पोर आजारी आहे, तिच्याकरितां वैद्य आणायचा होता."

"बरें, हा खून केव्हांसा केलास ?"

"काल रात्रीं. प्रहर रात्रीचा सुमार होता, सरकार."

"खून कुठेंसा केलास ?"

"भर रस्त्यावर."

"या मनुष्यालाच तूं कां गांठलास ?"

"मला काय ? कुणालातरी गांठायचंच होतं."

"कशाकरितां ?"

"पैशासाठीं. वैद्य आणायला."

ही एकंदर जबानी ऐकून काजीसाहेब तिच्याकडे पहात कांहीं वेळ स्तब्ध राहिले. त्यांनां त्या बाईची दया येत होती, व तिरस्कारहि वाटत होता असें त्यांच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. इतक्यांत हरबानें भुईवर काजीपुढें दंडवत घालून मोठ्या दीन मुद्रेनें प्रार्थना केली "खाविंद, आपण तिच्या शब्दांवर काडीचाहि विश्वास ठेवूं नका. फक्त मला बचावण्याकरितांच ती हा गुन्हा

आपल्यावर ओढून घेत आहे. मींच त्या इसमाला मारला व त्याची पैशाची नि कागदांची पिशवी पळविली. ती निर्दोष आहे, मी मात्र खुनी आहें!

तेव्हां काजी चिडून रागानें ह्मणाले "गप्प बस, हरामखोरा! इथें असा पोरखेळ चालायचा नाहीं, लक्ष्यांत ठेव."

नंतर जरा स्तब्ध राहून ते पुन्हा हरबाकडे वळून ह्मणाले "काय ह्मणतोस तूं? तूं हा खून केलास? आणि तुला अनुकूल असा हा एक मुद्दा आहे, कीं तूं काल संध्याकाळीं कसब्यांतून या रस्त्यानें गेलास हें पुष्कळांनीं पाहिलें आहे. तसेंच आज तुझ्याजवळ मयताची पिशवीहि सांपडली आहे. बरें, पण तू जर त्या इसमाला मारलास, तर तूं प्रेताचें काय केलेंस?"

"मीं तें रानांत ओढित नेलें, आणि लपवून ठेविलें."

"पण कुठें?"

"रस्त्यापासून शंभर एक कदमांवर एका खाड्यांत."

तेव्हां लक्ष्मीकडे वळून काजींनीं विचारिलें "आणि तूं काय केलेंस त्या प्रेताचें?"

"मीं तें लांबवर ओढित नेलें व एका जाळींत लपविलें."

"फौजदार, यांपैकीं कोणतें खरें आहे?"

"बाई खरें बोलते साहेब."

"हरबा, मग तुझें यावर काय ह्मणणें आहे?"

"मी काय सांगूं आतां? मीं मुडदा खाड्यांत टाकला होता खरा. पण तेथून कोणीं काढून नेला असला, तर मी काय करणार, सरकार?"

तेव्हां काजी जरा कुठ्यां स्वरानें ह्मणाले "तसेंहि असेल कदाचित्; पण तुझें डोकें थाऱ्यावर दिसत नाहीं व आह्मांला तूं भरंवसेशीर वाटत नाहींस."

"सरकार, मी यावर काय बोलणार? मी खंडोबाची नाहीं वाटेल त्याची शपथ करून सांगतों कीं, माझ्या बायकोचा या खुनाशीं कांहींएक संबंध नाहीं."

"तर मग तूं गुन्हेगार आहेस?"

"होय, सरकार."

त्यावर काजी लक्ष्मीकडे वळून ह्मणाले "आणि तूं?"

"मी तर गुन्हेगार आहेंच?"

"तर मग तुह्मीं दोघेंजण गुन्हा कबूल करितां? आणि आपण एकमेकांच्या नकळत हा गुन्हा केला असेंहि पण ह्मणतां?"

यावर दोघांकडून "हो," असेंच उत्तर आलें.

झालें. काजीसाहेब, फौजदारसाहेब, नाईक, हवालदार सर्वच गडबडले! हा चमत्कार आहे तरी काय? असा विलक्षण खटला त्यांनीं आजन्मांत कधीं पाहिला नव्हता. दोघांनां शिक्षेची धमकी दिली, खरें बोलण्याबद्दल बक्षिसाची लालूच दाखविली, उलटसुलट प्रश्न विचारून त्यांना धडपडविण्याचा प्रयत्न करण्यांत आला, पण सर्व व्यर्थ! आपला मुद्दा कोणीच सोडीना. काजीसाहेब मोठ्याच पेंचांत सांपडले! अखेर ते वैतागून ह्मणाले "तुह्मी दोघेंहि अपराधी आहां, आणि दोघेंहि निर्दोष आहां! हें काय गौडबंगाल आहे? तुह्मीं हा चावटपणा मांडला आहां काय? थांबा तुह्मां दोघांनां कडक शिक्षा द्यावी असें लिहून हा सर्व खटला हुजुराकडेच पाठवितों!"

हें ऐकतांच त्या विलक्षण जोडप्यानें काजीला नमस्कार घालून प्रत्येकानें विनविलें कीं "सरकार, मायबाप. मीच फक्त अपराधी आहें. काय शिक्षा होणें असेल ती मलाच व्हावी. मी ती सोसण्यास तयार आहें. यांत दुसऱ्याचा काडीचाहि संबंध नाहीं."

हा घोंटाळा चालला आहे, तोंच 'इब्राहिमखान बहादूर' ह्मणून हवालदार पुकारला व काजीसाहेब मोठ्या लगबगीनें उठून या नामांकित पाहुण्यांला सामोरे गेले. इब्राहिमखान बहादूर हे मोठे श्रीमंत, वजनदार व बादशहाच्या प्रीतींतले मनुष्य होते. तेव्हां त्यांच्या पुढेंपुढें नाचणें, हांजी हांजी करणें, हें सर्व सरकारी नोकरांच्या अंगवळणी पडलें होतें. त्यांचें रहाण्याचें ठिकाण कसब्यापासून हरबाच्या झोंपडीच्या उलट दिशेला चार मैलांवर होतें. त्यावेळच्या इतर श्रीमंत व राजविलासी मुसलमानांप्रमाणें इब्राहिमखानहि व्यसनी, छंदी फंदी असा होता. परंतु तो उदार मनाचा, मायाळू, हाताचा सढळ, वर्तनानें सचोटीचा व वचनाचा धड होता. त्यानें दिवाणखान्यांत पाऊल ठेवतांच बोलण्यास सुरुवात केली "मी आतांच आमच्या हिराबागेंतून आलों. काल संध्याकाळीं आमचे कांहीं स्नेही यायचे होते व ते असे प्रहर रात्रीला आले. त्यांनीं दिवसास कोठेंतरी बरीच चैन उडविली होती, असें दिसतें; कारण ते आडमाप दारू पिऊन, अफू खाऊन आणि गांजाचे दम मारून अगदीं बेफाम होऊनच आले होते. त्यांची चांगली निशा उतरायला सकाळीं एक प्रहर दिवस यावा लागला. मग जेव्हां त्याऱ्या शुद्धीवर आल्या तेव्हां त्यांच्या कोठें लक्ष्यांत आलें कीं, आपल्यापैकीं एक इसम नाहींसा झाला आहे. काल त्यांनां स्वताचेंच भान नव्हतें, तेव्हां दुसऱ्याची

आठवण कोठची होणार ? तेव्हां आतां ह्या इसमाचें झालें तरी काय ? ही मंडळी आली होती टांग्यांतून. तेव्हां तो बहुतकरून बेहोष होऊन वाटेंत टांग्यांतून पडला असावा, असा माझा होरा धावला ! तेव्हां कित्येकांनीं वाटेंत कांहींतरी टांग्यांतून धप्कन् पडल्याचा भास झाल्याचें आतां थोडथोडें आठवतें म्हणून सांगितलेंहि. तेव्हां यासंबंधानें चौकशी करावी म्हणून मीं ताबडतोब येथें येऊन फौजदारांनां वर्दी दिली व तलाश करण्यास सांगितलें. पुढें मुडदा सांपडला व तो आमच्याच इसमाचा आहे. पण या खुनाबद्दल दोन आरोपी पकडून त्यांचा खटला आपल्यासमोर सुरू आहे म्हणून ऐकलें."

"हो, खानसाहेब; हे पहा आरोपी आपल्यासमोरच उभे आहेत. या खटल्यांत माझ्या मनांत आरोपींनां चांगलीच शिक्षा करायची आहे. हीं दोघें नवराबायको आहेत."

"असें काय, काजीसाहेब ? पण काय हो, त्यांच्यावर आरोप लागू झाला का ? पुरावा पुरेसा आहेना ?"

"हो, हो. ते मुळीं गुन्हा कबूलच करितात. मात्र प्रत्येकजण म्हणतो कीं आपणच गुन्हा केला, व दुसरा निरपराधी आहे. त्यामुळें मी जरा घोटाळ्यांत पडलों आहें!"

यावर इब्राहिमखानांनीं मोठ्या उत्सुकतेनें त्या दोघांकडे एकवार पाहिलें, व हंसतहंसत ते काजीसाहेबांनां म्हणाले "काजीसाहेब, अशा तऱ्हेचा खटला आहे ही हकीगत मीं नुक्तीच ऐकली. तेव्हां या कामांत न्यायाचें काम सवघड व्हावें म्हणून भरपूर पुरावा देणारा एक साक्षीदार मीं आपल्याबरोबर आणिला आहे; आपली परवानगी असेल, तर मला वाटतें त्याची साक्ष घेणें बरें."

"हो, हो, जरूर ! त्याला काय हरकत आहे ? न्यायाच्या कामीं जितका पुरावा असेल तितका चांगलाच !"

तेव्हां खानबहादुरांनीं बाहेर उभे असलेल्या वैद्यबोवांनां आंत आणण्यास शिपायाला हुकूम केला. वैद्य येऊन हजर झाल्यावर खानबहादुर काजींस म्हणाले "हे आमचे वैद्य आहेत. यांनीं आमच्या लेह्याचा मुडदा तपासला आहे व तो इसम कशानें मेला आहे, हें ते आपल्याला आतां सांगतील."

त्यावर वैद्यांनीं जबानी दिली "मयताच्या टाळूवर आघात होऊन ठेंचल्यामुळेंच त्याला मृत्यु आला. मयत इसम कोठूनतरी वरून अस्ताव्यस्त रीतीनें पडल्यामुळेंच हा आघात झाला असला पाहिजे, हें निर्विवाद आहे. हा आघात

कोणीं मारून झालेला नाहीं. ताळूवर जोराचा आघात होऊन मयताच्या मानेच्या शिरा ताठून, फुगून फुटल्या व त्यांतून थोडेंसें रक्त वाहिलें. अशी स्थिति मनुष्य उंचावरून डोक्यावर पडल्याशिवाय होणार नाहीं. ही जबानी मी वाटेल त्याच्यापुढें देण्यास तयार आहें. यांत एक अक्षरहि पदरचें किंवा खोटें नाहीं हें मी शपथेवर सांगतों."

झालें. वैद्यराजांच्या जबानीनें खुनाचा प्रश्नच निकालीं लागला. परंतु या नवराबायकोंनीं तो आरोप आपल्यावर ओढून कां घेतला हें कोडें राहिलेंच व हरबाजवळ मयताची पिशवी कशी आली, हाहि प्रश्न होताच. तेव्हां काजींनीं हरबाला हा प्रश्न विचारतांच त्यानें सांगितलें " माझ्या बायकोनें जेव्हां गुन्हा कबूल केला, तेव्हां ती खोटें बोलत आहे हें पूर्णपणें मी समजलों. परंतु ती असें कां करतें हें माझ्या लक्ष्यांत आलें नाहीं व तिला वांचविण्यासाठीं मीं आपल्यावर खुनाचा आरोप लादून घेतला." नंतर त्यानें काल संध्याकाळपासूनची इत्थंभूत हकीगत उघडपणें सांगितली.

पुढें लक्ष्मीला विचारतां तिनेंहि आपली सर्व हकीगत सांगितली. ती ह्मणाली "मला यांनीं खून केल्याचा संशय आल्यापासून, स्वतांवर आरोप लादून घेण्याचा व यांनां वांचविण्याचा मीं निश्चय केला होता. ह्मणूनच काजीसाहेबांनीं गुन्हा कबूल करा ह्मणतांच मीं मुळींच न डगमगतां एकदम गुन्हा कबूल केला."

हें ऐकतांच खानबहादूर अगदीं थक्क झाले. श्रीमंत घराण्यांतहि न आढळणारें अढळ प्रेम दरिद्री झोंपड्यांतहि कसें दृष्टोत्पत्तीस येतें, याचें त्यांनां राहून राहून नवल वाटलें. नंतर त्यांनीं त्या मयत इसमाच्या पिशवींतले कागदपत्र आपल्या कबजांत घेतले, व तींतील पैसा हरबा व लक्ष्मी यांनां त्यांच्या प्रेमाबद्दल नजराणा ह्मणून दिला. परंतु तो पैका देतांना त्यांनां असें दरडावून बजाविलें कीं, मृताच्या पैशाला आपला संबंध नसतां पुन्हा कधींहि हात लावतां कामा नये. त्यांनीं नंतर कृपाळू होऊन आपल्या वैद्यराजांनांहि गरीब बिचाऱ्या साळीची प्रकृति पाहून तिला औषधपाणी देण्याबद्दल फरमाविलें.

एकंदरींत अशा रीतीनें ईश्वराच्या कृपेनें हरबा व लक्ष्मी यांचीं संकटें लयास जाऊन त्या दिवशींच्या प्रकाराचा शेवट आनंदांत झाला.

**जें न जीव धरि रम्य विलासीं राजप्रासादांत,**
**प्रेमरोप तें स्वैर भरारे उटजीं दारिद्र्यांत!**